भारत-गौरव-ग्रंथमाला-पुष्प पंचविसावें.

# पूर्व आणि पश्चिम.



न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।

—भगवान् श्रीकृष्ण.

---

१९२९

---



साधी प्रत एक रुपया. ]    [ कापडी प्रत सवा रुपया.

# प्रकाशकाचे दोन शब्द.

—••:०:••—

भगवान् श्रीकृष्णाच्या कृपेनें मालेचें हें पंचविसावें पुष्प पूर्व आणि पश्चिम तयार झालें असून तें आश्रयदात्यांच्या हातीं आम्ही प्रेमपूर्वक देत आहों. महाराष्ट्र वाङ्मयांत ज्या पुस्तकाची खरोखर आवश्यकता आहे, तींच पुस्तकें प्रकाशित करण्याचा प्रयत्न ही ग्रथमाला प्रथमपासून करीत आहे व या आमच्या प्रयत्नास परमेश्वरकृपेनें व आमच्या आश्रयदात्यांच्या प्रोत्साहनामुळें यशहि आलें आहे. या पूर्व आणि पश्चिम कादबरींत अलीकडे भराभर प्रसिद्ध होणाऱ्या कादबऱ्यांप्रमाणें रंगेल तरुणांच्या प्रेमकथा नाहींत किंवा अत्यत आश्चर्यकारक अशा घडामोडीच्या गोष्टीहि नाहींत. आज राष्ट्रांतल्या तरुणापासून वृद्धापर्यंत सर्वांवर जी जबाबदारी येऊन पडली आहे, त्या जबाबदारीची ओळख पटविण्याचें साहस या कादवरींत लेखकानें केलें आहे. साहस म्हणण्याचें कारण असें कीं, यातले कांहीं विचार जुन्या आकुंचित बधनांनीं बद्ध झालेल्यांना व काही विचार स्वेच्छाचारी स्वैरसचारकांना कितपत रुचतील याची शका आहे. लेखकानें या लोकाच्या रुचीची भीति न बाळगिता सत्य, कर्तव्य आणि मनुष्यत्व याकडे लक्ष देऊन आपली लेखणी न्यायनिष्ठुरतेनें चालविली आहे. राष्ट्राचे कल्याण साधावें म्हणून पुष्कळ बोलके राष्ट्रभक्त पुढे येऊं लागले आहेत, परंतु स्वत च्या पाठीशीं स्वतःचें शुद्धाचरण आणि स्वत ची दानत ही असल्यावांचून नुसत्या फोनोग्राफी शब्दच्छलानें काहीहि निष्पन्न व्हावयाचे नाहीं, तर कर्तृत्वाच्या पाठीशीं दानत आणि शुद्धाचरण ही असलीच पाहिजेत, हें या कादबरींत दर्शविण्याचा लेखकानें प्रयत्न केला आहे. अर्थात् यामुळें चारित्र्यहीन राष्ट्रभक्ताच्या रोषासहि लेखक पात्र होण्याचा सभव आहे. परतु राष्ट्राचें खरें कल्याण चिंतणारा प्रत्येक तरुण व अद्यापि मनाने तरुण असणारा प्रत्येक प्रौढ व वृद्ध या कादबरीच्या वाचनानें सतुष्ट झाल्यावाचून राहणार नाहीं, असा आम्हास भरवसा वाटतो. राष्ट्राची तरुण पिढी केव्हाहि ओजस्वी, काटक व स्वतत्र बाण्याची असावी; ती मलीन, मवाळ व परावलबी असण्यात राष्ट्राचा फायदा नाहीं, हा या कादबरीचा मुख्य उद्देश आहे. या कार्यात लेखक कितपत यशस्वी झाला आहे, ते वाचकांनींच पहावे आमच्या इतर कादबऱ्याप्रमाणें ही कादबरीहि आश्रयदात्याची सात्विक करमणूक करील, असें आम्हांस वाटते.

—प्रकाशक.

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.



या पुस्तकाची द्वितीयावृत्ति काढण्याचा सुयोग आज बरेच वर्षांनीं आला आहे. पूर्वीच्या आवृत्तींत योग्य ते फेरफार करूनच ही आवृत्ती काढलेली आहे हे सर्व फेरफार शाळाखात्यांत हे पुस्तक चालू व्हावे म्हणून तज्ज्ञाच्या सल्ल्याप्रमाणे केले गेले असल्यामुळें हें पुस्तक शाळातून लावण्यास योग्य असें झालें आहे. तरी या आमच्या प्रयत्नाचें आमचा शिक्षकवर्ग योग्य चीज करील अशी आशा आहे.

—प्रकाशक.

# पूर्व आणि पश्चिम.



## प्रकरण पहिलें.



दिवस किंचित् थंडीचे होते. आकाश निरभ्र असून सूर्य नुकताच वर आला होता. पावसाळा संपून थोडेच दिवस लोटले असल्यामुळें वृक्षवेली वगैरे हिरव्यागार पल्लवानीं नटलेल्या असून सकाळच्या कोंवळ्या उन्हानें हा सर्व वनस्पतिसमूह सतेज व नयनमनोहर दिसत होता. अशा या रम्य वेळीं मुंबईस वाळकेश्वरावर असलेल्या एका बंगल्याच्या सभोंवतालची बाग तर विशेषच मनोहर दिसत होती. या बागेचें सौंदर्य कृत्रिम तर खरेंच, पण त्यात चित्ताकर्षकपणा नव्हता, असें मात्र नाहीं. माळ्यांनीं पहाटे उठून बाग अगदीं स्वच्छ केली होती व फुलझाडांवर पाणीहि शिंपडलें होतें. कोंवळ्या उन्हाच्या किरणांमुळें झाडांच्या पानांवरील पाण्याचे थेंब चकाकत होते. बंगल्याच्या समोरच अनेक बारीक छिद्रांचें एक कारंजें जोरानें हवेंत जलतुषार फेंकीत असून बागेच्या एकंदर शोभेंत त्यानें अपूर्व भर घातली होती. बागेंतील बंगला राजशाही थाटाचा असून त्यासभोंवतालची बागहि पहाण्यासारखी होती; परंतु ही बाग पाहण्याचा लोभ कितीहि अनावर झाला, तरी बागेंत जाण्याची मात्र कांहीं सोय नव्हती; कारण बागेच्या मुख्य दरवाजावरच खुर्ची टाकून भजहरी नांवाचा एक भैय्या नेहमीं बसलेला असे. या भैय्याचा तो वाटोळा गरगरीत चेहरा, करड्या रंगाची दाढी आणि मिशा व ते बटबटीत डोळे हीं पाहूनच कीं काय, त्या भागांतल्या मुलांनीं या भैय्याचें नांव 'वाघोबा' असें ठेवलें होतें. याशिवाय त्या बंगल्याच्या रक्षणासाठीं आणखी तीनचार भैय्ये असून बागेच्या व्यवस्थेसाठीं तीन माळीहि होते. याखेरीज गाडी हांकणारे, घोड्यांची निगा राखणारे वगैरे चारपांच नोकर होते ते निराळेच. बंगल्याची बांधणी, त्याचा दर्शनी भाग आणि बागेची रचना हीं पाहिलीं, म्हणजे बगल्याचे मालक पाश्चात्यांचें अनुकरण करण्यांत मोठे पटु असावेत अशी सहजच कल्पना होई. एवढा मोठा बंगला आणि त्याचें हें

राजविलासी वैभव पाहिलें म्हणजे एखाद्या भिकाऱ्यास तेथें चांगली भिक्षा मिळेल, असा भरंवसा उत्पन्न होई आणि तो मोठ्या आशेनें बागेच्या दरवाजाजवळ जाऊन याचना करण्यास आरंभ करी; परंतु तितक्यात भजहरी भैय्या वाघाप्रमाणें त्या बिचाऱ्याच्या अंगावर गुरकावून त्याला तेथून घालवून देत असे ! असो.

आठनऊ वाजण्याच्या सुमारास दोन घोड्याची एक गाडी या बगल्याकडे येतांना पाहून भजहरी खुर्चीवरून उठला व त्यानें आपला पोषाक साफसूफ करून दुसऱ्या भैय्यांच्या व नोकरांच्याहि दृष्टोत्पत्तीस ती गाडी आणून दिली त्याबरोबर जो तो आपापल्या कामात निमग्न असल्याचे दर्शवू लागला ! बाकीचे भैय्येही पोषाक नीटनेटका करून दरवाजाजवळ येऊन उभे राहिले व ती गाडी अगदीं जवळ येताच हातवारे करून मोठ्यानें ‘ बाजू बाजू, हट जाव !’ म्हणून ओरडले. वास्तविक त्या वेळीं तेथे कोणीहि नव्हते, परंतु त्या भैय्यानीं जणू काय पाचपचवीस माणसाची गर्दी मोडण्याचा आव आणला होता ! गाडी बागेच्या दरवाजांतून आंत जाताच सगळया भैय्यानीं मोठ्या ऐटीनें गाडींतील गृहस्थास सलाम केला. गाडी बगल्याच्या दरवाजाजवळ जाऊन उभी राहताच, एक सोळासतरा वर्षांची तरुणी गाडींतून प्रथम बाहेर पडली. नंतर एक युरोपियन पद्धतीचा पोषाक केलेले गृहस्थ गाडींतून खाली उतरले व त्यानीं एका प्रौढ स्त्रीला हात देऊन खालीं उतरून घेतलें. ते गृहस्थ व ती प्रौढ स्त्री खालीं उतरतांच आंत निघून गेलीं, पण ती तरुण मुलगी मात्र तेथेच उभी राहून बागेंतल्या फुलझाडावरून आपली दृष्टि फिरवू लागली. गाडीहि तितक्यात तेथून तबेल्याकडे निघून गेली व ती तरुणी बागेंत जाऊन उगाच इकडे तिकडे हिंडू लागली.

तिचा पोषाक मनोहर असला तरी कित्येकास तो थोडा विचित्र वाटण्याचा संभव होता. तिच्या पायात गुलाबी छटेचे रेशमी पायमोजे असून त्यांवर पाढरा स्वच्छ उच टांचेचा बूट होता. पोपटी रगाचें सुदर छापाचे पातळ तिनें परिधान केलेलें असून अगात किरमिजी रगाचे नव्या धर्तीचे पोलकें घातलें होतें. वाकडा भांग काढून केंस कुशलतेनें बाधलेले होते. अगावर अलकार विशेष नव्हते. हातांत फक्त दोनदोन सोन्याच्या बागड्या असून सोन्याचे एक सुदर लहान घड्याळ डाव्या मनगटावर बांधलेलें होतें. केंसात सोन्याचा आकडा खोंवलेला होता. ती तरुणी अत्यंत सुदर असली तरी चेहऱ्यावर सौजन्य व गांभीर्य हीं एकवटलेलीं असल्यामुळें ती अधिकच सुंदर दिसे. तिच्या चेहऱ्यावरील सौजन्य तिच्या बोलण्याचालण्यांतहि पदोपदीं दिसून येत होतें. तरुणीचे डोळे सतेज असून ते सत्या-

वरील अढळ भक्ति व सच्छीलता हीं दर्शवीत होते. एक वेळ तिचा स्वभाव फार शांत असावा, असें तिच्या चेहऱ्यावरून दिसून येई, पण आता त्या शांत स्वभावाबरोबरच चांचल्य व रोष हीं विलसत असलेलीं दिसत होतीं. ती त्या बागेंत अमुक एका उद्देशानें फिरत होती, असें मुळींच नव्हतें. जरा बागेंत वेळ काढला, तर जिवाला अमळ बरें वाटेल, या समजुतीनें ती उगीच इकडे तिकडे फिरत होती. अरेरे! एवढया मोठ्या विलासभवनातील ही सुदर तरुणी इतकी सचिंत असावी, हें त्या विलासमदिराचे केवढे दुर्दैव!!

पण याबद्दल दोष कोणाचा? त्या विलासमदिराचा, कीं त्या तरुणीचा? आपणाला आता हेंच पहावयाचे आहे आणि कथानकाच्या ओघाबरोबर आमच्या वाचकाच्याहि तें लक्षात येईल एकादी वैभवसपन्न भूमि आपण पाहिली कीं, प्रथमच असे मनात येते की, 'अहाहा! कोण हे सुखाचें स्थान!' परंतु या भूमीवर जो जो एकेक पाऊल टाकावे, तो तों तेथें दु खाचीं मुळें खोल गेलेलीं आहेत, असें आढळून येते वर मागितलेल्या वाळकेश्वराच्या बगल्याची अवस्थाहि काहीं अशीं अशीच आहे काही अशींच का, सर्वांशानेंच अशी आहे, असें म्हटले तरीदेखील काहीं हरकत नाहीं

ती तरुणी हिडत हिडत एका दगडी आसनावर जाऊन बसली. जवळच एका गुलाबाच्या झाडावर दोन फुलें फुललेलीं होतीं. तीं दोन्ही फुलें तिनें तोडलीं व प्रथम त्याचा वास घेऊन नतर तीं केसांत खोवलीं. इतक्यात तिला काय वाटलें कोण जाणे, तिनें तीं काढून कुसकरून फेंकून दिलीं! समोरच एक लताकुज सगळेंच्या सगळे लोखडी तारेनें गुंफून आंत चारपाच पोपटाची सोय केलेली होती. हे सर्व पोपट निरनिराळ्या झुलत्या दाड्यावर बसून सुस्वर शीळ घालीत होते! त्या पक्ष्याची जी व्यवस्था ठेवलेली होती, ती पाहून कोणासहि कौतुक वाटलें असतें, परंतु या तरुणीनें मात्र त्याच्याकडे पाहून एक दीर्घ श्वास सोडला! स्वतत्र वनवृत्तीच्या सुखाला मुकलेल्या त्या पाखरांची तिला दया आली!! वेळच्या वेळीं उत्कृष्ट फळे खाणाऱ्या त्या पांखराना ही स्त्री ज्या अर्थी सुखी समजत नाहीं, त्या अर्थी स्वातंत्र्याची खरी योग्यता किती आहे, हें ती जाणत असावी, हें उघड होय. त्या लताकुंजाजवळ जाऊन ती स्वत शींच पुटपुटू लागली 'रानावनातील मोकळ्या हवेंत स्वच्छदतेनें भराऱ्या मारीत आंबट गोड फळें खाण्यात आणि झुळझुळ वाहणाऱ्या झऱ्याचें पाणी पिण्यांत जें सौख्य या पक्ष्याना वाटतें, तेंच सौख्य त्या खेड्यांतल्या बिनडामडौली गृहस्थाश्रमांत असलें पाहिजे. हीं दुर्दैवी पांखरें जशीं

कित्येकांना सुखी वाटतात, तशा कित्येक अज्ञान तरुणी माझादेखील हेवा करीत असतील! पण त्या जर माझें हृदय उघडें करून पहातील तर मीदेखील या पारतंत्र्यामुळें स्वतःस अभागी समजत आहें, असेंच त्यांना आढळून येईल!'

इतक्यांत कांहीं मंजुळ स्वर तिच्या कानांवर पडले. त्याबरोबर ती त्या दिशेनें पुढें जाऊं लागली. आवाज मोठा गोड असून तो स्त्रीचा आहे, हें तिच्या तेव्हांच लक्षांत आलें.

कहां गया मेरा श्याम—
कहां गया मेरा श्याम ? ॥

बारीक किनरीसारख्या मधुर आलापांत हे शब्द बागेच्या आवाराबाहेरून एका भिकारिणीनें उच्चारताच माणसेंच काय, पण पक्षीदेखील स्तब्ध झाले, परंतु आमच्या भजहरी भैय्याचें पित्त मात्र खवळून गेलें! तुसड्या आवाजानें त्या भिकारिणीवर ओरडून तो म्हणाला, "जा, जा, नाहक यहा बकवाद कर रही है. जा, आगे जा." खडीसाखरेनें तोंड गोड होत आहे, तोच एकादा कडू पदार्थ तोंडात सांपडल्यामुळें जिभेची जी स्थिति होते, तीच या वेळीं प्रत्येक गानलुब्ध कानाची झाली. मधुर आलापामागून भजहरीची ती तोफबाजी त्या तरुणीला सहन झाली नाहीं. ती भजहरीजवळ जाऊन जरा रोषानें म्हणाली, "भजहरी, का त्या बिचारीला घालवून देतोस ? जा, तिला बागेत घेऊन ये."

"अच्छा बाईसाब." असें म्हणून भैय्या लगबगीनें बाहेर गेला आणि विन्मुख होऊन चाललेल्या त्या भिकारिणीला आत घेऊन आला. ती तरुणी या वेळीं पुन्हा त्या पूर्वीच्या दगडाच्या आसनावर जाऊन बसली होती. तिच्यासमोर जेव्हां ती भिकारीण येऊन उभी राहिली, तेव्हा त्या भिकारिणीसंबंधानें त्या तरुणीला बरेंच कुतूहल उत्पन्न झाल्यासारखें दिसलें. भिकारिणीची मूर्ति आपादमस्तक दोन-तीन वेळ चांगली निरीक्षण करून ती तरुणी गोड स्वरानें व सहानुभूतीनें म्हणाली, "तूच का मघां तें गाणें म्हणत होतीस ? तुझा आवाज मोठा गोड आहे."

श्रीमताची तरुण मुलगी इतकी निगर्वी व प्रेमळ असलेली पाहून त्या भिकारिणीसहि आश्चर्य वाटलें. आज इतक्या दिवसांत त्या भिकारिणीला एवढ्या गोड शब्दांनीं कोणीं विचारलें नसल्यामुळें तिला साहजिकच आनंद झाला. बाजूला नम्रपणें उभें राहून तिनें तें पूर्वीचें गाणें म्हणण्यास आरंभ केला.

कहां गया मेरा श्याम—
कहां गया मेरा श्याम? ॥
वृंदावनमें काला, बनबनमें तू ही, बांशी पुकारी—
और गावत राधानाम ।
कहां गया मेरा श्याम? ॥
सोही यमुनातीरे, बहत मलयजधीरे ।
कुहरत पिक सोही तमाल बनमें ॥
व्रजबालक सोही वेणु बजावत ।
धेनु चरावत गोप बनमें ॥
हेलाई दुलाई सोही शिरपर गागरी ।
व्रजनारी, चलत उजली व्रजधाम ॥
कहां गया मेरा श्याम? ॥
वृंदावनमें येहि सभी रहत सोहि?
केवल नही कृष्ण राधिकाप्राण ॥
कहां गया मेरा श्याम? ॥

भिकारिणीचा आवाज अगोदरच गोड, त्यात हें एकच गाणें प्रत्येकाच्या दाराशीं ती म्हणत असल्यामुळें त्यांतले निरनिराळे आलापदेखील सहजरीतीनें घेण्याची तिला सवय झाली होती. गाण्याच्या तानदारीप्रमाणें भिकारिणीचा चेहराहि मोठा मोहक होता. वर्णानें ती विशेष गोरी नव्हती हें खरें, पण म्हणण्यासारखी काळीहि नव्हती. वयानेंहि ती तरुणच होती. तिचें वय फार तर वीसएकवीस वर्षांचें असावें तिचा पोशाक भिकारिणीला शोभण्यासारखाच होता. सगळ्या अंगावर एकच वस्त्र असून तेंहि ठिकठिकाणीं फाटलेलें होतें. चेहरा कांहींसा चिंतायुक्त असून, दारिद्र्यानें पीडलेला दिसत होता खांद्यावर लहानशी झोळी असून तिलाहि भोंकें पडलेलीं होतीं आणि ती रिकामी होती. हातांत एक पितळेचा लोटा होता. तिनें वरील गाणें म्हटल्यावर तिला आणखी गाणीं म्हणण्यास सांगण्याचा आमच्या तरुणीस अनिवार लोभ उत्पन्न झाला व त्याप्रमाणें तिनें भिकारिणीला म्हणण्यास सांगितलें. इतका वेळ भिकारीण उभीच होती. तिला ती तरुणी म्हणाली, "वा! तुझा आवाज खरोखर फार गोड आहे. बैस, खालीं बैस आणि आणखी एकदोन गाणीं म्हण."

भिकारीण खालीं बसली आणि मोठ्या आनंदानें गाणीं म्हणू लागली. पहिलें गाणें तिनें हिंदींतच म्हटलें आणि पुढचीं दोनतीन गाणीं शुद्ध मराठींतच तिने म्हटलीं हीं मराठींत म्हटलेलीं गाणीं तिनें फार उत्तम तऱ्हेनें म्हटलीं आणि तीं स्वभाषेतली गाणी वरील तरुणीलाहि फार आवडलीं. अर्थात् भिकारिणीला चागलें बक्षीस दिलें पाहिजे, असा विचार करून तरुणीनें आपल्या केंसांत खोंवलेला सोन्याचा आकडा काढला आणि तो भिकारिणीला देऊन ती म्हणाली, " घे हें तुला बक्षीस! खरोखर तू फार चांगलें गातेस! "

हें बक्षीस घेताना भिकारीण उभी राहिली. तरुणीला नम्रपणें, पण हर्षाने अभिवादन करून ती म्हणाली, " मेमसाहेब, मी भिकारीण, भीक मागून कसें तरी पोट भरते. या दागिन्याला घेऊन मी काय करू? कोणाला विकायला गेलें, तर चोर म्हणून मला पकडतील. "

तरुणी म्हणाली, " विकतेस कशाला? स्वत च्या केसात घालीत जा! "

गिनीच्या सोन्याचा तो चकाकणारा आकडा भिकारिणीला जितका अपूर्व वाटला तितकाच निरुपयोगी वाटला! एकदा तिला वाटलें कीं तो केसात घालून पहावा, पण तसे करण्याचे तिला धैर्य झालें नाही. ती म्हणाली, " छे, मेमसाहेब, माझ्यासारख्या भिकारिणीनें असला दागिना घातला, तर लोक नावें ठेवतील! "

" ठेवीनात! तुझ्या नवऱ्याला तर तो पाहून आनद होईल? "

" मला नवरा नाहीं मेमसाहेब! मी एकटीच भीक मागत हिंडते! "

भिकारिणीचे हे शब्द ऐकून तरुणीला मोठें आश्चर्य वाटलें ती म्हणाली, "काय, एकटीच भीक मागत हिंडतेस? तुला भीति नाहीं वाटत? "

भिकारिणीच्या चेहऱ्यावर किंचित् खिन्नता पसरली. ती म्हणाली, " भीति वाटली, तरी काय करणार मेमसाहेब? देवानेंच एकटे राहण्याचें नशिबी लिहिलें आहे, तेव्हा एकटेंच राहिलें पाहिजे. "

" तुझें लग्न नाहीं झालें? "

" झालें, पण नवरा पळून गेला, मेमसाहेब! "

तरुणीला या 'मेमसाहेब' शब्दाचा भारीच तिटकारा आला होता, पण हा दोष भिकारिणीचा नसून आपल्या पोशाकाचा आहे, हें लक्षांत आल्यामुळें तिनें

या नव्या पदवीबद्दल कुरकुर केली नाहीं. ती म्हणाली, " पळून गेला ? तुझ्या-सारख्या गुणवान स्त्रीला टाकून तो कसा पळून गेला ?"

" तें मी काय सांगू, मेमसाहेब. पळून गेला एवढें खरें ! कां पळून जातों, तें त्यानें मला सागितलें नाहीं !"

" तुला आतां जवळपासचे कोणी नातेवाईक नाहींत ?"

" कोणी नाहींत "

" मग अशा रीतीनें भिक्षा मागण्याशिवाय दुसरा कांहीं उपाय नाहीं ?"

इतकी सहानुकपा भिकारिणीच्या आजच दृष्टीस पडल्यामुळें तिचें हृदय साहजिक गहिंवरून आलें. ती म्हणाली, " एकाद्या कुलीन हिदु गृहस्थाच्या घरात नोकरी मिळाली, तर मी मोठ्या आनदानें पत्करीन, पण मी जातीनें बैरागीण असल्यामुळें मला कोण नोकरीला ठेवतो ? मी या भिक्षेला अगदीं कटाळलें आहें, पण काय करणार ?"

भिकारिणीचे हे शब्द ऐकून तरुणीला तिची दया आली. ती म्हणाली, " तर मग तू नोकरी मिळाली तर करशील ?"

" हो, मोठ्या आनदानें !"

" तर तू माझ्याजवळच रहा मीहि कांहींशी एकटीच आहें, तेव्हां गाण्या-संवरण्यानें माझा वेळ तरी जाईल. "

" बरें, मेमसाहेब ! पण मेमसाहेब, आपले साहेब असतील ? त्याचा स्वभाव कसा आहे कोणाला माहीत ?"

तरुणी हसत हंसत म्हणाली, " त्याची तुला भीति नको. तू जशी नुसती बैरा-गीण तशी मीहि नुसती मेमसाहेब ! दोघीहि आनदानें राहू !"

हे शब्द ऐकून भिकारिणीला थोडेंसें आश्चर्य वाटले त्या तरुणीकडे निरखून पाहून ती म्हणाली, " तर काय मेमसाहेबाचा अजून विवाह झाला नाहीं ?"

" विवाह तर केव्हांच झाला आहे !"

भिकारीण हसून म्हणाली, " तर काय माझ्याप्रमाणें साहेबहि मेमसाहेबांना टाकून पळून गेले ?"

बैरागिणीच्या या विनोदानें तरुणीला राग आला नाहीं. ती थोडी खिन्न झाली हें खरें, तथापि ती हंसत हसत म्हणाली, " तूं माझ्याजवळ नोकरीला रहा, म्हणजे मग तुला सगळें कांहीं समजेल. राहतेस का ?"

" न रहायला काय हरकत आहे, बाईसाहेब ? आज अगदीं चांगल्या वेळीं भिक्षेसाठीं बाहेर पडलें होतें, म्हणून ही अशी भिक्षा पदरांत पडली ! परमेश्वर तुमच्या सगळ्या इच्छा पूर्ण करील ! मला खरोखर आज तुम्हीं नरकांतून काढून वैकुंठांत आणलें !"

तरुणी हंसत हसत म्हणाली, " पण हें एकट्या लक्ष्मीचें वैकुंठ आहे हो ! येथें नारायण नाहीं !"

" पण असल्या लक्ष्मीला सोडून नारायण कांहीं फार दिवस बाहेर राहणार नाहीं."

" तें असो. पण तुझें नांव काय ?"

" माझें नांव चंद्रभागा; पण माझे आईबाप मला नुसतें 'भागू' म्हणूनच म्हणत."

" तर मग तुला आईबाप होते तर ?"

भिकारीण आश्चर्यानें म्हणाली, " म्हणजे ? मी भुईतून वर आलें, अशी तुमची समजूत होती कीं काय ?"

" नाहीं, मी तशा उद्देशानें नाहीं म्हणालें. आईबाप असून मग तुझी अशी दशा कां झाली, तें मी तुला विचारलें."

" मेमसाहेब, हा सगळा माझ्या दुर्दैवाचा खेळ ! कोणाला दोष देणार ? खानदेशांत एका गांवीं माझ्या बाबाचा मठ होता. माझी आई मी लहान असतांच वारली. माझ्या बापाचें नांव रघुदास बैरागी. त्यानें स्वत चा मठ तयार करून थोडा पैसाहि जमविला होता; पण त्यांना मुलगा नसल्यामुळें शिष्यवर्गापैकीं एका चांगल्या शिष्याच्या स्वाधीन त्यांनीं मठ केला आणि माझा विवाहही त्याच्याचबरोबर लावला. पुढें माझे बाबा वारल्यावर माझ्या नवऱ्याला दारूचें व्यसन लागलें आणि त्या व्यसनाचे पायीं त्यानें मठाची सगळी संपत्ति खलास केली. पुढें मलाही तो मारहाण करूं लागला आणि गांवांतल्या लोकांनीं त्याला दोन उपदेशाच्या गोष्टी सांगितल्यामुळें उलट माझ्यावरच रागवून तो कोठें पळून गेला ! शेवटीं गांवांतल्या लोकांनीं तो मठ दुसऱ्या एका बैराग्याच्या स्वाधीन केला व त्यामुळें मला तो गांव सोडून भीक मागत फिरणें भाग झालें. माझा बाप फार सात्त्विक असून विद्वान् होता. त्यानेंच मला थोडें फार लिहिण्यावाचण्यास शिकवून देवाचीं पदें म्हणण्यास शिकविलें होतें."

ही हकीकत सांगत असतां बैरागिणीचा कंठ दाटून आला व तिचे डोळेहि पाण्यानें भरून आले हें पाहून तरुणीला तिची फार दया आली. ती म्हणाली, "भागू, झालें तें झालें. त्याबद्दल आता रडून काय उपयोग? माझ्याजवळ नोकरीला रहा, म्हणजे तुला असें भीक मागत फिरावें लागणार नाहीं; बरें, येथें कामदेखील कांहीं विशेष नाहीं. नेहमीं माझ्याबरोबर असावयाचें, माझीं कांहीं किरकोळ कामें करावयाचीं आणि मी सांगेन तेव्हा गाणीं म्हणावयाचीं; एवढेंच सारें काम! करशील ना?"

"होय, मेमसाहेब. आपण सांगाल तीं सगळीं कामें करीन. तुमच्या दासीचीं देखील करीन आजपासून या भिक्षादेहींतून तुम्ही मला कायमची मुक्त केल्यामुळें मी आपली जन्मोजन्मींची ऋणी झालें आहें. मेमसाहेब, आपलें नांव काय?"

तरुणी हसून म्हणाली, "हें बघ भागू, मला 'मेमसाहेब, मेमसाहेब,' म्हणत जाऊ नकोस. मला देखील तुझ्याचसारखीं दोन नांवें आहेत. माझे बाबा आणि आई मला आवडीनें 'लीला' म्हणून हांक मारतात. कित्येक मला 'रुक्मिणी' म्हणूनहि हाक मारतात. तुला यातलें कोणतें नांव आवडतें?"

"'रुक्मिणी' हेंच नाव गोड आहे! मला रुक्मिणीचें गाणेंदेखील येतें!"

"बरें, तू बगल्यांत ये. तुला तुझ्या कामाची माहिती करून देऊन घरातल्या माणसांचीही ओळख करून देतें."

रुक्मिणी आणि चद्रभागा दोघीहि आंत निघून गेल्या.

---

## प्रकरण दुसरें.



एका मोठ्या स्वच्छ व सुबक दिवाणखान्यांत एक रुद व बरेंच लांब असें टेबल ठेवलेलें असून त्या टेबलावर लहान यत्रें, कांचेचे पेले वगैरे वस्तु व्यवस्थेनें ठेवलेल्या होत्या. जवळच दुसरें एक टेबल असून त्यावर काहीं वर्तमानपत्रें व मासिकें होतीं आणि त्याच्या सभोंवतीं सातआठ खुर्च्या ठेवलेल्या होत्या. या जागेला वर आम्हीं दिवाणखाना असें म्हटलें खरें, परंतु तिला प्रयोगशाळा असें म्हणण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. तेथें ठेवलेली प्रत्येक वस्तु डामडौलाची किंवा अनावश्यक अशी नसून उपयुक्त अशीच होती. ही प्रयोगशाळा तिच्या

अन्वर्थक नांवानें प्रसिद्ध नसून 'दादासाहेबांचा बंगला' म्हणून जवळपासच्या लोकांना माहीत झालेली होती. जे आपणास सुशिक्षित व सभ्य म्हणवीत असत ते या प्रयोगशाळेची चेष्टाहि करीत. 'चांगला अभ्यास करून वकील, मुनसफ होण्याची कांहीं अगांत पात्रता नाहीं, तेव्हां थोडक्या ज्ञानाच्या भांडवलावर लोकांत नांव मिळविण्याची ही एक नवी टूम काढली आहे' असे हे चेष्टा करणारे म्हणत! 'रिकामें राहाण्यापेक्षा असला उद्योग पुष्कळ बरा' असेंहि पण कित्येक म्हणत! पण एकंदरीत सुशिक्षिताच्या मनात या प्रयोगशाळेविषयीं असावा तसा आदरभाव नव्हता, एवढें मात्र खरें! या प्रयोगशाळेच्या भोंवती जिकडे तिकडे शेतजमिनी असून या वेळीं त्यातल्या काही उत्कृष्ट पिकानें अलकृत झालेल्या होत्या. शाळेपासून थोड्या अतरावर विहीर असून तिचें पाणी यत्राच्या साहाय्यानें एका लोखडी नळातून धो धो वहात होते. विहिरीच्या पूर्वदिशेला गुराचा गोठा असून तो नेहमींच स्वच्छ रहावा, अशा पद्धतीने बाधलेला होता. पलीकडे एक घर असून तेथे मुलाची शाळा व लहानसा कारखाना होता ज्या तरुण गृहस्थानें ही प्रयोगशाळा स्थापन केली होती, त्याचें नाव जगन्नाथ असे असून तो या वेळी आपल्या प्रयोगशाळेंत काहीं कार्यात दग झाला होता. त्याचे वय या वेळी चोवीस-पंचवीस वर्षांचे असून तारुण्याला शोभण्यासारखेच त्याचे शरीर सुदृढ व निकोप दिसत होतें. सौंदर्याच्या दृष्टीनें तो विशेष सुदर होता असें नाहीं, तरी पण चेहऱ्यात कोणतेंहि व्यग नसल्यानें तो रुबाबदार व करारी दिसे डोळयात विलक्षण तेज असून बुद्धिमत्तेची छटा त्याच्या दृष्टींत होती. वर्णानेहि तो गोरा असून शरीर बाधेसूद होते या वेळी तो धोतर नेसलेला असून अगात स्वच्छ सद्रा होता.

जगन्नाथ या वेळीं आपल्या त्या प्रयोगशाळेंत बसलेला असून त्याच्या समोरच्या खुर्च्यांवर डोक्याला लाल रगाचीं पागोटीं गुंडाळलेले चार मराठे गृहस्थ बसले होते. या सगळयाचे शेतीच्या विषयासबधानें बोलणें चाललें होते. जगन्नाथाला लहानपणापासूनच शेतीच्या धंद्याची हौस होती. त्यात आणखी वडिलांकडून मिळालेल्या प्रोत्साहनामुळें त्यानें याच धंद्याचे शिक्षण चागल्या रीतीनें मिळविण्याचा प्रयत्न केला होता. त्याची मॅट्रिकची परीक्षा झाल्यावर त्याच्या बापानें त्याला शेतीच्या शिक्षणासाठीं अमेरिकेंत पाठविलें होतें व त्याप्रमाणें जगन्नाथानें तेथील शिक्षण मोठ्या आस्थेनें सपादन करून तो हिंदुस्थानात परत आला होता. तो परत येण्यापूर्वींच त्याचा बाप वारल्यामुळें या नव्या धंद्यांत आपण कसे यशस्वी होऊ, ही जगन्नाथाला मोठी काळजी वाटत होती; पण

स्वभावत च तो अत्यत कर्तव्यदक्ष व सदुद्यमशील असल्यामुळें त्यानें निराशा व अपयश या दोहोंसहि अद्यापि दूर ठेविलें होतें स्वत च्या धद्यात केवळ यश मिळविणें, एवढेंच कर्तव्य त्याच्या शिरावर त्याच्या बापानें टाकिलें नव्हतें, तर आपल्याबरोबर आपल्या दरिद्री शेतकरी बाधवाचीहि उन्नति करण्याची जबाबदारी त्याच्या वडिलानीं त्याच्या अगावर टाकिली होती. त्याचे वडील त्याला जें घरगुती शिक्षण देत असत, त्यात ते जगन्नाथाला याच विषयासबधानें कळकळीनें सागत असत. बापाची आज्ञा तर खरीच, पण शिवाय जगन्नाथाच्या अत·करणातही आपल्या दरिद्री शेतकरी बाधवाबद्दल विलक्षण कळकळ व सहानुकपा होती. वस्तुत. त्याची सापत्तिक स्थिति साधारण प्रतीचीच होती, पण तशा स्थितींतही त्यानें या आपल्या बाधवाना शक्य तितकें साहाय्य करण्याचा प्रयत्न आरभिला होता. जगन्नाथाचा हा प्रयत्न कित्येकाना उपयुक्त वाटे, तर कित्येकाना हास्यास्पदहि वाटे.

जगन्नाथाच्या या प्रयोगशाळेंत शेतजमिनींतील मातीचे व त्या जमिनीस मिळणाऱ्या पाण्याचे पृथक्करण करण्याचीं अनेक उपकरणे ठेवलेलीं होती. धान्याच्या उत्कृष्ट बियाचे शेकडो नमुने काचेच्या बरण्यातून ठेवलेले असून गहू, कापूस, ऊस, वगैरे शेंकडों पिकाची हुबेहूब रगाचीं अनेक सुदर चित्रें भितीवर टागलेलीं होतीं. तसेच निरनिराळया देशात शेतीच्या धद्यासाठीं कोणकोणती सुधारलेलीं व नव्या पद्धतीचीं यत्रे वापरतात, त्याचींही चित्रें भिंतीस लावलेलीं होतीं. दिवाणखान्यातील या एकदर वस्तु पाहिल्या म्हणजे शेतीच्या धद्याची ती एक लहानशी प्रयोगशाळाच असावी, असे पाहणाराला लगेच वाटेल. स्वत.च्या जमिनींतले गुणदोष या प्रयोगशाळेंत जगन्नाथ पहात असेच, पण दुसऱ्या कोणी या बाबतीत त्याला सल्ला विचारल्यास त्यालाहि जगन्नाथाकडून योग्य तो सल्ला मिळत असे. याशिवाय गरीब पण निकोप प्रकृतीची चणचणीत, निर्व्यसनी व उद्यमशील अशीं शेतकऱ्याची दहा तरुण मुले आपल्या शेतकीच्या शाळेत त्यानें शिक्षणासाठी ठेवलीं होतीं. या मुलाचा सगळा खर्च जगन्नाथच करीत असे. मळ्यातल्या दरिद्री पण थोर मनाच्या बांधवासमवेत राहणें जगन्नाथाला विशेष आवडत असल्यामुळे तो नेहमीं मळ्यातच रहात असे. रोज दोन वेळां जेवणासाठीं व तसेंच कारण पडल्यास तो गावांतल्या स्वतःच्या घरीं जात असे. त्याची ही शेतजमीन व त्याचा गाव यांत मोठेंसें अतर होते, असें नाहीं. गांवापासून अवघ्या अर्ध्या मैलावर ही शेतजमीन होती. प्रथमपासूनच जगन्नाथाची वृत्ति अगदीं साधी होती. त्यात या शेतीच्या धद्यांत पडल्यापासून तर तो अगदींच साधेपणानें वागत असे. जगन्नाथाच्या या अशा

वृत्तीमुळें गांवांतील अहंमन्य अशा खऱ्याखोट्या श्रीमंतांनीं व विद्वानांनीं जगन्नाथाला अशिक्षित व असभ्य ठरविलें होतें. जगन्नाथही या असल्या श्रीमंतांच्या व विद्वानांच्या वाऱ्यालाहि उभा रहात नसे.

जगन्नाथाच्या समोरच्या खुर्च्यांवर जे चार मराठे गृहस्थ बसले होते, तेहि त्याच्याचसारखे शेतीच्या धंद्यांत उत्साहानें खटपट करणारे असून त्यानीं थोड्या दिवसापूर्वी आपल्या जमिनींतील माती तिचे गुणदोष समजण्यासाठीं जगन्नाथाच्या स्वाधीन केली होती. ती माहिती त्यांना आज देण्याचें जगन्नाथानें ठरविलें असल्यामुळें ते मुद्दाम आले होते. त्यांनीं आणलेल्या मातींत कोणते दोष आहेत व ते घालविण्यासाठीं कोणते उपाय योजिले पाहिजेत, हें जगन्नाथानें त्याना चांगल्या रीतीनें समजावून सांगितल्यावर मुख्य धंद्याच्या उपांगांसबधानें त्याच्या गप्पागोष्टी चालू झाल्या. त्या मराठे गृहस्थातील एकाला आपण थोडे शिकले सवरलेलों आहों, असा अभिमान होता. तो म्हणाला, " दादासाहेब, आम्हां मराठे लोकांत शिक्षणाचा फार अभाव आणि त्यामुळेंच आमच्या लोकांची दुर्दशा झाली आहे "

जगन्नाथ म्हणाला, " पाटील, तुमचें म्हणणें कांहीं खोटें नाहीं; पण साठपाऊणशें वर्षांपूर्वी हें शिक्षण नसताहि तुम्ही मराठे लोक आबादानींत होतां आणि आतां तर थोडे फार शिकलेले लोक तुमच्या समाजांत असूनहि तुमची अशी दुर्दशा कां ? यावरून त्या वेळच्या लोकांना शेतीच्या धंद्याची जी माहिती होती, ती कांहीं आतां तुमच्यांत उरली नाहीं, म्हणजे तुम्ही खरें शिक्षण गमावलें आणि या खोट्या शिक्षणाच्या मागें लागलां ! अहो, कारकून वगैरे तयार करणारे हे कारखाने म्हणजे कांहीं खऱ्या शिक्षणसंस्था नव्हत. शिक्षण संपादन करावयाचें तें ' धनी ' होण्यासाठीं, लोकांचे गुलाम होण्यासाठीं नाहीं. ' आपण धनी आहों ' ही तुम्हां मराठ्यांच्या पूर्वजात जी जाणीव होती, ती नाहींशी होऊन तुमची तरुण पिढी कारकूनगिरीचें म्हणजे गुलामगिरीचें शिक्षण संपादन करूं लागली आहे. अर्थात् यामुळें तुमच्यांत आणि उन्नतींत साहजिकच अंतर पडत चाललें आहे. शिक्षण संपादन करतांना ' मी धनी होईन, ' ही जाणीव अंतःकरणांत सदैव जागृत ठेविली पाहिजे. वास्तविक पाहतां तुमची जन्मभूमि किती तरी संपन्न, सदय आणि उदार आहे, पण अलीकडे तिची सेवा करणें हें तुमच्यांतील पुष्कळ तरुणांना कमीपणाचें वाटूं लागलें आहे. शेतांत योग्य खटपटीनें मुबलक धान्य पिकवून अन्नदाते होण्यात त्यांना अभिमान वाटत नसून कारकुनीपेशानें दुसऱ्यापुढें पदर पसरण्यांत त्यांना भूषण वाटूं लागलें आहे. वास्तविक तुम्हीं हा प्रकार अपमानाचा माना-

वयाला पाहिजे; पण देशाचें दुर्दैव कीं आमची तरुण मंडळी मृगजळाच्या मागें धांवत आहे. ''

बाकीच्या तिघांहि मराठ्यांना जगन्नाथाचें हें म्हणणें पुष्कळसें रुचलें; पण ते शिक्षणाचे अभिमानी पाटिलबोवा थोडेसे नाखुष होऊन म्हणाले, " तर मग तुमचें म्हणणें काय कीं, आमच्या तरुण पिढीनें ' निशाणी नागर ' रहावें ?"

जगन्नाथ हसून म्हणाला, " छे ! छे ! तसें मी केव्हाहि म्हणणार नाहीं. पाटील, शिक्षण हें सर्वांनाच पाहिजे; पण शिक्षण कशासाठीं संपादन करावयाचें, तें मात्र तुमच्या तरुण पिढीनें विसरू नये. आतां कदाचित् तुम्ही असेंही म्हणाल कीं, आम्ही स्वतः शेती करूं आणि आमचीं मुलें शिकून सवरून कारकून वगैरे होतील; पण तुमच्या पश्चात् तुमच्या शेतीच्या धंद्याची काय दशा होईल, याचाही तुम्ही विचार करा. वास्तविक चूक होत आहे ती येथेंच. तरुण पिढीचा उत्साह आणि भावना हीं अशा रीतीनें मलिन झालीं, म्हणजे त्याचा तुमच्या धंद्याला पुढें काहींहि उपयोग होणार नाहीं. मी ' यशस्वी शेतकरी ' होण्यासाठीं शिक्षण संपादन करीत आहें, हें तुमच्या प्रत्येक मुलानें शाळेंत जाण्याच्या पहिल्या दिवसापासून लक्षांत ठेवलें पाहिजे. मला धनी व्हावयाचें आहे, नोकर व्हावयाचें नाहीं, ही भावना केव्हाहि न विसरतां शिक्षण मिळविलें पाहिजे. पाटील, या धोरणानें तुमच्या समाजांतलीं मुलें शिक्षण मिळवीत आहेत कीं काय याचा आता तुम्हीच विचार करा. ''

तो पाटील यावर कांहींच म्हणाला नाहीं. तेव्हा दुसरा मराठा गृहस्थ म्हणाला, " दादासाहेब म्हणतात तेंच बरोबर आहे. आम्हा मराठ्याच्या मुलाप्रमाणें मारवाड्याचीं मुलेंहि शाळेंत जातात; पण त्याना जुजबी लिहिता वाचता आलें कीं, तीं मुलें शाळेला राम राम ठोकून आपल्या दुकानदारीचे शिक्षण मिळवूं लागतात. अलीकडच्या शिक्षणाच्या दृष्टीनें पाहिले, तर मारवाडी समाजहि अशिक्षितच म्हणावा लागेल; पण त्या लोकांची आमच्यासारखी दुर्दशा न होता, ते संपन्न आहेत. ''

जगन्नाथ म्हणाला, "याचें कारण त्यांनीं आपल्या धंद्याचें शिक्षण गमावलें नाहीं. तुमचें मात्र उलट झालें आहे. पूर्वीच्या बुद्रुक माणसांना जी काय शेतीच्या धंद्याची माहिती होती, ती तुम्हीं गमाविली आणि नवीन माहिती मिळविण्याचा प्रयत्नसुद्धां करीत नाहीं."

दुसरा गृहस्थ म्हणाला, "तुम्ही म्हणतां तें खरें, पण अशा प्रकारच्या शिक्षणाची आमच्या देशात काय सोय आहे ? तुम्ही मघा अमेरिकेतल्या शेतीच्या धद्याच्या ज्या अचाट गोष्टी सांगितल्या, त्या आम्हाला खऱ्यादेखील वाटत नाहींत."

जगन्नाथ म्हणाला, "तुम्हाला त्या खऱ्या वाटत नाहींत, पण मी त्या सर्व डोळ्यानींच पाहिल्या आहेत. त्या लोकांची शेतीच्या बाबतीत इतकी उन्नति होण्याचे कारण तिकडे मिळणारें शेतीचें शिक्षण हे तर आहेच, परंतु तिकडचे सरकारहि शेतकऱ्याना फार मदत करते. तसशी मदत इकडचे सरकार करीपर्यंत आम्ही निष्क्रिय होऊन स्वस्थ बसण्याचे काही कारण नाहीं. अमेरिकेंत बहुतेक गांवातून 'शेतकी सुधारणामडळ' म्हणून सरकारी सस्था आहेत असल्या सस्था आमच्या देशात आम्हींच स्थापन करावयाला पाहिजेत स्वार्थत्यागी, स्वतत्रवाण्याच्या, पण मेहनती तरुणांनी असल्या सस्था स्थापन करण्याचा उद्योग आरंभिला, तर थोडे फार त्याच्या पोटाला मिळून देशावरहि फार उपकार होतील. अमेरिकेंतल्या या सस्थाकडे कोणीहि शेतकरी येवो, त्याला योग्य सल्ला व सर्व प्रकारची माहिती अगदीं फुकट मिळते. बी-बियाणें, खत, जमीन, पाणी व यत्रें याची ज्यांना चागली माहिती आहे, असलेच लोक या सस्थातून असतात व ते शेतकऱ्यांना हरघडी हवी ती सल्लामसलत देत असतात तुमच्यांतले शेंकडों तरुण हें शिक्षण सपादन करून जर अशा सस्था स्थापन करतील, तर त्यात तुमचे अधिक कल्याण आहे, की तुमची मुलें कारकून होण्यात अधिक आहे, याचा आता तुम्हीच विचार करा"

जगन्नाथाचा व त्या चार मराठे गृहस्थांचा याप्रमाणें या विषयासबंधाने बराच वादविवाद झाल्यावर त्या मराठ्यानीं मोठ्या आनंदानें जगन्नाथाचा निरोप घेतला आणि ते आपापल्या गांवीं निघून गेले वर दिलेल्या सभाषणावरून जगन्नाथाचे विचार किती उज्वल होते व त्याची वृत्ति कशी बाणेदार होती, याची बरीच कल्पना वाचकांना झाली असेल. हाच जगन्नाथ प्रस्तुत कादंबरीचा नायक होय.

ते चार मराठे गृहस्थ निघून गेल्यावर जगन्नाथहि आपल्या प्रयोगशाळेंतून बाहेर पडला आणि मुलांच्या शाळेंत जाऊन त्यांना नेहमींप्रमाणें दीडदोन तास शेतीच्या विषयाचें शिक्षण दिलें. नतर सगळ्या मळ्यांत हिंडून व पिकांचे निरीक्षण करून तो आपल्या प्रयोगशाळेंत पुन्हां येऊन बसला. तेथें कांहीं प्रयोग करण्यांत तो दंग झालेला असतां वृद्धावस्थेंत नुकतेच पाऊल ठेवलेल्या एका मराठ्यानें एक

पत्र आणून जगन्नाथाच्या हातांत दिलें. पत्रावरील हस्ताक्षर पाहताच जगन्नाथाला साहजिक आनंद झाला व तो मोठ्या उत्सुकतेनें ते पत्र फोडूं लागला. जगन्नाथाचा हा आनद व उत्साह पाहून त्या नोकरास हसू आलें. तो म्हणाला, " दादासाहेब, पत्र पुडलीकरावाचें आहे, असे दिसते ! "

जगन्नाथहि हसत हसत म्हणाला, "होय, त्याचेंच, पण तू रे हें कसें ओळखलेंस ? "

" तुम्हांला झालेल्या आनदावरून ! गृहस्थाचें पुष्कळ दिवसात पत्र आलें नाही ! त्याची आई तर सारखी काळजी करीत आहे !"

या नोकराचे नाव यशवत त्याला सगळे 'येसू' म्हणून म्हणत असत जगन्नाथाच्या वडिलापासून तो त्याच्या घरात नोकरीला होता तो अत्यत विश्वासू, निरलस व गोड स्वभावाचा असल्यामुळें हळू हळू त्याच्यावरचा 'नोकर' हा आरोप जाऊन तो जगन्नाथाच्या कुटुबातलाच एक झाला होता विशेषत. जगन्नाथाला त्यानें आपल्या कडेखाद्यावरून खेळविले असल्यामुळें जगन्नाथासबंधानें म्हाताऱ्याच्या मनात फारच प्रेमभाव उत्पन्न झालेला होता. त्याच्या चोख व प्रेमळ वर्तनावरून जगन्नाथाच्या आज्ञेत तो वागत होता, असे म्हणण्यापेक्षा जगन्नाथच त्याच्या आज्ञेत वागत होता, असे म्हणणे अधिक सयुक्तिक होईल. पुडलिकाचें पत्र आलें आहे, हे ऐकून येसूलाहि फार आनद झाला जगन्नाथाला पत्र वाचण्यास थोडा अवकाश देऊन येसू म्हणाला, " त्यानें पत्रांत काय लिहिलें आहे ?"

जगन्नाथ कांहींसा चिंतायुक्त स्वरानें म्हणाला, " दुसरें काय लिहिणार ? त्यानें आपले गुण मुबईसहि उधळले ! "

येसू आश्चर्यानें म्हणाला, " म्हणजे ? त्यानें काय तटाभाडण केलें कीं काय?"

" अरे, मागें त्या वसताची त्याने जशी कणिक मऊ केली होती, तसलाच कांहीसा प्रकार त्यानें मुबईसहि केला."

" त्यानें पत्रात काय लिहिलें आहे, ते मला वाचून दाखवा पाहू."

जगन्नाथ पत्र वाचू लागला —

" मित्रोत्तम जगन्नाथ यांस,

कृ. सा. न. वि. वि. जी गोष्ट मजकडून होऊ नये म्हणून जपत होतों, ती गोष्ट मजकडून झालीच. तुझ्या म्हणण्याप्रमाणें यापूर्वीच नोकरी सोडून गांवीं आलों असतो, तर बरें झालें असते. अगोदरच मला या शहराचा

कंटाळा आलेला असून त्यांत आणखी खाणावळींतलें अर्धेकच्चें अन्न खाऊन थोडा अपचनाचाहि विकार जडला आहे. माझ्यासारख्या शांत व साध्या वृत्तीनें राहणाऱ्याला मुंबई शहराचा वास म्हणजे एक प्रकारची शिक्षाच होय; झुळझुळ वाहणाऱ्या वाऱ्याच्या लहरी, अनेक प्रकारच्या वृक्षांचीं अरण्यें, खळखळ वाहणाऱ्या नद्या व हिरव्याचार शेतजमिनी, याव्यतिरिक्त असें हें शहर मला खरोखरच अगदीं रुक्ष असें दिसतें; पण मौज ही कीं, कारण नसतांहि या नरकपुरींतच राहण्यात सुख मानणारे शेंकडों मानवी प्राणी मला येथें आढळले. ज्याचें पोट जळत नसेल, त्याची गोष्ट निराळी; परंतु केवळ चैनीसाठीं या शहरांत वस्ती करणारास मी खरोखर नरकांतलाच किडा समजतों. कारण यांच्यामुळें शहरातल्या गरिबाच्या विपत्तींत सारखी भर पडत आहे. निर्वाहाच्या वस्तू एकसारख्या महाग होत असून जागेचीं भाडींही सारखीं वाढत चाललीं आहेत. या साऱ्या अनर्थाचें मूळ श्रीमत आणि त्याची चैन हेंच होय. थोडक्यांत सागावयाचें म्हणजे श्रीमताच्या चैनीसाठी येथल्या गरिबाना प्रत्येक क्षणीं दड भोगावा लागत आहे, पण मौज ही कीं, स्वत:ला गरिबाचे कनवाळु म्हणविणारेसुद्धा याबद्दल कांहींही विचार न करता अवातर सुधारणांतच दग झालेले दृष्टीस पडतात. ते म्हणतात पोटात अन्न नसलें तर नसो, अगावर वस्त्र नसलें तर नसो आणि राहण्यास पुरेशी जागा नसली तर नसो, पण ‘ साक्षरता ’ ही मात्र अवश्य पाहिजे ! एकदरींत येथल्या सभा, सस्था आणि श्रीमत हे गरिबांच्या विपत्तींत सारखी भर घालीत आहेत. गरिबाची येथली राहणी स्वस्त, सोयीची व स्वास्थ्यदायक कशी होईल, याबद्दल येथले दानशूर श्रीमंत आणि विद्वान् समाजसुधारक कधींहि विचार करीत नाहींत. कदाचित् तसे करणें त्याना जरूरीचें वाटत नसावें. एकाद्या श्रीमतानें जर कांहीं हजार रुपये धर्मार्थ दिल्याचें जाहीर झालें, तर असें खुशाल समजावें कीं, आपल्या चाळी वगैरेंचें भाडें यापेक्षां अधिक उत्पन्न होईल इतकें त्यानें वाढविलेलें आहे. सारांश, मुंबई शहर म्हणजे श्रीमतांनीं गरिबांवर जुलूम करण्याचें एक मुख्य ठिकाण आहे. अशा शहरास मी कंटाळल्याबद्दल तू मला दोष देणार नाहींस. अनावश्यक खर्च करणाऱ्या खुशालचदूंची सख्या येथच्याइतकी दुसऱ्या कोठेंहि दृष्टीस पडावयाची नाहीं. असो. अशा अनेक कारणांनीं माझें मन अगोदरच अस्वस्थ झालेलें असतां त्यांत आणखी भरीस भर म्हणून आमच्या

कचेरीचे जुने साहेब जाऊन त्यांच्या जागीं एक नवे साहेब येऊन दाखल झाले ! पूर्वीच्या साहेबांस कारकून वगैरे माणसेच आहेत, असें वाटत होतें, पण या नव्या तरण्या बांड साहेबास ' नेटिव ' हे पशूहून अधिक किंमतीचे वाटत नाहींत. येतां जातां त्याला प्रत्येकानें लवून सलाम करावा लागतो. त्यानें ' गद्धा, रास्कल ' वगैरे शिव्या दिल्या, तरी ' यस् सर ' म्हणावें लागतें. मी कोठीवर असल्यामुळें माझा आणि त्याचा फारसा प्रसग येत नसे, परंतु परवांच्या दिवशीं मुद्दाम कोठी तपासण्यासाठीं म्हणून साहेबमजकूर आले व माझीं पुस्तकें अगदीं चोख असताहि स्वारीनें मधून मधून मला शिव्या देण्यास आरंभ केला. त्याला वाटलें हें घाटावरचें ब्राह्मणाचे पोर आपल्या शिव्या ऐकून खुष होईल, पण त्या शिव्यांमुळें माझ्या तळव्याची आग मस्तकाला गेली ! मीं त्याला प्रथम शिव्या न देण्याविषयीं सागितलें. पण साहेबाला ही गोष्ट अर्थात्च चमत्कारिक व चीड येण्याजोगी वाटली. तो चिडून जाऊन म्हणाला, ' तू इतरापेक्षा अधिक शिव्यांस योग्य आहेस !' त्याबरोबर मी अस्तन्या सारून साहेबाचा हात धरला आणि दिलेल्या शिव्याबद्दल क्षमा मागण्याविषयीं त्याला सागितलें. साहेब अर्थातच लाल झाला. त्यानें आपली मूठ वळली आणि एक जोराचा ठोसा मला दिला मला ही असली ठोसाठोशीची विद्या माहीत असल्यामुळें मीं साहेबाला अलग उचलून खालीं घातले आणि त्याची कणिक चागली मऊ करून तेथून पोबारा केला. मी त्याच वेळीं सापडलों असतो, पण साहेबावर सगळ्याचाच राग असल्यामुळें मला धरण्याचा प्रयत्न कोणींच केला नाहीं तेथून प्रथम मी बिन्हाडी गेलों आणि रोकड खिशांत घालून एका स्नेह्याच्या घरीं जाऊन लपलों. प्रकरण कोर्टात गेल्यास त्याचा परिणाम कदाचित् मला प्रतिकूल असाहि होईल, या भीतीनें पलायनावाचून दुसरा मार्ग दिसेना व म्हणून मी उत्तर दिशेनें प्रवासाला आज रात्रीं आरंभ करणार आहें. घरीं आईला नीट समजावून सांग, नाहीं तर ती रडून रडून गोंधळ घालील. असले मारामाऱ्या करणारे साहेब कोर्टांत केव्हांही फिर्यादीला जात नाहींत, असें सांगतात. पाहूं या काय होतें तें. तूर्त मी कोठें जात आहें, हें अर्थातच तुला कळविणें शक्य नाहीं. कळावें.

तुझा–पुंडलीक."

हें पत्र वाचून झाल्यावर येसू व जगन्नाथ दोघेहि थोडा वेळ स्तब्ध होते. नतर येसू म्हणाला, "दादा, मग त्यानें यांत असें वावगें तें काय केलें? आपला मान आपल्या हातानें राखून घेतला, हें तर त्यानें चागलेंच केलें. नाहीं तर हल्लीं पुष्कळाना आपल्या अब्रूची किंमत ठरवून घेण्यासाठीं कोर्टात जावें लागतें.

जगन्नाथ हसून म्हणाला, "येसू, त्यानें केलें हें योग्यच केलें; पण त्याच्या आईची समजूत आतां कशी करावयाची, हा मोठा प्रश्न आहे. तिला हें सागावें तरी पंचाईत, न सांगावें तरी पचाईत."

"त्यांत एवढी पचाईत कसली आली? मी तिच्या घरीं जाऊन असल्याच विषयाची प्रस्तावना करून तिच्या मनाची तयारी करून ठेवतों तितक्यात तुम्ही तेथें या आणि पत्र वाचून दाखवा. मग काय होईल तें होईल"

जगन्नाथाला येसूचा हा विचार पसत पडला व येसूला पुढें पाठवून नंतर तो थोड्या वेळानें पुडलिकाच्या आईच्या घरीं गेला.

---

## प्रकरण तिसरें.



सुंदरपूर येथील आपल्या स्वत च्या घरात नारायणशास्त्री सकाळीं सात साडेसात वाजण्याच्या सुमारास पूजा करीत बसले होते. हें घर जुन्या कुलीन गृहस्थाच्या घराची उत्कृष्ट साक्ष पटवीत होतें. घराच्या दोन्ही बाजूला अगण असून घर दुमजली होतें. घर पाच खण रुद असून सात आठ खण लांब होतें. आरंभींच अगणांत लहानशी फुलझाडाची बाग असून मध्यभागीं चुनेगची तुळशीचें वृंदावन होतें. वृंदावनाच्या समोरच घराचा मुख्य प्रवेशदरवाजा असून या दरवाजांतून रुंद ओसरीवर प्रवेश होत असे. ओसरीच्या मागें मध्यभागीं लहानसा चौक असून चौकाच्या दोन्ही बाजूंला दोन लहान ओसऱ्या होत्या. त्यामागें मध्यघर, स्वयंपाकघर वगैरे होतीं. चौकाच्या बाजूला असलेल्या ओसरीवर देवघर असून तेथेंच नारायणशास्त्री पूजा करीत बसले होते. त्यांच्याजवळच एक आठ नऊ वर्षांचा मुलगा अगाला भस्म लावून व धाबळी पांघरून दर्भासनावर संध्या करीत

बसला होता. सडासंमार्जन केल्यामुळें सर्व घर अत्यंत स्वच्छ दिसत असून आल्हादकारक वाटत होतें. घरांतील प्रत्येक भागांत रांगोळीचीं कुशलतेनें स्वस्तिकें काढलेलीं होतीं. नारायणशास्त्र्यांची पूजा चालली असताना तेथें एक दहा अकरा वर्षाची सुदर व गोंडस मुलगी आली व तिनें हातात आणलेली फुलाची परडी देवघरांत ठेवली त्या मुलीला पाहून नारायणशास्त्री हसून म्हणाले, " कृष्णे, आज फुलें तर छान आणलींस बैस आता, आणि रंगूची संध्या संपली म्हणजे तुम्ही दोघें मिळून काल सागितलेलीं स्तोत्रें म्हणा."

या मुलीचें नाव कृष्णी. जो मुलगा सध्या करीत बसला होता, त्याचें नाव रंगनाथ दोघाच्या चेहऱ्यांचें सहज निरीक्षण केलें, तर तीं भावडें असावीं असें सहज दिसून येई. दोघेंहि मुलें सतेज, पाणीदार, मोहक व गौरवर्णाचीं होतीं. नारायणशास्त्र्याचें वरील बोलणें ऐकताच ती मुलगी रंगनाथाजवळ हात जोडून बसली व मुलाची सध्या आटोपताच त्या दोघांनीं शकराचार्यांचीं निरनिराळीं स्तोत्रे म्हणण्यास आरंभ केला दोघाचा स्वरोच्चार स्पष्ट, शुद्ध व गोड असल्या-मुळें तीं जोड आवाजाचीं स्तोत्रे फारच कर्णमनोहर होतीं. नऊ वाजण्याच्या सुमारास नारायणशास्त्र्याची पूजा सपून त्यानीं मुलाना तीर्थ दिलें व त्यांच्या हातावर प्रसाद ठेवला प्रसादाचा फन्ना उडवून दोघेंहि तेथून उठलीं व शास्त्री-बोवा येण्याच्या आधींच ओसरीवरील बैठकीवर आपापल्या पाट्यापेन्सिली व अभ्यासाचीं पुस्तकें घेऊन बसलीं. सुमारें अकरा वाजेपर्यंत या मुलांना गणित, व्याकरण व इतिहास शिकवून शास्त्रीबोवांनीं मुलांबरोबर हसण्या खेळण्यास सुर-वात केली. व्यवहारांतल्या अनेक गोष्टी अशा रीतीनें हसून खेळून मुलांना शिक-विण्याची त्यांची रीत होती. नारायणशास्त्र्याचें वय या वेळीं साठीच्या सुमाराचें झालें असून त्यांचे केसहि पिकले होते, पण त्याची शरीरयष्टि मात्र मजबूत व सतेज होती. साऱ्या सुदरपुरांतच नव्हे, तर त्या भोंवतालच्या दहावीस गांवांत नारायणशास्त्री फार विद्वान्, निस्पृह व उदार असल्याबद्दल प्रसिद्धि होती. त्यांचा धदा भिक्षुकीचा खरा, पण सापत्तिक दृष्टया ते श्रीमान् होते, असें म्हणावयाला हरकत नाहीं मात्र आपल्या श्रीमतीचा ते यत्किंचित्हि अभिमान बाळगीत नसत किंवा थोडादेखील डामडौल दाखवीत नसत. ते अगदीं साध्या व सरळ वृत्तीचे होते. घरीं कोणी अतिथिअभ्यागत आल्यास त्याची ते योग्य बरदास्त ठेवीत व त्याला संतोषवून मार्गस्थ करीत. गांवांतल्या लोकांचीहि शास्त्रीबोवांवर फार भक्ति होती व त्यांना त्यांचा थोडा धाकहि वाटत असे. अडचणीच्या

प्रसंगीं कोणासहि शक्य ती मदत करावयाची हा नारायणशास्त्र्यांचा बाणा होता. त्यांना सत्याचा जितका अभिमान वाटे, तितकाच खोट्याचा ते तिरस्कार दर्शवीत. कृष्णा व रंगनाथ या दोघांवर शास्त्रीबोवांचें विलक्षण प्रेम होते, परंतु हीं बहिणभावंडे त्यांच्याकडे कोठून आलीं व त्यांच्याशीं यांचा संबंध काय, याबद्दल गावांतल्या लोकाना साहजिक मोठें आश्चर्य वाटत असे. एक तर अज्ञान अवस्था आणि दुसरें अनेक वर्षांचा सहवास यामुळें या मुलांना नारायणशास्त्री व आपण कोणी परकी आहों, असा कधीं सशयहि येत नसे. यावरून नारायण-शास्त्री या मुलाबरोबर किती प्रेमानें व निष्कपट वृत्तीनें वागत होते, हे कोणा-च्याहि सहज लक्षांत येण्यासारखें आहे.

मुलांबरोबर शास्त्रीबोवा विनोद करण्यांत दग झालेले असता एक चाळीस बेचाळीस वर्षांची विधवा स्त्री ओसरीच्या दाराजवळ आली व आतूनच अत्यत मार्दवानें म्हणाली, " वैश्वदेवाच्या कुंडाजवळ भात ठेवू का ? "

ज्या विधवा स्त्रीनें हा प्रश्न केला, त्या विधवा स्त्रीचें वय बरेंच झालेलें असलें, तरी तिच्या मुखावरील शातभाव व गांभीर्य हीं कायम असून चेहऱ्यावरील टव-टवी मात्र नाहीशी झाली होती. ही स्त्री विशेष गोरी होती, असें नाहीं, तरी पण एक वेळ ती चागलीच रूपवान् असली पाहिजे असे तिला पहाताच वाटत असे. तसेंच नेहमीं वत्सलतेची दृष्टि फेंकणारे तिचे ते डोळे पाहिले, म्हणजे एके काळीं ही स्त्री चागली वैभवसपन्न होती, असें सहज ओळखता येई. गतकाळचे वैभव नष्ट झाल्यामुळें त्याच्या खिन्नतेची छाया आजहि तिच्या चेहऱ्यावर दिसत होती. कृष्णा व रंगनाथ हीं दोन अपत्यें याच स्त्रीचीं होत अर्थात् या स्त्रीचा व नारायणशास्त्री याचा नात्याचा काहींहि सबंध नव्हता ती अनाथ असून शास्त्रीबोवानी तिला धर्माची मुलगी समजून आश्रय दिला होता. त्या विधवा स्त्रीनें वरील प्रश्न केल्यावर ती किंचित् रागावून मुलीला म्हणाली, " कृष्णे, लहान का आहेस, तूं आतां दांडगाई करायला ? जा स्वयंपाकघरांत जा, आणि पाटपाणी ठेव पाहू. "

कृष्णी निमूटपणें हिरमुसलें तोंड करून घरांत गेली. ती गेल्यावर नारायणशास्त्री म्हणाले, " सरस्वती, कृष्णेवर अशी रागावत जाऊं नकोस. ती पोर फारच कोंवळ्या मनाची आहे. आतां ती थोडी मोठी झाली आहे खरी, पण त्याची काळजी तू मुळींच करूं नकोस. तिला डोळ्यांदेखत चांगल्या स्थळीं पडलेली

पहावी, हीच माझी इच्छा आहे. परमेश्वर काय करील तें खरें ! हळूहळू काळ अगदींच चमत्कारिक येत चालला आहे, तेव्हां तिच्या लग्नाचें विशेष लांबणीवरहि टाकण्याची सोय नाहीं माझें आतां वयोमान झालें आहे, म्हणून माझ्या समक्षच काही तरी व्यवस्था केली पाहिजे."

त्या विधवा स्त्रीचें नांव 'सरस्वती' असें होतें, हें आतां वाचकांच्या लक्षांत आलें असेलच घरांतील सर्व मडळी नारायणशास्त्र्यांना 'काका' म्हणून म्हणत असत. काकाचे वरील शब्द ऐकून सरस्वतीचें अत करण गहिंवरून आलें. ती म्हणाली, "पण काका, आम्हीं तरी तुमच्यावर किती भार घालावयाचा? जें मुलीच्या नशिबीं असेल, ते होईल."

नारायणशास्त्री म्हणाले, "सरस्वती, कृष्णीच्या नशिबाविषयीं तुला मुळींच शका नको त्या पोरीला फार चागलें स्थळ मिळणार आहे तेव्हां माझ्यावर भार पडण्याची तुला मुळींसुद्धां धास्ती नको ! याउप्पर परमेश्वराची मर्जी ! त्याच्याच इच्छेनें व्हावयाचें ते होईल आतां योग्य मार्गावर पाऊल टाकणें एवढेंच आपलें कर्तव्य. तू आपल्या मुलांना घेऊन माझ्या घरीं आल्यापासून माझे दिवस किती तरी सुखानें चालले आहेत ईश्वरानें खरोखर तुझ्या पोटीं हीं दोन रत्नेंच दिलीं आहेत या गांवात माझें सगळें आयुष्य गेलें, पण ज्यांच्या वर्तनानें आनंद व्हावा अशीं दहापांचच मुलें मला आढळतात एक सत्यभामेचा पुंडलिक, यमूचा जगन्नाथ आणि तुझीं हीं दोन मुलें एवढा मोठा गांव, पण कर्तव्यनिष्ठ व सदुद्यमशील असें एकहि पोर मला दिसत नाहीं. उलट काहीं कांहीं श्रीमताच्या मुलाचे वेडेचार पाहिले, म्हणजे मला भीति वाटते. त्याचा तरी काय दोष ? वडील माणसांचा कित्ता तीं गिरवितात ! अब्रूनें दिवस गेले म्हणजे मिळविलें, असा काळ सध्यां आला आहे."

सरस्वती म्हणाली, "त्याची काळजी आपण कशाला करावी ? कालचक्र ज्याच्या हातांत आहे, तोच आतां काय करील तें खरें !"

"होय, तो योग्य तेंच करील. त्याच्या दरबारात अजून अन्यायाचें आणि पक्षपाताचें पाऊल पडलें नाहीं, म्हणून तर जग चाललें आहे. प्रत्येकाचा हिशोब कसा ततोतंत चुकता होत आहे ! आणि असें जर झालें नाहीं, तर देव, धर्म वगैरे सर्व मिथ्या होत, असें मीदेखील म्हणेन !"

" छेः, काका, कांहींदेखील मिथ्या नाही पुष्कळ वेळां असत्याचा जयजयकार झाला असें वाटते खरें, पण तो आमचा भ्रम होय. हे असले जयजयकार सत्याच्या वरवंट्याखालीं केव्हा ना केव्हातरी चिरडतातच !"

सरस्वतीचें हें भाषण ऐकून व त्या वेळचें तिच्या मुखावरील तेज पाहून वृद्ध काकांना सकौतुक गहिंवर आला. ते म्हणाले, " सरस्वती, परमेश्वरावरील तुझी भक्ति आणि सत्यावरील तुझा अढळ विश्वास पाहून तुम्ही माझ्या आश्रयाला नसून मीच तुमच्या आश्रयाला आहे, असें मला वाटते. माझें पूर्वजन्मीचे सुकृत म्हणून तुम्हा सर्वांचे पाय माझ्या घराला लागले ! तुझी ही श्रद्धा आणि भक्ति पाहून माझें अंतःकरण आनंदानें भरून जाते ! "

सरस्वती या स्तुतीनें गांगरली ! ती म्हणाली, " काका, तुमच्या पायधुळीइतकी-देखील माझी योग्यता नाहीं. बरें, ते असो आता जेवायला चला, नाहीं तर स्वयपाक निवून जाईल. "

नारायणकाका रंगनाथासह उठले व वैश्वदेव करून जेवावयाला बसले रंगनाथ व कृष्णी याचीं पानेंहि त्याच्याजवळच माडलीं होतीं विनोदपर पण उपदेशाच्या गोष्टी मुलाना सागून हसत हसत ते जेवीत होते इतक्यांत एक प्रौढ विधवा स्त्री पिकलेल्या दहावीस आंब्याची टोपली घेऊन आंत आली. तिला पहाताच सरस्वती म्हणाली, " या सत्यभामाकाकू, बसा रोज रोज आंबे कशाला ? "

आलेली विधवा स्त्री पन्नाशीच्या सुमाराची असून तिचें शरीर मजबूत होतें ती वर्णानें काळीसावळीच होती, पण बांध्यानें मात्र सुबक असून तिचा चेहरा गंभीर व उदात्त होता. या स्त्रीचें नाव सत्यभामा खाली बसतां बसता ती म्हणाली, " कशाला म्हणजे खायला. बरी वेळेवरच आल्ये दे, काकाना नी मुलाना आंबे कापून दे. हे आंबे कापून खाण्यासारखे आहेत चारसहा दिवसापूर्वी दिले होते, ते इतके उत्तम नव्हते. हे आंबे तरी काकाचें नाव सांगितलें म्हणून राहिले, नाहींतर पोराबाळानी केव्हाच फस्त केले असते. "

आंबे कापीत असतां सरस्वती म्हणाली, " काकूंचें घर म्हणजे गांवांतल्या गोरगरिबांचें माहेरघर ! या आपल्या दिवसभर दुसऱ्यांसाठीं खपत असतात."

सत्यभामा म्हणाली, " सरस्वती, मानले तर परके, नाहींतर सगळे आपलेच आहेत. खाऊ दे, बिचाऱ्याना. त्याच्या नशिबानें पुष्कळ मिळो आणि ते खुशाल हवें तेवढे खावोत. शाळेचा रस्ता पडला माझ्या घरावरून. तेव्हां गरिबांचीं मुलें

येतात नी हक्कानें खाऊ मागतात. त्याना नाहीं द्यावयाचें, तर मग कोणाला द्याव-याचें ? देवाच्या दयेनें पुंडलिकाचा पगारहि आता वाढला आहे. माझ्या म्हाता-रीच्या पोटाला असे कितीसें लागणार ? गरीबाचा परामर्ष घेतला, तर तो देवाच्या घरीं रुजू तरी होईल. आता उनाड आणि श्रीमतांच्या डामडौली पोरांना मात्र मी दारांत देखील उभें करीत नाहीं. गावातल्या काहीं काहीं पोरांचे वेडेचार ऐकले म्हणजे मला फार राग येतो, पण करणार काय ? मुलें म्हटलीं म्हणजे धिंगामस्ती ही करणारच, पण त्याच्या अगीं असला दुष्टपणा नाहीं उपयोगाचा. लोकांचें नुकसान करावयाचें, गरिबाना त्रास द्यावयाचा, हे कोठले खेळ ? " नतर नारायणशास्त्र्याकडे वळून सत्यभामा म्हणाली, " काका, आबे कसे आहेत ? "

काका म्हणाले, " उत्कृष्ट आहेत. हीं बापूनीं लावलेलीं झाडें ना ? "

सत्यभामा म्हणाली, " होय. त्यानीच लावलेलीं. त्या वेळीं तुम्ही नी तुमचे जांवईबुवा यांनीं खटपट केली, म्हणून माझे नी माझ्या पुडलिकाचे पाय जमि-नीला लागले. नाहींतर आजमितीस आम्ही देशोधडीला लागलो असतों."

काका म्हणाले, " तुझें जें न्याय्य होते ते तुला मिळवून दिलें, यात आम्हीं कर्तव्यापेक्षां अधिक ते काय केलें ? आणि परमेश्वराची तुझ्यावर कृपा म्हणून त्यात आम्हाला यश आलें. बरें ते जाऊ दे, आता त्या गोष्टी काढण्यात काय अर्थ ? तुझा पुडलिक शहाणा निघाला, यांतच सर्व कांहीं मिळालें असें समज."

" तुम्ही म्हणता पुडलिक शहाणा निघाला म्हणून, पण तुमचा नातू जगन्नाथ आणि माझा पुंडलिक याना पाण्यात पहाणारे गांवात काही थोडे थोडके नाहींत ! 'तो जगन्नाथ ब्राह्मण कसला ? मराठा आहे, मराठा !' असे काहीं लोक म्हणतात, हें तुम्हाला माहीत आहे ना ? 'खाऊन खाऊन दोघेहि रेड्यासारखे माजले आहेत; पैलवानासारखीं शरीरे तयार करून पोळासारखे हिंडतात !' हे व अशा प्रकारचे लोकप्रवाद तुमच्या कानावर येत नसतील असें थोडेंच आहे त्याचें अगदीं साध्या पोशाकानें राहणें व गोरगरिबांना मदत करणे यावरदेखील थोडी टीका होत नाहीं ! "

काका म्हणाले, " सत्यभामा, हें असें चालणारच. एकादा स्तुति करील तर दुसरा एकादा निंदा करील. पण मला स्वत.ला जर विचारशील, तर दोन्ही मुलें चांगलीं निघालीं, असेच मी म्हणेन. दोघेही आपापल्या कर्तृत्वशक्तीनें पोटाला

मिळवून आल्यागेल्याचा सत्कार करितात, गोरगरिबांना शक्य ती मदत करितात आणि उगीच मोरासारखे नटून थटून टिवल्याबावल्या करीत हिंडत नाहींत. यापेक्षां अधिक काय पाहिजे? आणखी थोड्या दिवसांनीं मी पुडलिकालाहि नोकरी सोडावयाला लावून या शेतीच्याच धंद्यांत घालणार आहें.'

"त्यानें काय करावयाचें आणि काय नाहीं, हे सगळें मीं तुमच्यावरच सोंपविलें आहे. बरें, जातें आता."

सरस्वती म्हणाली, "आतां येथेंच दोन घांस खाऊन जा."

"छे, छे! देवळात दोन पाथस्थ ब्राह्मण उतरले आहेत, त्याना जेवावयाला बोलाविलें आहे." असें म्हणून सत्यभामा आपल्या घरीं गेली.

* * * *

सुंदरपूर हा गांव साधारणपणें लहानसाच असला तरी तो बराच रमणीय व स्वच्छ आहे. गांवाजवळून नदी वहात असून शिवाय सभोंवतीं सर्व बागाइती शेतजमिनी असल्यामुळें गांव नेहमीं रमणीय दिसतो. गावांत पाढरपेशा लोकांची वस्तीहि बरीच आहे, इग्रजी तीन वर्गांचें व मराठी पूर्ण शिक्षण देणारी शाळा, पोस्ट ऑफीस, तार ऑफीस, मामलेदार कचेरी, व अर्धेमुर्धें दिवाणी कोर्ट इतक्या सोयी या गांवीं आहेत; पण आतां आपण 'होत्या' असेंच म्हणूं. कारण त्यानें सुंदरपूरसारख्या रमणीय गांवीं जाण्याचा लोभ कोणास होणार नाहीं. दिवाणी कोर्ट अर्धें होतें याचा अर्थ तें कांहीं दिवस या गांवीं व काहीं दिवस सुदरपूरपासून पधरावीस कोसावर असलेल्या चदनवाडी नांवाच्या गांवीं असे. चदनवाडी हा गांवहि सुदरपूरप्रमाणेंच स्वच्छ व हिरवागार होता. तेथेंहि वर सांगितलेल्या कचेऱ्या वगैरे होत्या. चदनवाडी हें इनाम गांव असून एके काळीं तें बरेंच लहान होतें; परंतु या गावीं आगगाडीचें स्टेशन झाल्यापासून तें पूर्वीपेक्षां दुपटीनें वाढलें. हळू हळू तेथील व्यापार वाढत गेल्यामुळें वर सांगितलेल्या सर्व कचेऱ्याहि तेथें आल्या.

सुदरपूर येथें विठ्ठलराव व भगवंतराव या नांवाचे दोन सख्खे भाऊ होते. दोघेहि घरचे खाऊन पिऊन सुखी असून दोघांनाही बाहेरगांवीं नोकऱ्या होत्या. सुदरपूर गांवीं दोघांची मिळकत समाईक असली तरी नोकरीपेशामुळें दोघांनाहि दोन दिशेला जावें लागलें. भगवंतराव हे विठ्ठलरावांचे धाकटे बधु. याच भगवंतरावांची सत्यभामा ही पत्नी होय. विठ्ठलरावांना मामलेदारीची

नोकरी असून भगवतराव कलेक्टर कचेरींत चिटणीस होते. विठ्ठलरावांना एक मुलगा असून त्याचें नांव वसंत असें होतें. भगवतरावासहि एक मुलगा होता. त्याचें नांव पुडलिक. वसंत पुडलिकापेक्षां दीड दोन वर्षांनीं मोठा होता. विठ्ठलराव आणि भगवतराव हे दोघे सख्खे बधु खरे, परंतु दोघात प्रेमभाव जसा असावयास पाहिजे होता, तसा नव्हता विठ्ठलराव सुधारणेचे चाहते असून भगवतराव हिंदु सस्कृतीला चिकटून राहणारे होते विठ्ठलरावाचा स्वभाव बराच लोभी व क्षुद्र असून स्वत चे नाव सर्वत्र गाजावें म्हणून ते बरीच खटपट करीत असत. तसेंच घरींदारीं सगळीकडे सुधारकी पद्धतीने राहणे त्याना विशेष अभिमानाचें वाटत असे. भगवतरावाचें राहणें याहून वेगळें होते. त्यांची वृत्ति साधी असून डामडौलाचा त्यांना स्वभावत च कटाळा होता. मनानें ते उदार असून हातानेंहि सढळ होते. पुण्यास चिटणिशीच्या नोकरीवर असतांना एकाएकीं ते विषमज्वरानें आजारी पडले आणि त्यातच त्याचा अत झाला या वेळीं पुडलिकाचें वय अवघें सहासात वर्षांचे होते. बिचाऱ्या सत्यभामाबाईवर तर ही एक आकाशातून कुऱ्हाडच पडली होती, परंतु तिचे वडील दीर विठ्ठलराव सातारा जिल्ह्यातील नोकरीवरून धावून आले आणि सत्यभामेचे सात्वन करून तिला पुडलिकासह आपल्या नोकरीच्या गावीं घेऊन आले. विठ्ठलरावाच्या अत करणात एकाएकी हा दयेचा पाझर उत्पन्न झालेला पाहून पुष्कळाना आश्चर्य वाटले, पण त्यात आश्चर्य करण्यासारखे काही नव्हते. पाठच्या बधूची पत्नी व मुलगा याविषयीं त्याच्या अतःकरणात दया उत्पन्न होणें साहजिक होते 'चिटणिशीचें काम करीत असताना बधु वारला, तेव्हा त्याच्या जवळ निदान पाचसहा हजार रुपये तरी असतील, या आशेनें विठ्ठलराव धावले,' असेही कांहीं लोक म्हणत; पण यात तथ्यांश किती होता, तें विठ्ठलरावाशिवाय इतराना कसें समजणार ? 'भगवतरावांचा मुलगा अज्ञान आहे, तेव्हां त्याच्या शिक्षणाची योग्य काळजी घेण्यासाठीं ही सर्व व्यवस्था विठ्ठलरावांनीं केली,' असेंसुद्धां कित्येक म्हणत; तर 'मुलगा अज्ञान आहे, तोंच वडिलार्जित मिळकतीची योग्य व्यवस्था लावण्यासाठीं विठ्ठलरावांना दयेचा पाझर फुटला!' असेहि कोणी म्हणत. कसेंहि असलें, तरी अनाथ झालेल्या सत्यभामेला या दिराशिवाय दुसरा आसरा नव्हता, व तो त्यानें दिल्याबद्दल तिला उपकाराचें मोठे ओझें वाटू लागलें. शिवाय यामुळें मुलाच्या शिक्षणासंबधाची तिची काळजीहि बरीच दूर झाली, असे तिला वाटलें. कारण, विठ्ठलरावांचा मुलगा वसंत पुडलिकापेक्षा अवघा दीड दोन वर्षांनींच

मोठा असल्यामुळें त्यांच्याबरोबर आपल्या मुलाचाहि विद्याभ्यास होईल, अशी तिला आशा होती. सत्यभामेचे कांहीं दिवस विठ्ठलरावांकडे फारच चांगल्या रीतीनें गेले. विठ्ठलरावांची पत्नीदेखील सत्यभामेशीं अत्यत प्रेमळपणानें वागत असे, परंतु सुमारें वर्षभराच्या आंतच सत्यभामेजवळची रोकड विठ्ठलरावाच्या हातानें एका ब्यांकेंत सुरक्षित जाऊन पडल्यावर विठ्ठलराव व त्यांची पत्नी या दोघांच्याहि अंतःकरणांतले दयेचे झरे सुकत चालले ! आतां हे झरे अगदींच सुकण्यासारखे नव्हते, हेंहि लक्षात ठेवण्यासारखें आहे. कारण कांहीं झालें तरी पाठच्या भावाच्या बायकोविषयीं व मुलाविषयी अगदींच कोरडें ठणठणीत अतःकरण कसें होईल ? शिवाय सत्यभामाहि आळशी नव्हती. पहांटे पांच वाजतां उठल्यापासून तों रात्रीं दहा अकरा वाजता आथरुणाला पाठ लागेपर्यंत घरातील कामे तिला पुरवत असत. आता विठ्ठलरावाची बायको म्हणजे बसून दिवस काढीत असे, असें नाहीं, पण ती पडली मामलेदाराची बायको ! लोक नावें ठेवणार नाहींत, या बेतानें तिला साहजिक वागावें लागे घरातल्या साहित्यावर नजर ठेवावयाची, जाऊ व पुतण्या यावर देखरेख करावयाची, दागिन्याची पेटी वारंवार उघडून तपासावयाची वगैरे अनेक कामे करता करता ती बिचारी मेटाकुटीस येत असे ! घरात स्वयंपाकाला बाई व भाडी वगैरेंसाठीं मोलकरीण ठेवावयाची म्हटली तर मामलेदारीचा पगार तो किती ? शिवाय वरकड प्राप्तीहि म्हणण्यासारखी नव्हती. महिन्याच्या काठी शेदोनशें रुपये मिळाले, म्हणजे फार झालें. अशा अडचणीच्या सांपत्तिक स्थितींत पाठचा भाऊ नाहींसा झाल्याबद्दल विठ्ठलरावाना फार वाईट वाटलें; पण दु खात सुख एवढेच कीं, स्वयपाकीणबाईची व मोलकरणीची काळजी दूर होऊन सत्यभामेनें स्वत च तीं कामें अगावर घेतलीं. अर्थात् सत्यभामेबद्दल दोघाच्याहि मनात प्रेम असणें साहजिक होते. वस्तुस्थिति अशी असली तरी विठ्ठलरावाची पत्नी सत्यभामेला हिडीसपिडीस करीत असे हे खरें; पण तेवढयावरून सत्यभामेनें काहीं निराळा अर्थ मनात आणावयास नको होता; कारण ज्याना दक्षतेनें वागावयाचें असतें, त्याना दुसऱ्यावर करडी नजर ठेवल्यावांचून कसें चालेल ? हळूहळू जावेच्या या वागण्याने आपण येथें स्वयपाकीण व मोलकरीण आहों, अशी सत्यभामेची समजूत झाली. तिला याबद्दल फार वाईट वाटे, दिराचा व जावेचा फार रागहि येई, पण करणार काय ? आपल्या मुलाचें शिक्षण व्हावयाचें आहे, इकडे लक्ष देऊन ते सगळे दुष्ट ती निमूटपणें सोशीत होती. हळू हळू ही मुलाच्या शिक्षणाची तिची आशाहि लवकरच नष्ट झाली. आपल्या

मुलाला शाळेचें दर्शन होतें खरें, परंतु ते वसंताचें पाटीदप्तर आणण्यानेण्यासाठीं होतें, शिक्षणासाठीं नाहीं, हें जेव्हां सत्यभामेच्या लक्षांत आलें, तेव्हा मात्र तिचा शांत स्वभाव बदलत जाऊन तो चिडखोर व सतापी बनू लागला मामलेदारसाहेबाच्या बैठकीवरील किरकोळ कामें करण्यासाठीं ज्या शिक्षणाची आवश्यकता होती, तेंच शिक्षण विठ्ठलराव पुडलिकाला देत होते विठ्ठलराव व वसत याच्यापुढें चहा आणून ठेवणें, त्यांचीं पत्रें पोष्टांत टाकणें, टेबल खुर्च्या झाडून पुसून स्वच्छ ठेवणें, असलीं महत्वाचीं कामे लहान पुडलिकाला चागली करता येतात, हे पाहून विठ्ठलराव व त्याची पत्नी याना पुडलिकाविषयीं मोठें कौतुक वाटे, परंतु तीं कामें करताना पुंडलिकाला पाहून सत्यभामेचें अत करण मात्र पिळवटून निघे. त्यांत आणखी वसताचें व पुडलिकाचे चागलेंसें जमतही नव्हतें. वसत म्हणजे श्रीमताचा व त्यातून सुशिक्षिताचा मुलगा, तेव्हां त्याचें शरीर नाजुक असणें साहजिक होतें. पुडलिक मात्र हाडापेरानें मजबूत असून त्याच्या दिलदार स्वभावामुळें व क्रीडापटुत्वामुळें तो जवळपासच्या मुलांस अर्थातच आवडता झाला होता बुद्धीहि सतेज असल्यामुळें चोरूनमारून तो आपला अभ्यास चटकन् तयार करीत असे वसत श्रीमताचा मुलगा. अर्थात् गरिबाच्या मुलांचा तिरस्कार करण्याचा सद्गुण त्याच्या अगीं विधिदत्तच होता ! या सद्गुणाचें प्रदर्शन करण्यासाठी त्याला गरिबाच्या मुलांत वारवार जाऊन खेळण्याचा लोभ उत्पन्न होई, परतु मुलेंच तीं ! अनेक प्रसगीं वसताला त्याच्या या सद्गुणाचें बक्षिस त्याच्याकडून असे झणझणीत मिळे कीं, त्याला रडत रडत घर गाठून आईबापाकडे फिर्याद करावी लागे ! पुष्कळ वेळा हे बक्षीस देण्याचा मान पुडलिकालाहि मिळाला होता ! वसताच्या आश्रयानें राहून वसंतावरच कुरघोडी करणाऱ्या पुडलिकाला घरीं आल्यावर वसताच्या आईकडून अर्थातच सव्याज बक्षिस मिळत असे. अशा वेळीं सत्यभामाबाईचा जीव अगदीं कळवळून येई, परंतु निरुपाय म्हणून ती मूग गिळून स्तब्ध राही. वास्तविक पुडलिकापेक्षां वसंत दीड दोन वर्षांनीं मोठा होता. खाणेंपिणेंहि त्याला वेळच्या वेळीं मिळत असे; परंतु पुडलिकाबरोबर दोन हात करण्याची त्याला जर लहर आली, तर त्यात त्याचा हटकून पराभव होत असे. तरी पण पळता पळता तो पुंडलिकाला चिमटे घेऊन किंवा ओरबाडून पळत असे. एकदा वसंतानें सधि साधून पुडलिकाच्या मागून हळूच येऊन त्याला चावण्याचा प्रयत्न केला. परंतु पुंडलीक चपळ असल्यामुळें त्यानें झटकन् वसंताला दूर ढकललें. त्याबरोबर वसंताची हाडकुळी

देहयष्टी वाऱ्यानें उडावी तशी रस्त्यावर जाऊन पडली. झालें, लगेच वसंतानें भोंकाड पसरलें. भारतीय युद्धाच्या वेळीं शंखनादानें जसे वीरांचे बाहु स्फुरण पावले, त्याप्रमाणें या वेळी वसंताच्या आईचे बाहू स्फुरण पावले आणि तिनें पुडलिकाला धरून मार देण्यास आरंभ केला. वीररसानें बेहोष झाल्यामुळें आपण काय करीत आहो, याचें तिला भानहि नव्हतें. तिनें पुडलिकाचा कान इतक्या जोरानें पिरगळला कीं, त्यातून रक्त आलें. पुडलिकानें आणखीहि मार खाल्ला असता, परंतु हा प्रकार पहाणाऱ्या सत्यभामेला आता शांत राहणें अशक्य झालें. पुडलिकाची ती दुःस्थिति पाहून तिचीं आतडीं पिळवटलीं. तिला वसताच्या आईचा विलक्षण सताप आला. इतके दिवस सहन केलेलें दु ख आज तिला असह्य होऊन तिनें आपला तेजस्वी स्वभाव प्रकट केला. धावत जाऊन तिनें पुडलिकाला जावेच्या हातून सोडविलें आणि सतापानें फणफणून ती म्हणाली, "खबरदार, माझ्या पोराच्या अगाला हात लावलास तर ! मी आज वर्षभर पाहत्यें आहें, त्याला तू अगदीं खाऊ कीं गिळू करीत आहेस बाई, असा आम्हीं तुझा अपराध तरी काय केला ?" असें म्हणताच सत्यभामेचे डोळे पाण्यानें भरून आले. पुडलिकाच्या कानाचे रक्त लुगड्याच्या पदरानें पुसून ती मोठ्यानें पुटपुटली, "राक्षसिणीचा हात माझ्या लाडक्याचा कान पिरगळण्याला धजला तरी कसा ?"

अनाथ जावेला इतके दिवस आश्रय दिलेला, असें असता तिनें आपणास 'राक्षसीण' म्हणावें, हें विठ्ठलरावाच्या स्त्रीला सहन झालें नाहीं. ती चवताळून म्हणाली, "माझें खाऊन मला राक्षसीण म्हणत्येस होय ? आत्ताच्या आत्ता माझ्या घरातून चालती हो ! यापुढें येथलें अन्न खाशील तर आमची विष्टा खाशील !"

"मी आजपर्यंत विष्टा खाल्ली नाहीं आणि पुढेही तसला प्रसग परमेश्वर माझ्यावर आणणार नाहीं. माझे पाच हजार रुपये ज्यानीं गिळकृत केले, त्यांनाच तिची चव माहीत ! सकाळपासून सध्याकाळपर्यंत मरमर मरत होतें आणि खात होतें, कांहीं फुकट खाल्लें नाहीं, आणि पुढच्याबद्दल म्हणशील तर माझीहि आतां यापुढे येथें पाणीसुद्धा पिण्याची इच्छा नाहीं. असल्या नरकपुरींत राहण्यापेक्षां धर्मशाळेंत राहिलेलें पत्करलें. ज्यानें चोंच दिली, त्यानें चाराहि पण दिला आहे."

असें म्हणून सत्यभामा खरोखरच पुडलिकाला घेऊन विठ्ठलरावांच्या घराबाहेर पडली ! स्वतःचे दागदागिने, पुडलिकाच्या अगावरचें किडुकमिडुक व थोडी फार

रोकड हीं तिनें ज्या पेटींत ठेवलीं होतीं, ती तिनें घेतली आणि नीट स्टेशनवर येऊन ती सुदरपूरला गेली.

सुदरपूरला येईपर्यंत आपलें कसें होईल याची सत्यभामेला विशेष काळजी वाटली नाही, परंतु गावांत येऊन दाखल झाल्यावर पुढें काय करावयाचें याची तिला खरोखरच काळजी वाटूं लागली. गांव स्वत चा खरा, पुष्कळ दिवस ती तेथे राहिलेली असल्यामुळें अनेक कुटुबाशीं तिच्या ओळखी होत्या, हेंहि खरें. पण कोणाच्या घरीं जावे आणि कोणाचा आश्रय मागावा, याची तिला आतां काळजी वाटूं लागली. इतक्यांत तिला नारायणशास्त्र्याची आठवण झाली! गृहस्थ अत्यत सज्जन आणि आपल्या पतीचा व त्याचा स्नेहसबधहि फार चागला होता, हें जेव्हा तिला आठवलें, तेव्हा त्याच दिशेनें चालण्यास तिनें आरंभ केला. दिवस माघ महिन्याचे असून वाद्याच्या गजरावरून गावांत लग्नमुजींची बरीच गडबड असावी, असें तिला वाटलें. ती चालली असतां एका घरातून चारपाच स्त्रिया उंची वस्त्रें नेसलेल्या व अगावर बरेच दागदागिने घातलेल्या तिच्यासमोरूनच बाहेर पडल्या. त्याच्या बोलण्याचालण्याच्या घाईवरून मागलिक कार्याच्या गडबडीत त्या असाव्यात हें सहज ओळखतां येत होतें. एक विधवा स्त्री अगावर ताबड्या लुगड्याची चौघडी पाघरून व एका हातात पेटी व एका हातात आठ वर्षांचा मुलगा घेऊन चाललेली पाहून या चारपाच सधवा स्त्रियातील एका स्त्रीला कसला तरी सशय आला व ती चटकन् पुढे आली. त्या स्त्रीला पाहताच सत्यभामेनें हातांतली पेटी टाकून दिली व ओकसाबोकशी रडूं लागली. त्या स्त्रीची अवस्थाहि तशीच झाली. तिनें आपल्या दोन्ही हातांनीं सत्यभामेला कवटाळलें व तीहि रडूं लागली. बाकीच्या स्त्रियांनीं त्या दोघींनाहि घरात आणलें व तेथे आल्यावर लवकरच दोघींचें दु ख थोडें कमी झालें. ती स्त्री स्फुदत स्फुदत म्हणाली, "झालें तें झालें. तें कोणाच्या स्वाधीन का आहे? भगवतराव म्हणजे एक लाख माणूस! पण काळाला पहावलें नाहीं! म्हटलें, विठ्ठलराव तुला मुजीसाठीं पाठवितात कीं नाहीं, कोण जाणे; पण त्यांनीं एकदांचें पाठविलें. त्यांनीं आमच्यावर उपकारच केले म्हणावयाचे. बरी वेळेवरच आलीस." असें म्हणून त्या स्त्रीनें पुडलिकाला कुरवाळून त्याचा मुका घेतला आणि ती म्हणाली, "उन्हानें पोर अगदीं सुकून गेलें आहे! जा, सत्यभामा, आंघोळ कर आणि त्याला आधीं कांहीं खायला घाल. भामा, हें याच्या कानाला ग काय झालें? पोराचा कान कशानें एवढा सुजला?"

हा प्रश्न ऐकून सत्यभामा पुन्हा रडू लागली. ती म्हणाली, " यमूताई, अगोदर एका बाजूला चल, म्हणजे तेथें मी तुला सगळें कांहीं सांगतें." कांहीं तरी निराळाच प्रकार आहे, हें यमुनेनें तेव्हाच ओळखलें एका बाजूच्या खोलींत गेल्यावर सत्यभामेनें यमुनेला सगळी हकीकत सांगितली. ती हकीकत ऐकून यमुनेचें अंतःकरण कळवळून आलें. चार धैर्याच्या गोष्टी सांगून ती म्हणाली, " तर मग मुंजीचें आमंत्रण तुला मिळालेंच नाहीं ? "

" छे ! मला त्यांनीं एक अक्षरदेखील सांगितलें नाहीं. अगदीं कडेलोट झाला, तेव्हांच मला दिराचें घर सोडणें भाग झालें. लोकलज्जेस्तव इतके दिवस सगळें कांहीं सहन केलें, पण शेवटीं तिनें घरांतून जा म्हणून सांगितल्यावर मग तेथें राहण्यात तरी काय अर्थ ? तुझ्या वडिलाच्या–नारायणशास्त्र्याच्या–आश्रयानें राहून दिवस कंठावे म्हणून त्याच्या घराकडे निघालें होतें, तों वाटेत तूं भेटलीस."

यमुना म्हणाली, " त्यांचें घर आणि माझें घर हीं तुला सारखींच आहेत. मी आता माझ्या घरातून तुला मुळींसुद्धा हलूं देणार नाहीं. घर माझें नाही, तुझें आहे. अगदीं मालकिणीसारखें रहावयाचें. जसा तुझा पुंडलिक तसा माझा जगन्नाथहि तुझाच आहे. परकेपणाची कल्पनादेखील मनांत आणावयाची नाहीं. अगोदर अंग धुवून तू पुंडलिकाला खाऊ घाल. सोन्यासारखा मुलगा, पण त्याची अगदीं माती झाली !" असें म्हणून यमुना सत्यभामेला स्नानगृहात घेऊन गेली.

---

## प्रकरण चवथें.

—.०.—

यमुना ही नारायणशास्त्र्यांची मुलगी. तिला त्यांनीं गांवांतच दिलें होतें. तिच्या नवऱ्याचें नांव विनायकराव. विनायकराव हे स्वतंत्र बाण्याचे गृहस्थ असून त्याची घरची स्थितीहि चांगली होती. शिक्षण संपादन करून ते एम्. ए. एल्एल्. बी झाले होते, व त्यांना मुनसफीची नोकरीहि मिळाली होती. नोकरीवर असतांना उत्तम न्यायाधीश म्हणून त्यांची सर्वत्र प्रसिद्धी झालेली होती. स्वभावतःच त्यांची वृत्ति दिलदार असल्यामुळें गोरगरिबांना ते पुष्कळ मदत करीत. जगांतल्या एकंदर घडामोडींवरून शिक्षणाच्या बाबतींत निष्कर्ष काढण्याचा त्यांना प्रथमपासून नाद होता, व त्यासाठीं ते फार परिश्रमपूर्वक माहिती

मिळवीत. याप्रमाणें त्यांनीं अनेक दिवस परिश्रम केल्यानंतर त्याची अशी दृढ समजूत झाली कीं, हल्लींच्या शिक्षणपद्धतींत पुष्कळ दोष आहेत आणि त्यामुळें तरुण पिढी शक्तीनें कमकुवत व मनानें दुर्बळ अशी होत चालली आहे. नैतिक बल न वाढता तिची दानत जी अधोगामी होत चालली आहे, त्याचें कारण ही शिक्षणपद्धतिच होय, अशी त्यांची पक्की खात्री होत चालली होती. अंत.करणात स्वार्थमूलक भावनाचे प्राबल्य वाढावें, डामडौल, ऐट व नटवेपणा यातच मनुष्यत्वाचे सर्वस्व एकवटलेलें दिसावें, हे मुख्य दोष हल्लींच्या चालू शिक्षणपद्धतींत आहेत व त्यामुळें राष्ट्रातल्या तरुणात पौरुष न वाढता बालिशता मात्र वाढत चालली आहे. साधेपणा, काटकपणा, चिकाटी आणि सामर्थ्य याचा व सुशिक्षिताचा जो उभा दावा असलेला दिसतो, त्याचें कारण हें एकागी शिक्षणच होय, असें विनायकरावाना मन पूर्वक वाटत असे. इतकेंच नव्हे, तर राष्ट्र कोणत्या शिक्षणाची अपेक्षा करीत आहे आणि आमची तरुण पिढी कोणते शिक्षण मिळवीत आहे, यासबधानें त्यानीं काहीं वर्तमानपत्रातून लेखहि लिहिले होते. हे लेख अर्थातच कित्येकाना आवडले व कित्येकाना आवडले नाहींत. एवढें मात्र खरें कीं, तेव्हापासून विनायकराव हे एक जबर विद्वान् गृहस्थ आहेत, अशी पुष्कळांची समजूत झाली

स्वत चे विचार बोलून मात्र दाखवावयाचे, पण कृतींत केव्हाहि उतरावयाचे नाहींत, अशा बोलक्या विद्वानापैकीं विनायकराव नव्हते. जसें बोलावयाचें, तसेंच वागावयाचे, असा त्याचा बाणा होता त्याच्या या विचारांस मूर्त स्वरूप येण्यासाठीं परमेश्वरानेंहि त्याच्यावर कृपा करून त्याना एक पुत्ररत्न दिलें होतें. विनायकरावानीं त्याचें नांव जगन्नाथ असें ठेवलें होते. देवाच्या दयेनें तो जगलावाचल्यास त्याला कसें शिक्षण द्यावयाचें याचीहि योजना त्यानीं योजून ठेवली होती. जगन्नाथ सातआठ वर्षाचा झाल्यावर शाळेंत न कोंबता त्यांनीं त्याला आपल्या गांवीं त्याच्या आजोबाजवळ म्हणजे नारायणशास्त्र्याजवळ ठेवलें आणि घरच्या घरीं त्याला कसें शिक्षण द्यावयाचें, याची माहिती त्यांनीं नारायणशास्त्र्यांना करून दिली. नारायणशास्त्री जुन्या विचारांचा म्हातारा खरा, पण त्याचेहि विचार शिक्षणाच्या बाबतींत विनायकरावासारखेच होते. नारायणशास्त्र्यांजवळ जगन्नाथ असतांना त्यांनीं त्याला घरच्या घरींच बाळबोध अक्षरांची ओळख करून देऊन लहान लहान वाक्यें वाचावयाला शिकविलें होतें. तसेंच संध्या, वैश्वदेव, कांहीं स्तोत्रें वगैरेहि त्याच्याकडून मुखोद्गत करून घेतलीं होतीं.

पुढें नारायणशास्त्र्यांनीं जगन्नाथाची मुंज करण्याचें ठरविलें. विनायकरावांचीहि या बाबतींत अनुमति मिळाली व त्याप्रमाणें जगन्नाथाच्या उपनयनासाठीं विनायकराव आपल्या मित्रमंडळीसह सुंदरपूर येथें आले होते. सुंदरपूर येथे आल्यावर त्यानीं आपल्या आप्तेष्टांनाहि मुंजीसाठीं बोलाविलें व त्यांतच स्वतःचे परमस्नेही भगवतराव याची पत्नी, मुलगा व त्यांच्याबरोबर विठ्ठलरावानाहि सहकुटुंब बोलाविलें होतें. विठ्ठलराव याची नोकरी मामलेदारीची. शिवाय ते सुधारक असल्यामुळें अगदीं जुन्या पद्धतीनें होणाऱ्या या कार्याला हजर राहणें त्याना अनुचित वाटू लागलें. बरें, एकट्या सत्यभामेला तिच्या मुलासह पाठवावे, तर घरांत सगळी अव्यवस्था होणार! म्हणून ही मुंजीची आमंत्रणपत्रिका पोस्टाच्या शिपायाच्या हातून त्याच्या हातीं पडण्याबरोबर त्यांनीं तिचे बारीकबारीक तुकडे केले आणि ते तुकडे अष्टदिक्पालाच्या स्वाधीन केले. विठ्ठलरावानीं इतकी सावधगिरी बाळगली खरी, तरी अखेरीस सत्यभामा पुंडलिकासह विनायकरावाच्या घरीं येऊन दाखल झालीच. ती तेथें कशी आली, हें वाचकांच्या स्मरणातून इतक्यातच कांहीं गेलें नसेल.

* * *

सत्यभामा निघून गेल्यावर विठ्ठलरावांच्या पत्नीला थोडा वेळ हायसें वाटलें; परंतु ती जाऊन दोन तास झाले नाहींत, तोंच घरातलीं स्वयपाकपाण्यासारखीं क्षुल्लक कामेंही तिला राक्षसासारखीं भयप्रद दिसू लागलीं. स्वत:ची रसना स्वाधीन न ठेवल्याचा परिणाम जेव्हा तिच्या डोळ्यापुढे स्पष्ट दिसू लागला, तेव्हा जावेच्या पायां पडावे आणि तिची क्षमा मागावी, असें तिला वाटू लागलें; पण हे विचार ज्या वेळीं तिच्या मनांत आले, त्या वेळीं सत्यभामा गाडींत असून गाडी धुराचे फूत्कार सोडीत सुंदरपूरच्या दिशेनें वेगानें पळत होती. थोड्या वेळानें पांच वाजले आणि विठ्ठलराव कचेरींतून घरीं येऊन एका आरामखुर्चीवर स्वस्थ पडले! हवेंत किंचित् थंडी चमकूं लागल्यामुळें चहाची मोठ्या आतुरतेनें ते वाट पहात होते, पण बराच वेळ झाला तरी चहा न आल्यामुळें ते जरा रागावून ' पुंडलीक, पुंडलीक ' म्हणून हांका मारू लागले. इतक्यांत त्यांची पत्नी बाहेर आली आणि किंचित् रोषानें म्हणाली, "कां, चहा हवा असेल? थांबा जरा! शेगडी पेटविली आहे!"

विठ्ठलराव आश्चर्यानें म्हणाले, "म्हणजे! आज तुझ्यानरसा चहा? सत्यभामा कोठें आहे?"

" रागावून त्या कोठें निघून गेल्या आहेत. पुंडलिकानें आज वसंताला ओटी-वरून ढकलून दिलें. पोराच्या डोक्याला टेंगूळ आलें, म्हणून पुंडलिकाच्या कानाला हात लावला, तों जाऊबाई रागानें माझ्या अंगावर आल्या! मला तर बाई त्याची भीतीच वाटू लागली. मला त्या वाटेल तें बोलल्या आणि शेवटीं निघून गेल्या! जातात कोठें? येतील घटका दोन घटकानीं परत! त्या आता आल्या, म्हणजे त्याना चागलें बजावून सागायचें हो!"

"पण ती आली नाहीं तर? तरी मी तुला सागतच होतों कीं, तिच्याशीं जपून वागत जा हल्लीं जेऊन खाऊन दहा रुपये दिले तरीदेखील स्वयंपाकीण बाया मिळत नाहींत. नुसत्या मोलकरणींना पाचपांच रुपये द्यावे लागतात! ती जर नाहीं आली, तर आता हा पधरावीस रुपयाचा खर्च आला कीं नाहीं? तिची पेटीबिटी आहे का? पहा बरें."

मामलेदारीणबाई आंत गेल्या आणि परत येऊन घाबरलेल्या स्वरानें म्हणाल्या, " नाहीं. त्याची पेटी दिसत नाहीं आणि काठीवर वाळत घातलेलें लुगडेंहि दिसत नाहीं!"

विठ्ठलराव चरफडून म्हणाले, " हा सगळा तुझ्या चुकीचा परिणाम! तिच्या पेटींत कमींत कमी चारपाच हजाराचे तरी दागिने होते. गेले कीं नाहीं, ते आता आपल्या घरातून? शिवाय वडिलार्जित मिळकतीची व्यवस्था लावावयाची होती ती निराळीच, पुंडलीकही गेल्यामुळें तोहि डाव फसला कीं नाहीं? तुला अक्कल नाहीं म्हटलें, तर राग मात्र पुष्कळ येतो. पण आता हे नुकसान कोणीं केलें, याचा विचार तूच कर."

त्याची स्त्री हिरमुसली होऊन म्हणाली, " असें नुकसान व्हावे, अशी माझी इच्छा का होती? आणि त्याच्यावर मीं रागवावयाचें नाहीं, तर मग रागवावयाचें तरी कोणावर? आपण कोणाशीं बोलत आहों, हा विचार त्यानींच करावयाला पाहिजे होता! रोकड पाच हजार होते, ते तर पदरात पडले ना?"

विठ्ठलराव त्रासल्यासारखें करून म्हणाले, " नाहीं, ते कामदेखील अपुरेच राहिले आहे. ते पैसे पोस्टाच्या ब्याकेत असल्यामुळें प्रथम पुंडलिकाच्या नावा-वर चढवून घेऊन अज्ञानाचा पालक म्हणून मीं माझे नांव दाखल केले आहे; पण पुस्तक मजजवळ कोठें आहे? पुस्तक गेलें सत्यभामेच्या बरोबर! जा, आता

अगोदर चहा कर आणि मग स्वयपाकाच्या उद्योगाला लाग. या गांवांत स्वय-पाकीदेखील मिळावयाचा नाहीं."

भगवतरावाच्या विम्याचे पाच हजार रुपये आपण सत्यभामेच्या हातीं पडूं न देतां कसे परभारें आणले व ते बॉबे बॅकेंत आपल्या नावावर कसे ठेवले, ही हकीकत त्यांनीं आपल्या गृहिणीसहि सांगितली नव्हती. असल्या गोष्टी बायकांना सांगण्याइतके विठ्ठलराव कांहीं भोळे नव्हते सत्यभामा गेल्यामुळें बिचाऱ्यांचें बरें-चसें सांपत्तिक नुकसान तर झालेंच, पण प्रपचाचीहि सगळी अव्यवस्था होऊन वेळच्या वेळीं खाणेंपिणेंहि मिळेनासे झालें. झालेल्या भाडणाशीं विठ्ठलरावाचा कांहीं संबध नसल्यामुळें त्यानीं शेवटीं असें ठरविलें की सत्यभामेची क्षमा मागा-वयाची आणि तिची समजूत घालून तिला घरीं घेऊन यावयाचे, पण सत्य-भामा गेली कोठें, हेंच त्याना समजेना सात आठ दिवस त्याचे या विवचनेंत गेल्यावर एके दिवशीं त्याच्या हातीं एक पत्र पडून सत्यभामेचा शोध लागला परतु या शोधानें ते अधिकच निराश झाले ! त्याना जें पत्र मिळालें त्यात खालीं लिहिलेला मजकूर होताः—

"चि. गं. भा. सत्यभामा व चि. पुडलीक हीं येथे सुरक्षित येऊन पोहोंचलीं. चि. पुडलिकाचें वय आठ वर्षाचें झाल्यामुळें त्याचा व्रतबंध करणें अवश्य झालें आहे. माघ शु॥ १२ ला चागला मुहूर्त आहे, व त्या दिवशीं हें कार्य करण्याचें योजिलें आहे. तरी आपण सर्व मडळीसह येऊन हें कार्य पार पाडावें. कार्य आपल्या हातानें व्हावें अशी सत्यभामेची फार इच्छा आहे. पुष्कळ दिवस आपण आपल्या गावीं आला नाहीं, तेव्हा या निमित्ताने तरी अवश्य येण्याचें करावें, म्हणजे सगळयांच्या भेटी होतील. आम्ही आपणांस कार्याच्या कामीं शक्य ती मदत करूं.

आपला—**नारायणशास्त्री.**"

पुंडलिकाच्या व्रतबंधाची ही आमन्त्रणपत्रिका विठ्ठलरावांच्या हातीं पडतांच सत्यभामा कोठें आहे, ती कशा स्थितींत आहे व तिच्या भोंवतीं कोणते लोक आहेत, हें सर्व त्यांच्या लक्षांत आलें व निराशेनें खिन्न होऊन पत्नीवर ते फार रागावले. पुडलिकाच्या न्याय्य मिळकतीला मुकल्याबद्दल विठ्ठलरावांना वास्तविक वाईट वाटण्याचें कांहीं कारण नव्हतें, परंतु दुसऱ्याची संपत्ति गिळंकृत करण्याची त्यांना संवय जडल्यामुळें या वेळीं त्याच्या हृदयाला साहजिक पीळ पडला.

त्यानीं पुडलिकाच्या मुजीला जाण्याचें अर्थातच नाकारलें. तेथें गेल्यानंतर चार आप्तांसमक्ष सत्यभामा सगळें काहीं ओकील आणि शिवाय थोडा फार खिशालाही चट्टा बसेल तेव्हां तेथें न जाणेंच चांगलें, असें त्यानीं ठरविलें. सत्यभामेनें विठ्ठलरावाचें बरेंच नुकसान केलें हें खरें, परंतु परमेश्वर काहीं त्यांच्याकडे अगदींच वक्र दृष्टीनें पहात होता, असे नाहीं. याच वेळीं त्याना हुजूर डेप्युटी कलेक्टरची जागा मिळाली व त्यांची बदली पुण्यास झाली. देवानें या हातानें नाहीं, तर त्या हातानें कसे तरी आपलें नुकसान भरून काढल्यामुळें विठ्ठलरावाना अतिशय आनद झाला व सुदरपूरला मुजीला न जाता ते पुण्यास निघून गेले. त्याच्या पत्नीलाही या गोष्टीनें फार आनद झाला. कारण पुण्यासारख्या ठिकाणीं स्वयपाक्याची वगैरे अडचण नव्हती आता त्याना पगार द्यावा लागेल हें खरें, पण आता त्याची कमाई वाढली असल्यामुळें त्याबद्दल आता एवढी काळजी नव्हती.

सत्यभामेची सगळी हकीकत यमुनेकडून समजल्यावर नारायणशास्त्र्याना फार वाईट वाटलें व सत्यभामेची काहीं तरी सोय लावली पाहिजे, असें त्याना व त्यांचे जावई विनायकराव याना वाटू लागलें. विठ्ठलरावाची जी वडिलार्जित मिळकत सुदरपूर येथें होती, तींतला अर्धा हिस्सा सत्यभामेचा होता, तेव्हा दुसऱ्या कोणाच्याही आश्रयानें राहण्यापेक्षां सुदरपूरला तिनें स्वतन्त्रतेनेंच रहावे असें सगळ्याना वाटू लागलें; परंतु हें जुळावे कसें हाच मोठा प्रश्न होता. शेवटीं नारायणशास्त्र्यानीं पुडलिकाच्या व्रतबधाची योजना तर केलीच. पुडलिकाचा व्रतबंध दुसऱ्याच्या दाराशीं न होता त्याच्या मालकीच्या घरीं व्हावा असें ठरवून त्यानीं सत्यभामेला योग्य तो सल्ला दिला आणि सत्यभामाहि त्या उद्योगाला लागली. एका मोठ्या आवारांत शेजारीं शेजारीं दोन घरें होतीं. हीं दोन्ही घरें विठ्ठलरावांच्या वडिलांनीं बांधलीं होतीं. आपलीं मुलें पुढें वेगळीं निघतील, ही त्या म्हाताऱ्याला कल्पनादेखील नव्हती, तथापि जवळ थोडा फार पैसा असल्यामुळें म्हाताऱ्यानें जुनें घर मोडून मोठे न बांधतां त्याच्याच जवळ दुसरें एक नवें घर बाधलें होतें. हीं दोन्ही घरें साधारणपणें सारखींच असून प्रत्येक घराच्या भोंवतीं आंगणहि सारखेंच होतें. जुन्या घरात विठ्ठलरावानीं भाडेकरी ठेवून त्याच्याजवळून स्वत:च्या नावाची भाडेचिठ्ठी लिहून घेतली होती, व नवें घर आल्यागेल्या वेळीं उतरण्यासाठीं म्हणून कुलूप लावून बद करून ठेवलें होते. भगवतराव होते तोंपर्यंत ते सत्यभामेसह मुद्दाम वर्षातून एकदोन वेळा सुंदर-

पूरला येत असत. विठ्ठलरावांना जन्मभूमीच्या दर्शनाचा विशेष शोक नव्हता. भगवतराव वारल्यावर मात्र ते एकदां सुदरपूरला आले आणि वडिलार्जित मिळकतीची योग्य ती व्यवस्था लावून परत नोकरीवर गेले. सत्यभामेनें हें नवे घर भर दिवसा चारचौघां समक्ष उघडलें आणि पुडलिकासह ती तेथे राहू लागली. विनायकराव व नारायणशास्त्री यानीं इतर चार मडळीचे साहाय्य घेऊन घराला रग देऊन अगण स्वच्छ केलें व त्यात सुदर मंडप घातला योग्य वेळीं ठिकठिकाणच्या आप्ताना व मित्रांना छापलेल्या निमत्रणपत्रिका सत्यभामेकडून पाठविल्या गेल्या व त्यांत व्रतबध ‘आमच्या स्वत.च्या मालकीच्या घरी व्हावयाचा आहे’ असे शब्द नारायणशास्त्र्यांनीं मुद्दाम घालविले होते. विठ्ठलरावाना मिळालेल्या नारायणशास्त्र्याच्या पत्रासोबत ही निमत्रणपत्रिका होती व त्यामुळेंच विठ्ठलरावाचा जीव इतका खालीं वर होत होता! पुडलिकाच्या व्रतबधाचे मगलकार्य फार थाटाने पार पडलें. स्वत.च्या मुलाचें मौंजीबधन इतक्या थाटाने होईल, अशी बिचाऱ्या सत्यभामेला कल्पनाही नव्हती. परतु तो समारंभ जेव्हा तिने डोळयाने पाहिला तेव्हा तिच्या अत.करणाला आजपर्यंत जे व्रण पडले होते, ते सगळे भरून येऊन तिच्या डोळयातून आनदाश्रु वाहू लागले! नारायणशास्त्री, विनायकराव आणि यमुना या तिघाविषयीं त्या वेळी सत्यभामेच्या मनांत जो पूज्यभाव उत्पन्न झाला, तो पुढें आमरण कायम राहिला. हा उपनयनसस्कार केवढया थाटानें पार पडला, हें विठ्ठलरावाना कळविण्यास सुदरपुरात कोणी जासूद नव्हते, असे नाहीं. नारायणशास्त्र्याची विद्वत्ता, त्याचा निस्पृहपणा, त्याची स्वतत्र वृत्ति आणि त्याचा लौकिक हीं सहन न होणारी काही स्वार्थलोलुप मलिन आचरणाची भिक्षुक मडळी सुदरपुरात होती. या मडळीनें मुजीचे लाडू यथेच्छ खाल्ले आणि विठ्ठलरावास समारभाची एकदर हकीकतहि कळविली विठ्ठलरावाना ही मोठीच आपत्ती वाटली. जणू काय आपल्याच मालकीची मिळकत सत्यभामेनें घेतली, असें वाटून पुढे काय करावे, हे त्याना सुचेनासें झालें. शेवटी ते स्वत सुदरपुराला गेले आणि सत्यभामेला पुन्हा आपल्याकडे येण्यासाठीं त्यांनीं तिची पुष्कळ मनधरणी केली, परतु सत्यभामेनें आरंभापासून जो ‘नन्ना’चा पाढा वाचण्यास आरंभ केला, तो विठ्ठलराव तेथून जाईपर्यंत तसाच कायम ठेवला होता. अखेरीस हातातल्या अधिकाराचा उपयोग करून कार्यभाग साधला पाहिजे, असं विठ्ठलरावानीं ठरविले व अनधिकारानें गृहप्रवेश केल्याबद्दल त्यांनीं सत्यभामेवर फौजदारींत फिर्याद दाखल केली अशा फिर्यादीच्या आरंभींच जी सावधगिरी घ्यावयाला पाहिजे,

ती विठ्ठलरावांनीं त्या त्या अधिकाऱ्यांच्या भेटी घेऊन घेतली होती; परंतु नारायणशास्त्री आणि विनायकराव यांनींही योग्य काळजी घेतल्यामुळें मॅजिस्ट्रेट-साहेबांनीं ही फिर्याद दिवाणी स्वरूपाची ठरवून काढून टाकली अशा रीतीनें हा डाव फसल्यावर विठ्ठलरावानीं सत्यभामेच्या स्वाधीन तिचा जमीनजुमला करून मोकळें व्हावयाला पाहिजे होतें, परंतु येन केन प्रकारेण सत्यभामेला पेंचात आणण्याची त्याची फार इच्छा असल्यामुळें त्यांनीं सत्यभामेवर दिवाणींत फिर्याद दाखल केली गाव तेथें महारवाडा या न्यायानें सुदरपुरातहि खोट्या साक्षी देणारे व खोटे कागदपत्र तयार करणारे कांहीं सज्जन असल्यामुळें, या फिर्यादीच्या कामींहि विठ्ठलराव निराश झाले नव्हते. शक्य तितक्या सावधगिरीनें त्यांनीं आपले साक्षीदार व कागदपत्र कोर्टांत हजर केले, परतु न्याय देण्याच्या वेळीं फिर्यादी हे हुजूर डेप्युटी कलेक्टर आहेत, ही महत्वाची व मुद्याची बाब न्यायाधीश विसरून गेले व त्यानीं सर्व मिळकतीचा अर्धा हिस्सा सत्यभामेच्या स्वाधीन केला त्यावर हायकोर्टापर्यंत अपिलें झालीं, परंतु न्यायदेवता विठ्ठलरावाना अखेरपर्यंत प्रसन्न झाली नाहीं ती नाहींच.

अशा रीतीने सत्यभामेच्या हातीं तिची न्याय्य मिळकत व सपत्ति पडली खरी, परतु त्यासाठीं तीन वर्षेपर्यंत नारायणशास्त्री व विनायकराव याना कोर्टांत सारख्या खेपा घालाव्या लागल्या व पुष्कळ त्राम सोसावा लागला. या उपकाराच्या ओझ्यानें सत्यभामेला मोठे सकट पडल्यासारखें झालें. ‘ आपण यात कर्तव्यापेक्षा अधिक काहीं केले नाहीं,’ असें नारायणशास्त्र्यानीं व विनायकरावानीं तिला वारंवार सागितलें, पण त्याच्या या उपकाराचें स्मरण तिच्या अत करणातून अखेरपर्यंत नाहींसें झालें नाहीं तें नाहींच.

हळू हळू दोन तीन वर्षे लोटलीं या अवधींत पुंडलिक व जगन्नाथ या दोघांत विलक्षण प्रेमभाव वाढला होता. दोघेहि मोकळ्या मनाचे, आनदी वृत्तीचे, झाडापेरानें मजबूत व खेळण्याकुदण्यास उत्सुक असल्यामुळें पुडलिकाची आणि जगन्नाथाची चारआठ दिवसांच्या आंतच गट्टी जमली व ती हळू हळू वाढतच गेली. पुंडलीकही जगन्नाथाच्या संगतीसाठीं नारायणशास्त्र्यांकडेच राहूं लागला. पुडलीक–जगन्नाथाची ही जोडी नारायणशास्त्र्यांना फार पसंत पडली होती; कारण त्या दोघांच्या चेहऱ्यावर रडवेपणा असा काडीमात्र दिसत नसे. दोघांची बुद्धि तरतरीत असून काकांनीं एक वेळ शिकविलेलें त्यांच्या कायमचे ध्यानांत रहात

असे. खेळतां खेळता, फुलझाडांना पाणी घालताना, बाहेर हिंडताना, ते त्या दोघांना अनेक गोष्टी शिकवीत असत. मुख्यत. मुलें शरीरानें सुदृढ, मनानें उदार व बुद्धीनें समजूतदार व्हावीत, या धोरणानें नारायणशास्त्री मुलाना शिक्षण देत असत. या शिक्षणाबरोबर त्या दोघांच्या शाळेंतल्या अभ्यासावरहि ते लक्ष ठेवीत तेराचवदा वर्षांचे झाल्यावर सुदरपूरच्या शाळेंतलें त्याचें शिक्षण सपलें व पुढच्या शिक्षणासाठी त्या दोघाना विनायकरावांनीं पुण्यास ठेवलें. त्या दोघांची जेवण्याची व्यवस्था खानावळींत न करतां सत्यभामा तेवढयासाठीं स्वत पुण्यास जाऊन राहिली. अशा रीतीनें पुण्यास त्या दोघाचा विद्याभ्यास चालला असता काही दिवसांनीं पुडलिकाची आणि वसताची गाठ पडली.

---

## प्रकरण पांचवे.



चदनवाडीचे इनामदार श्रीधरपत देशमुख हे फार सज्जन गृहस्थ असून, ते अत्यत सदाचारसपन्न व उदार होते. या त्याच्या गुणामुळे त्या भागातील बहुतेक लोकांना त्याचे नाव माहीत झाले होते, व त्याच्यासबधाने सर्वांच्या ठायीं आदरभावहि वसत होता. ते केवळ नामधारी इनामदार नव्हते, तर त्याचा इनामी असा पुष्कळ जमीनजुमला असून शिवाय वाडवडिलापासून त्याच्या सपत्तीत एकसारखी भरच पडत होती. आता इतकें खरें कीं, अलीकडच्या नवकोट नारायणाच्या पासगालाहि ते लागले नसते. घरीं आल्या गेल्याचा सत्कार करण्यात व अतिथि अभ्यागताचा परामर्ष घेण्यात ते केव्हाहि कृपणपणा करीत नसत. जुन्या मताचे ते अभिमानी असून त्याच्या प्रत्येक व्यवहारात त्याचा तो अभिमान दृष्टीस पडत असे. शिवाय मनानेंहि ते सरळ असून देण्याघेण्याच्या व्यवहारातहि ते फार चोख रीतीनें वागत असत. एकदरीत गरिबापासून श्रीमतापर्यंत सर्वांच्या अत.करणात श्रीधरपत देशमुखानीं आदराचें स्थान मिळविलें होते. बहुतेक लोक त्यांना बाबासाहेब देशमुख म्हणून ओळखीत असत. येथवर बाबासाहेबाच्या गुणाचें अवलोकन झालें; आतां त्यांच्या दोषाकडेहि लक्ष पुरविलें पाहिजे. सकलगुणालकृत अशीं माणसें जगांत फारच थोडीं असतात. तेव्हां बाबासाहेब देशमुखांसारख्या गृहस्थांच्या अगीं जर कांहीं दोष असले, तर त्यांत कांहीं मोठेंसें आश्चर्य नाहीं. त्यांचा मुख्य दोष म्हणजे सरकारकडून मान मिळविण्याची विलक्षण

धडपड हा होय. वास्तविक पहातां हा काहीं दोष नव्हे. मानमरातब वाढविण्यासाठीं खटपट करणें, यात अनुचित तें काय ? परंतु आश्चर्य हें कीं, लोकाना त्यांचा हा खटाटोप हास्यास्पद वाटे ! हसोत बिचारे ! पण त्याच्यासारख्या श्रीमान्, उदार व सज्जन गृहस्थाना 'रावबहादूर' किंवा 'रावसाहेब' यासारखी एकादी बहुमानाची पदवी असू नये, याबद्दल त्याच्याच स्थितींत असणाऱ्या कोणासहि त्याच्याबद्दल सहानुभूतीच वाटेल. बाबासाहेब थोडेसे बायकोच्या तत्रानें वागणारे आहेत, असाहि लोकाचा त्याच्यावर दोषारोप होता, परतु या दोषारोपांतहि आम्हास काहीं विशेष तथ्य दिसत नाहीं. बाबासाहेबाचा विवाह लहानपणींच झाला होता, व त्याना स्त्रीहि फार सज्जन मिळाली होती. तिच्यापासून त्यांना एक मुलगा झाला होता व त्याचें नाव त्यानीं गोविंद असें ठेविलें होतें. इनामदारांचे चिरंजीव असल्यामुळें लोक गोविंदाला 'गोविंदराव' किंवा 'रावसाहेब' असें म्हणत असत रावसाहेब लहानपणापासूनच स्वतत्रवृत्तीचे व बाणेदार स्वभावाचे होते. बुद्धि तीक्ष्ण असल्यामुळें व बाबासाहेबानीं त्याच्या शिक्षणाची चांगली काळजी घेतली असल्यामुळें रावसाहेबानीं बरेंच शिक्षण सपादन केलें होतें. स्वत ला रावसाहेब पदवी मिळाली नाहीं, म्हणून बाबासाहेबानीं मुलाचे नाव 'रावसाहेब' ठेवलें, असेंहि कित्येक निंदक म्हणत. रावसाहेबानीं म्हणजे गोविंदानें इग्रजी शिकण्यास नुकताच आरभ केल्यावर त्याची आई वारली ! या वेळीं गोविंदापेक्षा बाबासाहेबानाच फार दु ख झालें ! ऐन पसतिशीच्या सुमाराला ससाररथाचें एक चक्र अशा रीतीने मोडून गेल्यामुळें त्याची एकचाकी गाडी त्याना उदासवाणी व दु खदायक वाटावी, यांत काहीं मोठेसे आश्चर्य नाहीं. असे असताहि इतरांप्रमाणें पहिल्या पत्नीच्या तेराव्या दिवशींच बाबासाहेबानीं द्वितीय पत्नीचें पाणीग्रहण केलें नाहीं. आपल्या पहिल्या पत्नीसाठीं सुमारें तीसेक दिवस विरहदु ख भोगून नतर चार आप्तेष्टांचा फारच आग्रह पडल्यामुळें अत्यत नाखुषीने त्यांनीं विवाह केला. या वेळीं बाबासाहेबाचें वय सुमारे पस्तीस वर्षांचें असून त्याच्या या नूतन सौभाग्यवतीचे वय तेराचवदा वर्षांचे होते. मुलगी शहरातली, थोडेंफार शिकलेली, सुस्वरूप व श्रीमताची असल्यामुळे तिनें चारपाच वर्षांच्या आतच सर्व ससाराचीं सूत्रें हातीं घेऊन बाबासाहेबानाहि आपल्या मुठींत आणलें. या सुमारास गोविंदाचें वय अवघें अकराबारा वर्षांचें असून त्याला प्रपच म्हणजे काय, हें समजतहि नव्हते; तथापि या मुलाचा आहे तेवढाहि संबंध प्रपचांत असूं नये, असे या सापत्न मातोश्रीस वाटूं लागलें. तिचा सल्ला बाबासाहेबांनाहि पसत पडून त्यांनीं लवकरच गोविं-

दाला पुण्यास शिकण्यासाठीं ठेवलें. इकडे हळूहळू बाबासाहेबांच्या नव्या संसारालाहि रंग चढत चालला. त्यांना या नव्या सौभाग्यवतीपासूनहि एक मुलगा झाला. त्याचें नांव त्यांनीं मोठ्या आवडीनें गोपाळ असें ठेविलें. तथापि त्याला ते ' नानासाहेब ' म्हणून लडिवाळपणें म्हणत असत, अर्थात् हे श्रीमतांचे चिरंजीव गावांतहि 'नानासाहेब' या नांवानेंच प्रसिद्धीस आले. इकडे हळू हळू गोपाळ जसा मोठा होत चालला होता, तसा तिकडे गोविंदहि मोठा होत चालला होता. इतके दिवस आपण श्रीमत आहों, अशीच गोविंदाची समजूत होती, परंतु त्याची उचलबागडी जेव्हां नव्या आईसाहेबांनीं पुण्यास केली, तेव्हां त्यांची श्रीमतीची धुदी नाहींशी झाली आणि गरीब पण सुशील संवगड्यांत मिळून मिसळून तो आपला अभ्यास करू लागला. क्रमानें त्याची मॅट्रिकची परीक्षा पास झाली. पुढें आणखी शिकण्यासाठीं पुण्यास राहून वडिलास व सापत्न मातोश्रीस त्रास न देण्याचा त्याचा विचार होता, परंतु याच वेळीं त्याच्या नव्या आईला एकदम प्रेमाचें भरते आलें आणि तिनें त्याला घरीं आणवून पतीकडून त्याचा विवाहहि करविला. ' आपणास आतां पूर्वीसारखा देण्याघेण्याचा व्यवहार पाहवत नाहीं, तेव्हा त्यात मदत करण्यासाठीं तू यापुढें येथेंच रहा,' असें बाबासाहेबानीं रावसाहेबाना सागून त्याला घरीं ठेवून घेतलें आणि शिक्षणासाठी दुसऱ्या चिरजिवाना पुण्यास पाठविलें. पुण्यास नानासाहेबांची सगळी व्यवस्था श्रीमती थाटानें ठेवलेली असल्यामुळें त्याना सरदारी वळण लागलें होतें शिवाय कालही झपाट्यानें बदलत असल्याने त्यांच्या आचरणाचें वळणहि कालाच्या ओघाबरोबर बदलत चाललें होतें. आमच्या वाचकाना ज्याची नुकतीच चांगली ओळख झाली आहे, असे विठ्ठलराव आणि हे नानासाहेब साधारणपणें समवयस्क असल्यामुळें पुण्याच्या हायस्कुलांत या दोघाची दोस्ती जमली व ती पुढें पुष्कळ वर्षें कायम राहिली. नानासाहेबापेक्षा विठ्ठलराव दोनतीन वर्षांनीं वडील असून श्रीमताच्या चैनी मुलांत मिळून मिसळून वागण्याची त्याना लहानपणापासूनच खोड होती. याचा फायदा विठ्ठलरावाना पुढें फार चागल्या रीतीनें मिळाला. श्रीमताशिवाय दुसरें कोणी त्याच्या परिचयाचेंच नसल्यामुळें त्याचा फायदा व्हावा, यांत विशेष असे कांहीं नाहीं. अशा रीतीनें गोपाळाचें शिक्षण पुण्यास चाललें असताना बाबासाहेबांनीं एका श्रीमंताच्या मुलीबरोबर गोपाळाचा विवाह केला. म्याट्रिकची परीक्षा कशी तरी गोपाळाचीहि पास झाली. त्याला कॉलेजांत घालून गोविंदापेक्षां अधिक विद्वान् करण्याची त्याच्या आईची व बाबासाहेबांची फार इच्छा होती, परंतु दोनतीन वर्षें खटपट करूनहि जेव्हां

कॉलेजांत पुढें पाऊल पडत नाहीं, असें नानासाहेबाना वाटलें, तेव्हां त्यांनीं पुण्याचें बिऱ्हाड गुंडाळलें आणि ते चदनवाडीस येऊन राहिले. बिऱ्हाड याचा अर्थ ते पुण्यास जेव्हां कॉलेजचें शिक्षण घेण्यासाठीं राहिले होते, तेव्हां आपल्या सौभाग्यवतीसह राहिले होते. श्रीमताचीं पुष्कळ मुलें अशाच थाटानें शिक्षण सपादन करीत असतात! नानासाहेब घरीं येऊन राहण्याच्या आधींच रावसाहेब आणि बाबासाहेब यांचें मनोमालिन्य वाढत चाललें होते. सापत्न मातोश्री रावसाहेबाशीं व त्यांच्या पत्नीशीं क्षणोक्षणीं अन्यायानें वागत होत्या, परंतु कांहीं झालें, तरी त्या मातोश्री आहेत, इकडे लक्ष देऊन रावसाहेब सर्व काहीं निमूटपणें सहन करीत होते बाबासाहेब तरी आपणाशीं अन्यायाचे वर्तन करणार नाहींत, असे त्याना वाटत होतें, परतु पुढें हरघडी पत्नीचा कैवार घेऊन बाबासाहेबहि जेव्हा रावसाहेबावर तोंडसुख घेऊ लागले, तेव्हां सगळाच रंग पालटला आहे, असें रावसाहेबाच्या लक्षात आलें हळू हळू रावसाहेबाचा प्रपचहि वाढत चालला होता त्याना दोन अडीच वर्षांची एक मुलगी असून शिवाय एक तान्हा मुलगाहि होता अशा परिस्थितींत नानासाहेबहि आपल्या पत्नीसह व पांचसहा वर्षाच्या मुलीसह पुण्याहून चदनवाडीस आले, यानतर घरातल्या भाडणांना तर अधिकच रग चढू लागला या एकदर प्रकारानें रावसाहेबाची स्थिति अर्थातच फार नाजूक झाली तटेबखेड्याचा त्याना स्वभावत:च कटाळा आणि बाबासाहेबाकडून तर न्याय मिळण्याची मुळींच आशा नाहीं, अशा स्थितींत रावसाहेबाना घरदार नकोसे झालें, पण करणार काय? 'जमीनजुमला वडिलार्जित पडला, नाहीतर त्याला त्याच्या पोराबाळासह घरातून घालवून दिला असता!' असे उद्गार रागाच्या भरात त्यांच्या सापत्न मातोश्रीच्या तोंडातून हळुहळू बाहेर पडूं लागले. अगोदरच रावसाहेबाची वृत्ति सात्वी व स्वतत्र बाण्याची, त्यात अशा प्रकारचा मानभंग वारंवार होऊं लागल्यामुळें त्याना घराचा कंटाळा आला. त्यांची पत्नीहि त्यांच्याप्रमाणेंच त्रासली होती. अखेरीस पत्नीस माहेरीं पोहोंचविण्याचें निमित्त करून रावसाहेबानीं आपल्या घराला, जन्मभूमीला आणि परमपूज्य पित्यालाही 'राम राम' ठोकला आणि मुलाबाळासह ते श्रीकाशीक्षेत्रीं येऊन राहिले. काशीला येतांच रावसाहेबानीं आपली रावसाहेबी गगार्पण केली आणि साध्या गोविंदराव या नांवानेंच ते आपला व्यवहार चालवूं लागले. विश्वेश्वराच्या कृपेनें त्यांना तेथें गेल्याबरोबर तीस पसतीस रुपयांची एक नोकरीहि मिळाली आणि तीवर त्याचा उदरनिर्वाह चालू लागला.

संततीच्या बाबतींत रावसाहेबांपेक्षा नानासाहेबानीं अघाडी मारली होती. ते जरी वयानें धाकटे होते, तरी त्याची पत्नी लग्नाच्या वेळीच मोठी असल्यामुळें आणि परमेश्वरहि त्यांच्यावर प्रसन्न असल्यामुळें रावसाहेबाची पत्नी संतानवती होण्याच्या आधींच नानासाहेबाची पत्नी सतानवती झाली होती. नानासाहेबांची मुलगी जेव्हा दोन वर्षांची झाली, तेव्हा कोठे रावसाहेबाची पत्नी गरोदर राहिली होती. बाबासाहेबाच्या नव्या राणीसाहेबांची अशी समजूत होती कीं, गोविंदाच्या बायकोला पोरबाळच होणार नाही; आणि म्हणून गोविंदाविषयींच्या त्याच्या मत्सरास थोडी फार मर्यादा होती, परंतु गोविंदाची पत्नी जेव्हा गरोदर राहिली, तेव्हा या सापत्न मातेला विलक्षण उद्वेग उत्पन्न झाला, व परमेश्वराच्या घरीं अशा रीतीनें चालणाऱ्या पक्षपाताबद्दल तिला फार राग आला; परतु झाल्या गोष्टीस काहीं उपाय नसल्यामुळें शेवटीं तिला तो मनातल्या मनात गिळावा लागला. वस्तुस्थिति अशी असली तरी ईश्वर काहीं तिच्यावर अगदींच रुष्ट झाला होता असें नाहीं गोविंदाच्या स्त्रीला पुत्र न देता कन्या झाली आणि अशा रीतीनें या सापत्न-मातेच्या दु खात देवानें सुखाचे थोडे किरण शिरकाविले. ही मुलगी झाल्यापासून बाबासाहेबाच्या घरातील तट्याचीं मुळें अधिकच खोल जाऊ लागलीं. मुलगी मूळ नक्षत्रावर जन्मली नव्हती हे खरें, परतु ती आपल्याबरोबर तट्याची मुळें घेऊन आली होती, एवढे मात्र खरें मुलगी शात, गोडस आणि नक्षत्रासारखी सुदर असल्यामुळें नि.पक्षपाती लोकाना गोपाळाच्या मुलीपेक्षा तीच सुदर दिसे. गोपाळाची मुलगीहि कुरूप होती असं नाही, तीदेखील सर्वांगसुदरच होती, परंतु लहान मुलाला बाळसेदारपणा म्हणून जी एक ईश्वरी देणगी आहे, ती गोविदाच्या मुलीला लाभली असल्यामुळे ती अधिक मोहक दिसे. नवे विचार, नवे पोशाक, नव्या चालीरीती आणि नवे व्यवहार याचा गोपाळ हा भोक्ता असल्यामुळें त्यानें आपल्या मुलीचें नाव 'लीला' असें ठेवलें होते. गोविंदाची पहिली मुलगी दोन अडीच वर्षांची असताना गोविंदाला पुत्रलाभ झाला, हें मागें सांगितलेंच आहे या वेळीं लीला पाचसहा वर्षांची होती. आपल्या घरात कुकुले बाळ झालेलें पाहून लहान लीलेला फार आनद झाला, परतु लीलेच्या आजीला मात्र सर्वस्व नाहींसें झाल्यासारखे दु ख झालें! स्वत. बाबासाहेबाना देखील नातू झाल्याबद्दल आनद झाला होता, परंतु पत्नीच्या भयानें त्याना तो व्यक्त मात्र करतां आला नाहीं. हें मूल जन्माला आल्या-पासून घरांत तंटेबखेड्यावाचून एक क्षणहि जाईनासा झाला! अशा परिस्थितींत राहण्याचा गोविंदाला स्वभावतःच कटाळा असल्यामुळें त्यानें स्वतःच्या घराला कसा रामराम ठोकला, हें मागें सागितलेंच आहे.

भाडणाचें मूळ अशा रीतीनें घराच्या बाहेर गेल्यावर बाबासाहेबाच्या घरात आनंदाचें जणू साम्राज्यच वावरत आहे, असें त्याच्या सौभाग्यवतीस वाटू लागलें, परंतु वृद्ध बाबासाहेबाची स्थिति मात्र चमत्कारिक झाली. गोविंदाशीं भाडत असताहि जें तेज त्याच्या चेहऱ्यावर दिसत असे, ते आता लुप्त झालें असून हल्लींच्या निर्वेध आनदातहि त्याच्या चेहऱ्यावर उद्विग्नतेचीं चिन्हे दिसू लागलीं. सून माहेरीं गेली नसून आपल्या नवऱ्यासह व मुलासह ती कोठे तरी गेली हें जेव्हा बाबासाहेबाच्या लक्षात आलें, तेव्हां म्हाताऱ्याचा जीव खालींवर होऊ लागला. त्याचा शोध लावण्याची त्यानी आपणाकडून पुष्कळ खटपट केली, परतु ती सगळी व्यर्थ जाऊन म्हाताऱ्याच्या अत.करणावर जो आघात झाला, तो कायमचाच राहिला. गोविंदाच्या अगीं काहीं विशेष सद्गुण आहेत, अशी इतके दिवस बाबासाहेबाची समजूत नव्हती, परतु तो गेल्यावर घराला जें औदासिन्य आलें, ते पाहून गोविंदाची खरी किंमत बाबासाहेबाना कळून येऊ लागली. याशिवाय गोविंद घरातून निघून गेल्यामुळें लोकात असलेल्या मानमरातबासहि थोडासा धक्का बसल्यावाचून राहिला नाहीं. अशा चमत्कारिक स्थितींत त्याना जर गोविंदाचा शोध लागला असता, तर त्यानीं आपल्या हृदयातील सगळें वात्सल्य व्यक्त केलें असते आणि गोविंदाला घरीं समजावून आणून पुन्हा तटाबखेडा होणार नाहीं, अशी व्यवस्था केली असती; परंतु पुष्कळ खटपट करूनहि त्याना गोविंदाचा शोध लागला नाही. सावकारी व जमीनजुमला यासबधींच्या व्यवहारात गोविंदाची जी काहीं मदत होत असे, तशीच गोपाळाकडून होईल, असे बाबासाहेबाना वाटत होते, परतु गोपाळाला स्वत च्या कामापुढे फुरसत नसल्यामुळे त्याच्याकडून काहीच मदत होईना. घरचा प्रपच सगळेच पाहतात, परतु गोपाळाला म्हणजे नानासाहेबाना सगळ्या समाजाचा प्रपच पहावयाचा होता! अनेक विलक्षण चालीरीतीमुळें आणि रूढींमुळें हिंदुसमाजाची अत्यत दुर्दशा झाली आहे, असें नानासाहेबाना मनापासून वाटे आणि तेवढ्यासाठीं ते अविश्रात परिश्रम करीत. पुण्यास कोणाचा पुनर्विवाह आहे, चालले त्या समारंभाला! मुंबईस सामाजिक परिषद आहे, चालले मुबईला! अमुक ठिकाणीं एका बड्या सुधारकाला मेजवानी आहे, चालले तेथे! याशिवाय काहीं स्नेहीसोबत्याच्या भेटी परतभेटी, समाजसुधारणेच्या वाङ्मयाचें वाचन आणि कोणी बोलके सुधारक म्हणू नये म्हणून तसें प्रत्यक्ष आचरण, यामुळें इच्छा असूनहि नानासाहेबाना प्रपचात वडिलांना सहाय्य करता येईना. याखेरीज पुष्कळ बाबतींत वडिलांचें आचरणहि त्यांना पसत नव्हते. गोविं-

दाचें आणि गोपाळाचें जरी जमत नव्हतें, तरी गोविंदाप्रमाणें गोपाळहि फार चांगला मुलगा आहे, अशी म्हाताऱ्याची समजूत होती, परंतु गोपाळाच्या एकदर आचरणावर जेव्हां म्हाताऱ्यानें बारीक नजर पुरविली, तेव्हां म्हाताऱ्याची निराशा एकसारखी वाढतच चालली. एकदा नानासाहेबांच्या तोंडाला कसलीशी घाण आल्यामुळें बाबासाहेब बरेच सतापले आणि त्यानीं नानासाहेबाना दोन उपदेशाच्या गोष्टीहि सागितल्या नानासाहेबानीं पाहिलें कीं, म्हातारा पक्का पुराणमतवादी आहे. त्याला सुधारणाशतकातील बिनमोल वस्तूंची किंमत कळावयाची नाहीं, तेव्हा अशा वृद्धाबरोबर तटाभाडण करण्यापेक्षा पुण्यामुबईस दिवस काढावेत व मधून मधून घरीं येत जावें म्हणजे झालें नानासाहेबांच्या या विचारास बाबासाहेबांनींहि फारसे आढेवेढे घेतले नाहींत

लीला सातआठ वर्षांची झाल्यावर तिला अगदीं अलीकडच्या पोषाकात नटवावयाचें व थोडे थोडें शिक्षण द्यावयाचे काम नानासाहेबानी हातीं घेतलें होते, परंतु पुण्यामुबईच्या खेपांमुळें त्याना या बाबतींतहि विशेष लक्ष देण्यास वेळ मिळेना. याच सुमारास नानासाहेबाची स्त्री प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. बाबासाहेबांना व त्याच्या स्त्रीला यामुळें साहजिकच फार आनद झाला, परंतु हा आनद चारसहा महिनेदेखील टिकला नाही मुलगा लवकरच वारला आणि त्याच्या आईची प्रकृतीहि या बाळतपणात बिघडून दुखणें क्षयावर गेलें. यानतर दोन वर्षांनी म्हणजे लीला दहा वर्षांची असतां तिच्या आईनें इहलोकचा त्याग केला नानासाहेबाना अर्थातच याबद्दल फार वाईट वाटलें, परंतु या दुःखांतहि त्याच्या उदार अत करणात थोडें समाधान उत्पन्न झाल्यावाचून राहिलें नाही. ‘ कदाचित् मला पुनर्विवाहाची सधी मिळावी म्हणूनच माझी प्रिया गत झाली असावी, ’ असे विचार या वेळीं त्याच्या चित्तावर उमटल्यावांचून राहिले नाहीत. यानतर थोड्याच दिवसानीं नानासाहेबाच्या कांही मित्रानीं विलायतेस जाण्याचें ठरविलें व नानासाहेबासहि त्याचा आग्रह होऊ लागला

विलायत म्हणजे विद्यादेवीचें अधिष्ठान ! प्रति अमरावती ! सुधारणेचें सायुज्यतीर्थ ! अशा ठिकाणी जाऊन आपणही एकदां आपली नरतनु पावन करून घ्यावी, असें नानासाहेबांसारख्याना वाटणें अगदीं साहजिक होतें. यापूर्वी बाबासाहेबानी त्याना या बाबतींत परवानगी व पैसा दिला असता कीं नाहीं, हें भगवंताला माहीत, परंतु याच वेळीं ‘ रावसाहेब ’ या पदवीनें त्यांना माळ घातल्यामुळें ‘ विलायत ’ हा शब्द त्यांनाहि मोठा आदरणीय वाटला व त्यानीं नानासाहेबांस

विलायतेस जाण्यास परवानगी देऊन विपुल पैसाहि दिला. 'हिंदू समाजपद्धति आणि पाश्चात्य समाजपद्धति यांचा तुलनात्मक अभ्यास करण्यासाठीं नानासाहेब विलायतेस जात आहेत,' असें अगोदरच प्रसिद्ध झाल्यामुळें विठ्ठलरावांसारख्या त्यांच्या स्नेह्यांनीं त्यांचा यथोचित गौरव करून त्यांना निरोप दिला.

नानासाहेब विलायतेस निघून घेल्यानतर एक वर्षाने लीलेच्या लग्नाचा प्रश्न बाबासाहेबांपुढें उभा राहिला. वास्तविक या वेळीं लीला कांहीं फार मोठी नव्हती. अवघी अकरा वर्षांची होती परंतु बाबासाहेबाना हें वय फार मोठें वाटलें व ते आपल्या पत्नीसह लीलेला योग्य असा वर शोधू लागले. कर्मधर्मसयोगानें याच वेळी विनायकरावाची बदली चदनवाडी येथें झाली. चोख न्यायाधीश म्हणून विनायकरावाची कीर्ति चदनवाडीला अगोदरच येऊन पोहोंचली होती आणि पुढें तर प्रत्यक्ष याच्या सच्छील आचरणामुळें चदनवाडींत ते फारच लोकप्रिय झाले. कोर्टांचें काम कांहीं दिवस सुदरपूरला चालत असल्यामुळें विनायकरावाना आपल्या या जन्मभूमीच्या गावीं न्यायाधिशाचें काम करावे लागे स्वतःच्या गावी ; समोर नेहमीं ओळखीचे लोक येत असूनहि त्याच्या हातून पक्षपाताचे असे वर्तन झालें नाही त्यांचा स्वभाव दिलदार असून शिवाय गोरगरीबात ते मिळूनमिसळून वागत असल्यामुळें चदनवाडी व सुदरपूर या दोन्ही ठिकाणीं त्याच्याविषयी सगळ्यांच्या मनात आदरभाव उत्पन्न झाला त्याचा मुलगा जगन्नाथ या वेळीं पुण्यास शिकत होता. सुटी असली म्हणजे तो मधून मधून चदनवाडीला येत असे वृद्ध बाबासाहेबाची दृष्टि एकदम जगन्नाथावर गेली त्याचे ते गोटीसारखें गुटगुटीत शरीर, पाणीदार डोळे, सतेज चेहरा व चेहऱ्यावरील मोहकता ही पाहून हा अगदीं लीलेला योग्य वर आहे, असें बाबासाहेबाना वाटलें. थोडी चौकशी केल्यावर तो फार हुशार आहे व त्याची वृत्तीहि अगदीं साधी आहे, असें त्याना समजले शेवटी असला जांवई हातचा घालवू नये असें त्याना वाटू लागलें. मुलीच्या आजीलाहि मुलगा पसत पडला. पुढे विनायकरावाकडे जाऊन बाबासाहेबानीं जगन्नाथाच्या लग्नाची गोष्ट काढली. विनायकरावानीं ही सगळी जबाबदारी आपले श्वशूर नारायणशास्त्री याच्यावर टाकली नारायणशास्त्र्यानी मुलगी पसंत केली व लवकरच उभयपक्षीं मोठ्या थाटानें हा विवाहसमारभ पार पडला या वेळी लीला अकराबारा वर्षांची असून जगन्नाथ सतराअठरा वर्षांचा होता. याच वर्षी जगन्नाथाची म्याट्रिकची परीक्षा पास झाली व पुढे लवकरच त्याला त्याच्या वडिलानीं शेतकीच्या अभ्यासासाठीं अमेरिकेस पाठविलें. या अवधींत लीलेच्या चारसहा खेपा सासरी

झाल्या होत्या. लीलेचें सासरचें नांव ' रुक्मिणी ' असें होतें. सासरचें बालबोध वळण व तेथील एकंदर रीतभात लीलेला फार पसंत पडली व त्यामुळें सासरच्या पवित्र व आनदमय अशा ससाराचें चित्र तिच्या हृदयावर अकित झालें होतें. लग्नानंतर जगन्नाथ फारच थोडे दिवस घरीं होता, परंतु तेवढया अवधींत त्याची जी वागणूक लीलेच्या दृष्टोत्पत्तीस आली होती, तेवढयावरून आपणास अगदीं योग्य असा पति मिळाला आहे अशी लीलेची समजूत झाली होती.

जगन्नाथ अमेरिकेस निघून गेल्यानतर सुमारें एक वर्षानें लीलेची आजी निवर्तली आणि त्यामुळें लीलेला माहेरीं यावे लागलें जगन्नाथ परत येईपर्यंत तिला माहेरीं ठेवलें तरी चालेल, असें बाबासाहेबाना तिच्या सासूसासऱ्यानी कळविलें होते. यानतर आणखी एक वर्ष जाते न जाते तोच लीलेच्या श्वशुरास म्हणजे विनायकरावाना इहलोकचा निरोप घ्यावा लागला!

इकडे नानासाहेबांचे युरोपभ्रमण बहुतेक सपलें होते, त्याचा समाजशास्त्राचा तुलनात्मक अभ्यासहि पूर्ण झाला होता. हा अभ्यास त्यानी केवळ पुस्तकीच केला होता असें नाहीं, तर पुष्कळ बाबतींत अनुभवजन्य ज्ञानही त्यानीं मिळविलें होतें. याच वेळीं इग्लंडांत वैद्यकीच्या शिक्षणासाठीं एक तरूण हिंदू विधवा राहिली होती. तिच्याबरोबर नानासाहेबाची ओळख झाली व तिनें पाश्चात्त्य समाजाची नानासाहेबाना पुष्कळ माहिती करून दिली. नानासाहेब त्या सुधारणादेवीच्या धवलद्वीपात व एका सुशिक्षित रमणीच्या सहवासांत असता त्याच्या हातीं लीलेच्या लग्नाचें पत्र पडलें! आपण हा केवढा अनर्थ करीत आहों, याची इकडे बाबासाहेबांना कल्पनाही नव्हती, परंतु तिकडे नानासाहेबांना मात्र सुधारणा एका शतकानें मागें गेल्याइतकें दु ख झालें! त्याच्या अत करणाला मोठाच धक्का बसला! लीलेला पुष्कळ शिक्षण द्यावयाचें, तिला चागली प्रौढ वयाची होऊ द्यावयाची आणि मग तिचा सुशिक्षित तरुणाबरोबर विवाह करावयाचा, असा नानासाहेबाचा संकल्प होता; परंतु बाबासाहेबानीं एका जुन्या चालीच्या घराण्यात मुलगी ढकलून देऊन मुलीचें तर अकल्याण केलेंच, पण त्याबरोबरच आपणास सुधारक समाजात तोंड दाखवण्यासहि जागा राहू दिली नाहीं, याचें नानासाहेबांना अत्यत दु ख झालें. यापुढें विलायतेंत फार दिवस घालवावयाचे नाहींत, असें त्यानीं ठरविलें व ते हिंदुस्थानात येण्यासाठीं निघाले. बरोबर समवयस्क मडळी आणि युरोपात पाहण्यासारखीं स्थळें फार, यामुळें त्यांना घरीं येऊन पोहोंचण्यास आणखी सहज दीडेक वर्ष लागलें. नानासाहेब परत आले ते साहेब होऊनच आले होते. परत आल्यावर त्यांच्या

मित्रमंडळीनें व दुसऱ्या कांहीं संस्थांनीं त्यांचा मोठा सत्कार केला. या झालेल्या अभिनदनामुळें आपण विलायतेहून खरोखरच कांहीं अपूर्व आणलें आहे, आणि म्हणूनच हा आपला सत्कार झाला असें त्याना वाटलें. या बाबतींत पुष्कळ विचार केल्यावर नानासाहेबाची अशी समजूत झाली कीं, या सत्कारास दुसरें तिसरें कांहीं कारण नसून आपला साहेबी पोषाकच आहे, तेव्हा तो आतां कालत्रयींहि सोडतां कामा नये. घरीं आल्यावर त्याना स्वत चें ते जुन्या पद्धतीचें घर, ते खेडेगाव आणि तेथोल गावढळ लोक हीं सगळींच विद्रूप व असभ्य दिसू लागलीं जिकडे तिकडे उदासपणा भरलेला असून रमणीयता जणू कोठेंच नाहीं, असें त्याना वाटू लागलें. इग्लडात जाण्याच्या अगोदर लीलेच्या शिक्षणासबधानें आपण जी खटपट केली होती, व पोषाकाच्या वगैरे बाबतीत तिला जें सभ्यतेचें शिक्षण दिलें होतें, तें सगळें फुकट गेलेलें पाहून व एकाद्या जुन्या पद्धतीच्या विनयशील स्नुषेप्रमाणें तिला घरात वावरताना पाहून नाना-साहेबाच्या अत करणाला जो धक्का बसला, त्याचें वर्णन करणेंहि कठिण. त्यानीं लीलेला कुरवाळून तिच्या या स्थितीबद्दल अश्रूदेखील गाळले; पण स्वत. लीलेला मात्र नानासाहेबाच्या या दु खाचें कारण चागलेंसें उमगलें नाहीं तिला आपण मोठ्या सुखांत आहों, असें वाटत होते. इतकेंच नव्हे, तर आपल्याला जें सासर मिळालें आहे, तसें दुसऱ्या कोणालाहि लाभलें नाहीं, असा तिला अभिमान वाटत होता; परंतु त्या तिच्या सासरचा विचार नानासाहेबाच्या मनात आला कीं, त्याच्या हृदयाला वेदना होत होत्या! लीलेचा नवरा अमेरिकेत शिक्षणासाठीं गेला आहे, हें ऐकून त्यांतल्या त्यात त्यांना समाधान झालें; पण तो शेतकीच्या शिक्षणासाठीं गेला आहे, असें कळतांच त्याची निराशा दुणावली!

---

## प्रकरण सहावें.



वृद्धावस्था आणि मानसिक क्लेश यामुळें बाबासाहेबाची प्रकृति दिवसेंदिवस खंगत चालली होती. वर्षेंच्या वर्षें निघून गेलीं, तरी वडील मुलाचा काहींच शोध लागला नाहीं. धाकटे चिरंजीव कुलदीपक निघतील अशी म्हाताऱ्याची समजूत होती; परंतु लहान मिणमिण दिव्याऐवजीं या 'साहेब' चिरजीवानीं जेव्हां 'बिज-लीची बत्ती' पाजळण्यास आरंभ केला, तेव्हां वृद्धाचें अतःकरण निराशेनें व उद्विग्नतेनें

भरून गेलें. स्वत.चा उद्योगधदा पाहण्याचें सामर्थ्य म्हाताऱ्यात उरलें नाहीं आणि नानासाहेबांना तर या उद्योगधद्यांत काहींच समजेना; लीला फार मोठी झाली होती, असें नाहीं; तथापि तिनें घरातील गडीमाणसांवर योग्य देखरेख ठेवून मोठ्या दक्षतेनें ससार चालविला होता. लीलेची ही दक्षता पाहून म्हाताऱ्याचें हृदय गहिंवरून येई, परतु नानासाहेबांना मात्र लीलेचे हें आचरण असह्य होई. लीलेसारख्या सुस्वरूप व तरुण मुलीनें गृहकार्यांत अशा रीतीनें कोंडून घेऊन त्यातच आनंद मानावा व जगाच्या उत्क्रांतीकडे लक्षहि देऊ नये, याबद्दल नानासाहेबाच्या चित्ताला इतका त्रास होई कीं, त्याची कल्पना इतराना होणार नाहीं. हिंदूची—त्यांतून ती जुन्या तऱ्हेची ससारपद्धति म्हणजे श्रमसहिष्णुतेची परिसीमाच होय, असें आता नानासाहेबाच्या प्रत्यक्ष दृष्टोत्पत्तीस आलें व हा केवळ नारीजातीवर जुलूम आहे, असें त्याना वाटू लागलें. असला हा अन्याय आणि अविचार पाहून नानासाहेबाना वृद्ध पित्याचें वर्तन असह्य झालें, आणि इकडे म्हाताऱ्यासहि नानासाहेबाचा स्वेच्छाचार व व्यवहारशून्यता हीं सहन होईनातशीं झालीं म्हाताऱ्याला आता गोविंदाची आठवण क्षणोक्षणी होऊ लागली. वृद्धपणी सुखानें व समाधानानें इहलोकचा निरोप मिळण्याची आपणास आशा नाही, हे जेव्हा बाबासाहेबाच्या लक्षात येऊन चुकलें, तेव्हा त्याना किती दु ख झालें असेल, याची कल्पनाच केली पाहिजे. अशा या परस्परविरुद्ध आचारविचारामुळे पितापुत्रात तेढ उत्पन्न होऊन एकमेकाचें मुखावलोकनहि होईनासे झाले बापाचे हें आचरण लीलेलाहि आवडत नसे, पण ती अल्पवयी मुलगी या बाबतींत काय बोलणार ? असो. एकाएकीं बाबासाहेबाची प्रकृति बिघडली आणि या दुखण्यात आपली इहलोकची यात्रा सपणार, असें त्याना वाटू लागले. मिळकत व जमीनजुमला पुष्कळ आणि वडील मुलगा देशत्याग करून गेलेला, तेव्हा बुद्धि स्थिर आहे, तोंच सगळया दौलतीचे मृत्युपत्र करावे, असें बाबासाहेबाना वाटले व त्याप्रमाणे त्यानी ओळखीचे एक दोन वकील व चार दोन इष्टमित्र बोलावून मृत्युपत्र तयार केले. या मृत्युपत्रात खालीं लिहिलेलीं मुद्याचीं वाक्ये होतीं

" * * हा हिस्सा न्याय्यतः गोविंद याचा आहे. तो त्यास, त्याच्या स्त्रीस व त्याच्या मुलाना द्यावा. परतु तो परागदा आहे. तेव्हा ही मिळकत पचानीं आपल्या ताब्यांत घेऊन तिची व्यवस्था पहावी. गोविंद, त्याची स्त्री व मुलेंबाळें यांचा शोध करण्यासाठीं पचानीं सदरहू मिळकतीच्या उत्पन्नातून योग्य तो खर्च करावा. आणखी दहा वर्षेंपावेतों त्यांच्यापैकीं जर कोणाचाच शोध लागला नाहीं, तर ही

सर्व मिळकत विकून येणाऱ्या नक्त पैशानें श्रीक्षेत्र नासिक येथें केवळ वृद्धपणामुळें पोटास मिळविण्यास असमर्थ झालेल्या सच्छील गृहस्थाना पोसण्यासाठीं म्हणून एक आश्रम घालण्यांत यावा. जर स्वतः गोविंदाचाच शोध लागला, तर मिळकत त्याच्या स्वाधीन करून त्याच्याशीं त्याच्या पित्यानें जें कठोर व अन्यायाचें आचरण केलें त्याबद्दल त्याच्या पित्याला अत्यत अनुताप झाला असल्याचें व त्यानें क्षमेचीहि याचना केली असल्याचें पचांनीं गोविंदास कळवावें. * * ''

हें मृत्युपत्र तयार झालें, त्या वेळीं नानासाहेबहि हजर होते. बाबासाहेबांची सही झाल्यावर त्याचे वकील म्हणाले, '' हें मृत्युपत्र पसत असल्याबद्दल नानासाहेबांनीं त्यावर सही केल्यास फार चागलें. ''

अथरुणावर पडल्या पडल्याच नानासाहेबांकडे दृष्टि वळवून बाबासाहेब म्हणाले, '' नाना, त्या मृत्युपत्रावर सही कर. ''

नानासाहेबाचा चेहरा या वेळीं बराच गभीर झाला होता. यावर सही करावी, असें प्रथमत त्याना वाटलें, तथापि नीट वाचून पाहून मग सही करावी, असा विचार करून ते मृत्युपत्रावरून आपली दृष्टि फिरवू लागले. सही करण्यास थोडा वेळ लागताच नाना कदाचित् काकूं करीत असावा असें वाटून बाबासाहेब थोडेसे त्रासून म्हणाले, ''नाना सही करावयाची नसेल तर तसा आग्रह नाहीं. तुझी सही नसली, तरी ते मृत्युपत्र आपलें करावयाचें तेवढें कार्य करीलच. ''

वडिलानीं स्वत वर असा भलताच आरोप केलेला पाहून नानासाहेबांना फार वाईट वाटलें. आतां इतकें खरें कीं, सहा वर्षेपर्यंत ज्या भावाचा मुळींच पत्ता नव्हता, त्याला जणू काय आपल्या न्याय्य हक्काचीच अर्धी संपत्ति फुकट जात आहे, असें काहींसें नानासाहेबांना वाटलें. परंतु सहा वर्षे न सांपडणारा भाऊ पुढेंहि कदाचित् सांपडणार नाहीं, ही आशाहि त्याबरोबरच उत्पन्न होऊन त्यांनीं हातांत लेखणी घेतली. इतक्यात भावाचा हिस्सा धर्मार्थ खर्च व्हावयाचा आहे आणि तोहि नाशिकसारख्या क्षेत्राच्या ठिकाणीं, हें वाचून तर नानासाहेबाच्या हातांतून लेखणीच गळाली ! नानासाहेबांची ती स्थिति पाहून बाबासाहेब वकिलांना म्हणाले, '' नानाची सही नसली तरी मृत्युपत्रास काहीं बाधा येणार नाहींना ? '' वकिलांनीं उत्तर दिलें, '' नाहीं. ''

कांहीं झालें तरी नानासाहेबांच्या शरीरात हिंदु रक्त खेळत होतें. आसन्नमरण झालेल्या पित्याच्या चित्ताला कोणत्याही प्रकारें दुखविणें त्यांस अनुचित वाटलें व

आपला फायदा होवो अथवा नुकसान होवो असा मनाचा ठाम निग्रह करून त्या मृत्युपत्रावर त्यांनीं सही केली. मृत्युपत्र झाल्यावर तीनचार महिन्यांच्या आंतच बाबासाहेबानीं देहत्याग केला ! वडिलांच्या मृत्यूमुळें नानासाहेबाना दु.ख होणें साहजिक होतें, परंतु त्याबरोबरच स्वत:वरचें एक मोठें दडपण नाहींसें होऊन दाही दिशा मोकळ्या झाल्यासारख्या त्यांना वाटलें. पुढें थोड्याच दिवसांत खेड्यातल्या अडाणी व असभ्य लोकांत राहून आयुष्य घालविण्यापेक्षा शहरात जावें आणि चार सन्मित्रांच्या संगतीनें सदुद्योगांत काळ घालवावा, असें नानासाहेबांना वाटूं लागलें व त्याप्रमाणें ते तयारीसही लागले.

बाबासाहेब जिवत होते, तोंपर्यंत तेथें रुक्मिणीला—लीलेला—ठेवणें यमुनेला म्हणजे लीलेच्या सासूला योग्य वाटलें, परंतु ते वारल्यावर त्या सुधारकी बापाकडे मुलीला राहू देणें अनिष्ट आहे, असें वाटून ती स्वत: बरोबर गडी वगरे घेऊन चंदनवाडीस आली. भेटीला आल्यासारखे होऊन लीलेलाहि आणतां येईल, असा यमुनेचा विचार होता, पण चदनवाडीला आल्यावर नानासाहेबांनीं तिला विलक्षण उत्तर देऊन मार्गस्थ केलें. यमुनेची आणि नाना-साहेबांची अगोदर गांठच पडेना, शेवटीं ती मोठ्या कष्टानें पडून यमुनेनें लीलेला पाठविण्याची जेव्हां गोष्ट काढली तेव्हां आपल्या डोक्यावरची साहेबी टोपी टेब-लावर आपटून नानासाहेब रागानें म्हणाले, "त्या अशिक्षित शेतकऱ्याच्या घरांत नांदण्याकरितां लीलेचा जन्म नाहीं ! मी तिचा बाप आहें, तेव्हा माझ्या वडिलां-पेक्षा मला तिचें हितानहित अधिक कळतें. बाबासाहेबांना तिचें लग्न करण्याचा कोणताहि अधिकार नव्हता आणि त्यांनी केलेलें लग्न मला मुळींच मान्य नाहीं. असलीं बाहुलाबाहुलींचीं लग्नें आमचा समाज जर मान्य करू लागेल, तर समा-जाची प्रगति म्हणून केव्हांहि व्हावयाची नाही. आपण आल्यात तशा परत जा ! पुन्हां या बाबतींत आपण कांहींही खटपट केल्यास मला आपला अपमान करावा लागेल !"

नानासाहेबांचे हे भलतेच शब्द ऐकून या गृहस्थाचें डोकें तर फिरलें नाहीं ना, असा यमुनेला संशय आला; परंतु हे शब्द शुद्धींत उच्चारण्याइतके नानासाहेब शहाणे आहेत, हें जेव्हां तिच्या लक्षांत आलें, तेव्हां पुढें काय करावें, हें त्या बिचारीला कळेनासें झालें. लीलेची गांठ पडून हा काय प्रकार आहे, तें तरी एकदांचें समजेल अशी यमुनेला आशा होती; परंतु त्या बाबतींतहि तिची निराशाच झाली. शेवटीं निरुपाय जाणून व निराश होऊन यमुना सुंदरपूर येथें परत आली.

तिनें आपल्या बापाला म्हणजे नारायणशास्त्र्याना जेव्हां ही हकीकत सांगितली, तेव्हां त्यांनाही आश्चर्य वाटलें. एकदां नानासाहेबाची गांठ घेऊन त्याचें म्हणणें काय आहे, हें समक्ष ऐकावें अशी नारायणशास्त्र्याची इच्छा होती. परंतु नानासाहेब पुण्यास कायमचे राहण्यास गेल्याचें समजल्यामुळें स्वतः न जातां नारायणशास्त्र्यांनीं एका स्नेह्यामार्फत नानासाहेबांचें काय म्हणणें आहे, तें विचारलें. यमुनेला जो जबाब नानासाहेबांनीं दिला होता, बरोबर तोच जबाब या स्नेह्यानें नारायणशास्त्र्याना कळविला! नानासाहेबाचें हें विलक्षण साहस पाहून नारायणशास्त्र्यानाहि मोठे आश्चर्य वाटलें व त्यांना नानासाहेबाचा फार राग आला. या वेळीं योग्य ती कायदेशीर तजवीज करण्याचाहि सल्ला कित्येकानीं नारायणशास्त्र्यांना दिला, परंतु असल्या बाबतींत कोर्टांत जाऊन एकमेकाच्या घराण्याच्या उखाळ्या पाखाळ्या काढीत बसणें नारायणशास्त्र्याना पसत नसल्यामुळें त्यांनीं स्वस्थ बसण्याचें ठरविलें.

या गोष्टीस काही दिवस लोटल्यावर जगन्नाथ अमेरिकेहून परत आला व त्यालाहि ही विलक्षण हकीकत समजली. यमुनेचा स्वभाव मानी व थोडा सतापी होता तिला असें वाटत होते कीं, जगन्नाथ परत आल्यावर तो या गोष्टीमुळें चिडून जाईल व नानासाहेबाना चागली शिक्षा करील, परंतु जगन्नाथानेहि आपल्या आजोबाप्रमाणेच म्हणजे नारायणशास्त्र्याप्रमाणेच आपले विचार व्यक्त केले तेव्हा अर्थातच यमुनेनें शेवटी आपला आग्रह सोडला व जगन्नाथाचे दुसरे लग्न करण्याचा तिनें घाट घातला, पण ही गोष्टहि जगन्नाथाला पसत पडली नाही. दुसरा विवाह केल्यास विनाकारण लीलेच्या आयुष्याची माती होईल, असा विचार करून तो या दुसऱ्या लग्नाच्या भानगडींत पडला नाहीं. त्याच्या वडिलानीं त्याच्यासाठीं जी शेतजमीन घेऊन ठेवली होती व पूर्वीची जी वडिलोपार्जित होती, ती सर्व आल्याबरोबर त्यानें हातीं घेतली आणि तींत अनेक सुधारणा करून शेतीचा धंदा कसा करावा, याचे उदाहरण त्यानें लोकांना घालून दिलें.

नानासाहेबांना दाही दिशा मोकळ्या होऊन स्वैरसंचारास एवढी मोटी पृथ्वीही लहान वाटूं लागली. त्यांत आणखी वाचकांच्या परिचयाचे विठ्ठलराव—आतां रावबहादूर विठ्ठलराव—यांचा पुण्यासच कायमचा मुक्काम असल्यामुळें, नानासाहेबांच्या समाजसुधारणेच्या कार्याची व्याप्ति अर्थातच विलक्षण वाढली. स्त्रीशिक्षण, स्त्रीस्वातंत्र्य, विधवाविवाह, निरनिराळ्या जातींच्या बांधवांचीं सहभोजनें, हीं

सामाजिक कार्ये करणाऱ्या पुढाऱ्यांच्या भेटी परतभेटी वगैरे कार्यबाहुल्यामुळें दिवसाचे चोवीस तासही नानासाहेबांना अपुरे वाटूं लागले. कोणत्याहि सभा-व्याख्यानांत आणि सहभोजनांत थोड्याच दिवसांत नानासाहेबाचा नामनिर्देश प्रामुख्यानें होऊं लागला. नानासाहेबांचा यशोदुदुभि पुण्यास अशा रीतीनें निनादित होत असता विमलाबाईही विलायतेहून परत आल्या. हळुहळू उभयतांच्या गांठी भेटी वाढत जाऊन त्याचें पर्यवसान उभयतांच्या विवाहात झालें. एका तीस वर्षाच्या गतभर्तृकेस अशा रीतीनें समाजात श्रेष्ठ व मानाचें स्थान मिळवून देण्याच्या कामीं नानासाहेबांनीं जें मनोधैर्य दाखविलें, त्याबद्दल नानासाहेबांच्या मित्रांनीं त्यांचा गौरव केला. असो. याप्रमाणें नानासाहेबाचा ससाररथ पुनः समान अशा द्विचक्रांनीं सज्ज होऊन तो वायुवेगानें पळूं लागला.

समाजसुधारणेच्या बाबतींत विमलाबाईंचें साहाय्य मिळाल्यामुळें नानासाहेबाचा उत्साह वाढू लागला. या सुशिक्षित गृहिणीच्या सहवासामुळें त्याना पुणें हें रुक्ष व बरेंच मागसलेलें वाटू लागलें. लागलेंच त्यानीं आपलें बिऱ्हाड हलविलें आणि ते मुबईस येऊन राहिले प्रथम कांहीं दिवस ते भाड्याच्या बगल्यातच रहात होते, परंतु लवकरच त्याचा स्वत चा बगला तयार झाला आणि त्या बगल्यात ते पूर्ण युरोपियन पद्धतीनें राहूं लागले. त्याची ती राहणी, सुधारणेविषयींची कळकळ आणि श्रीमती यामुळें मुबईसारख्या शहरातहि स्वनामधन्य होण्यास नानासाहेबाना फार वेळ लागला नाहीं. आता इतकें खरें कीं, सामान्य नागरिकाना त्याची विशेषशी माहिती नव्हती, परंतु ताजमहाल हॉटेलसारख्या पुष्कळ हॉटेलाचे खानसामे त्याना ओळखीत असत याखेरीज अशाच दर्जाच्या दुसऱ्याहि सामान्य लोकांना नानासाहेबांची माहिती झालेली होती.

* * *

बिचाऱ्या लीलेची इतका वेळ आपण विचारपूसच केली नाहीं! बापानें विलक्षण जबाब दिल्यामुळें आपली सासू विन्मुख होऊन परत गेली, हें जेव्हा लीलेला समजलें, तेव्हां तिच्या अत.करणाला मोठा धक्का बसला! ती त्या वेळीं अल्पवयी होती, हें खरें, तथापि आजपासून सासरच्या सुखाला आपण कायमचे मुकलों असे तिला वाटलें. तसेंच आपल्या बापानें हें अगदीं अनुचित कृत्य केलें, असेंहि तिला वाटलें; पण ही अनुचितता पटवून देण्याचें सामर्थ्य तिच्या जिव्हेंत नसल्यामुळें मूग गिळून बसण्यावांचून तिला दुसरा इलाज नव्हता. मुबईस आल्या-

वर लीलेला शिकविण्यासाठीं नानासाहेबांनीं एक मास्तरीण ठेवली आणि या अध्यापिकेकडून हळू हळू लीलेच्या पोषाकातहि सुधारणा होऊं लागली. लीला जात्याच बुद्धिवान् असल्यामुळें तिला मिळणारें शिक्षण ती सहज सपादन करीत असे, परंतु हें शिक्षण आपण कां सपादन करीत आहों, याचें मात्र तिला मोठें गूढ पडलें. पण कांहीं झालें तरी आपले बाबा व अध्यापिका हीं वडील, जाणतीं व सुशिक्षित, तेव्हा तीं करतील तें योग्यच करतील, असें समजून स्वत ला न आवडणारें शिक्षणही ती एकसारखें सपादन करीत होती.

लीलेची नवी आई आल्यापासून तर लीलेच्या शिक्षणावर अधिकच देखरेख सुरू झाली आणि तिच्या पोषाखातही एकदम फरक झाला लीलेच्या शिक्षणात आणि पोषाखांत अशी प्रगति होत होती, हें खरें, पण तिचें अत करण अद्यापिहि सुदरपूरच्या गृहस्थितीचें चित्र डोळ्यापुढें ठेवून उष्ण श्वास सोडीत होतें. मुबईत बापाच्या राजेशाही बगल्यात ती राहात असली तरी सुदरपूरचें तें बिनडामडौली घर तिच्या डोळ्यापुढून गेलें नाहीं. खेड्यांतलें तें साधे घर, पण त्याच्यांत अशी काय जादू होती, तें परमेश्वरालाच माहीत. मुबईस आल्यावर या नव्या आईच्या सहवासामुळें लीलेची हळू हळू सुशिक्षित स्त्री-पुरुषांशीं ओळख होऊं लागली. खरें पहाता लीलेला यामुळें किती तरी अभिमान वाटावयास पाहिजे होता, पण तिचें मन कोते असल्यामुळें उलट तिला वाईटच वाटू लागलें. अशा रीतीनें काळाच्या ओघाबरोबर लीला वहात असतां तिच्या अत करणाला आणखी एक धक्का बसला. एकादे वेळीं तिला असे वाटे की, सुदरपुराला पत्र पाठवावें आणि घेऊन जाण्याविषयीं लिहावें, परंतु हाहि आशेचा ततु एके दिवशीं तुटला चदनवाडीच्या मिळकतीची व्यवस्था पाहणारा कारकून हिशोब देण्यासाठीं मुबईस नानासाहेबांकडे आला असता, त्याची लीलेनें गाठ घेतली आणि सूचक प्रश्न करून सुदरपुराकडची हकीकत त्याला विचारली त्यानेंहि कर्णोपकर्णी वहात आलेली बातमी लीलेला कळविली. 'नानासाहेबासारख्या स्वेच्छाचारी व पुनर्विवाहित गृहस्थाच्या मुलीचें पाऊल आता सुदरपूरच्या घरात पडणें शक्य नाहीं' अशा अर्थाची बातमी त्या भागात पसरल्याचें त्यानें जेव्हा सांगितलें, तेव्हां आपल्या पायाखालची भूमि जणूं हळूहळू खाली जात आहे, असें वाटून ती अत्यत अस्वस्थ झाली अशा रीतीनें असलेला हा आशेचा तंतु जरी नाहींसा झाला, तरी तिची चित्तवृत्ति मात्र डळमळली नाहीं. आशा सपली, पण तिचें धैर्य खचलें नाहीं.

नानासाहेबाना लीला म्हणजे आपलें सर्वस्व वाटत असे. त्यातून तिला काहीशा पाश्चात्य वळणाच्या पोषाकांत पाहून व तिला थोडें फार इंग्रजी लिहितां वाचताना पाहून नानासाहेबांना लीलेविषयीं सकौतुक अभिमान वाटत असे. त्याच्या नूतन गृहिणीचीहि लीलेवर पूर्ण मेहरबानी होती. तिला पहिल्या नवऱ्यापासून मूलबाळ झालेलें नव्हतें व नानासाहेबांचा व तिचा संबध जडून चारपाच वर्षें झालीं, तरीहि तिला मूलबाळ झालें नव्हतें. कसेंहि असो, एवढें मात्र खरें कीं, सवतीची मुलगी म्हणून लीलेचा द्वेष करण्याचें कारण या बाईसाहेबाना उरलें नव्हतें व यामुळें तिच्या हृदयांत जें काय वात्सल्य होते, ते सर्व लीलेनेंच बळकावलें होतें. लीलेवर दोघाचेंहि विलक्षण प्रेम होते आणि यामुळेच लीलेच्या विवाहाच्या काळजीनें दोघांचीहि स्थिति मोठी चमत्कारिक झाली होती. बाबासाहेबानीं लीलेचें लहानपणीं लग्न करून तिच्या सगळ्या आयुष्याची माती करून टाकली, असें दोघांनाही वाटत होतें. जगन्नाथ सुदरपुराला काहीं उद्योग करीत होता हें खरें, पण त्या उद्योगाचें महत्त्व नानासाहेबाना मुळींच वाटत नव्हते. ज्या जगन्नाथाची टिमकी वर्तमानपत्रात कोठें वाजत नाहीं, सभा-व्याख्यानांतून जो कोठें झळकत नाहीं आणि जो अशिक्षित समाजात वावरत आहे, त्याच्या स्वाधीन लीलेला करणें म्हणजे जाणूनबुजून लीलेची अवहेलना करणें होय, असे नानासाहेबाना मन पूर्वक वाटत होते. सुदर, सुशिक्षित आणि पाश्चात्य संस्कृतीनें अलकृत अशा तरुणाबरोबर लीलेचा विवाह करावा, असें क्षणोक्षणीं नानासाहेबाच्या चित्तात येई, परतु त्याच्या काहीं कायदेबाज मित्रानीं पहिला विवाह झाल्यावर आणि नवरा जिवत असताना स्त्रीला दुसरा विवाह करण्याची परवानगी कायदा देत नाहीं, असे सागितल्यामुळें नानासाहेबाचा नाइलाज झाला, व लीलेविषयीं निश्चित असें त्याना काहींच ठरविता येईना.

इकडे आमच्या विठ्ठलरावाच्या भाग्योदयाची कमान मात्र एकसारखी चढतच चालली होती. त्यांना 'रावबहादूर' हा किताब मिळून शिवाय त्याचा पगारहि वाढला होता. सरकारचे ते मोठे आवडते अधिकारी आहेत, असें लोकाना स्पष्ट कळून चुकलें होतें; आणि त्यामुळेंच कीं काय कोण जाणे, लोकांकडून मात्र त्यांना अलीकडे काडीभरहि मान मिळेनासा झाला होता. लोक आपला तिरस्कार करीत आहेत, हें विठ्ठलरावांनाहि कळून चुकलें होतें; पण त्याबद्दल त्यांनीं विशेष फिकीर बाळगिली नाहीं. कारण लोक जों जों आपला तिरस्कार अधिक करतील, तों तों सरकारांत आपला मान अधिक वाढला जाईल, हें विठ्ठलरावांना कळून चुकलें होतें.

नानासाहेब मुबईस जाऊन राहिल्यावर विठ्ठलरावांचेंहि मुबईस वारंवार येणें जाणें होऊ लागलें व मुबईच्या बड्याबड्या मंडळीशीं त्याचीहि ओळख होऊ लागली. विठ्ठलरावानाहि लीलेची ही हकीकत कळल्यावांचून राहिली नाहीं. लीलेच्या एकदर परिस्थितीचा विचार केल्यावर विठ्ठलरावाच्या अत.करणात आशेचा एक ततु उत्पन्न झाला. ज्या दिवशीं या आशेनें विठ्ठलरावाच्या हृदयात ठाणें दिलें, त्या दिवसापासून विठ्ठलरावांचा चेहरा मोठा विलक्षण महत्त्वाकाक्षी दिसू लागला.

विठ्ठलरावाच्या अत करणात आता लीलेविषयीं विलक्षण पान्हा उत्पन्न झाला व नानासाहेबाबरोबर तेहि लीलेसाठीं अश्रु ढाळू लागले. एके दिवशीं यासंबंधानें विचार करीत असता विठ्ठलराव मनोराज्यांत अगदीं गुग होऊन गेले. "वसंत विलायतेहून ब्यारिस्टर होऊन आल्यावर नानासाहेबानीं जर त्याच्याबरोबर लीलेचा विवाह केला, तर मग विठ्ठलराव, तुझ्या वैभवाला पारावार उरणार नाहीं! नानासाहेबाना पोर ना बाळ! तेंव्हा त्याची सगळी मिळकत आपोआप तुझ्याच घरांत येऊन पडेल! अहाहा! मग विठ्ठलरावासारखा श्रीमान् व वैभवसपन्न कोण आहे? पण काय करावें, लीलेचे तें पहिलें लग्न जेथे तेथें नडतें आहे!"

विठ्ठलरावाच्या या मनोराज्यातील विचारावरून त्यांच्या मनात लीलेविषयीं एवढी कळकळ का उत्पन्न झाली होती, याचें अनुमान कोणासहि करता येईल. वसताची म्याट्रिकची परीक्षा झाल्यावर विठ्ठलरावानीं त्याला कांलेजात शिक्षणासाठीं ठेवलें होते, परतु कॉलेजात पाच सहा वर्षे काढूनहि जेव्हा वसतरावाची स्वारी ग्रॅजुएट झाली नाहीं, तेव्हा वसंतरावानीं विलायतेस पलायन करण्याचा विचार ठरविला! चिरंजिवाचें हें म्हणणें विठ्ठलरावानाहि पटलें व त्यानीं वसंताला विलायतेस ब्यारिस्टर होऊन येण्यासाठीं पाठविलें. रीतीप्रमाणें ब्यारिस्टर होऊन वसत याच सुमारास हिंदुस्थानात येण्यासाठीं निघाला होता. मुबईस येण्याचा त्याचा नक्की दिवस कळताच बोटीवरून उतरताना त्याचा सन्मान करण्यासाठीं विठ्ठलराव मुद्दाम मुबईस आले आणि नेहमींप्रमाणें नानासाहेबांकडे उतरले. वसत ब्यारिस्टर होऊन येत आहे, हें ऐकून नानासाहेबानाहि आनद झाला. ज्या दिवशीं वसत धक्क्यावर उतरणार होता, त्या दिवशीं होणाऱ्या समारंभाची सगळी व्यवस्था नानासाहेबांनीं आपल्या हातीं घेतली व आपल्या अनेक बधुभगिनींना आमत्रणें देऊन त्या सर्वांना बरोबर घेतलें. अशा रीतीनें या बहुतेक पाश्चात्य वळणाच्या व पोषाकाच्या मंडळीनें वसंताचें मोठ्या थाटानें स्वागत केलें. अगोदरच पाश्चात्य

संस्कृतीनें व पोषाकानें वसंत आनखशिखांत नटला होता, त्यांत आणखी अशा रीतीनें त्याचें स्वागत झाल्यामुळें त्याला स्वर्ग दोन बोटें उरावा यांत नवल नाहीं. पाश्चात्यांचे खरे सद्गुण त्याच्या अर्गी वस्तुत. मुळींच उतरले नव्हते, पण त्यांच्या दोषांचा मात्र त्यानें चांगल्या रीतीनें स्वीकार केला होता. खोट्या विद्वत्तेचा डौल, दिखाऊ सभ्यतेचा भपका आणि पाश्चात्यांचा पोषाक ही त्रयी वसताच्या अगीं उतरलेली कोणासहि स्पष्ट दिसण्यासारखी होती. कसेंहि असो, लोकांना कांहींहि वाटो, पण आपल्या चिरंजीवांनीं ध्वजा लावली, असें विठ्ठलरावाना वाटल्यावांचून राहिलें नाहीं. एकट्या विठ्ठलरावानाच काय, पण आमच्या नानासाहेबांनाहि वसतासंबधानें कांहीं कमी अभिमान उत्पन्न झाला नाहीं. वसताचा तो पोषाक, त्याची ती बोलण्याचालण्याची ऐट आणि प्रत्येक ठिकाणीं त्याच्या अगाला येणारा विलायतेचा दर्प यामुळें नानासाहेब वसतावर विलक्षण खुष झाले. हळूहळू असा सभ्य, सुशिक्षित व सुस्वरूप तरूण जर लीलेला पति मिळेल, तर केवढी बहार होईल ! असे विचार नानासाहेबांच्या चित्तात येऊ लागले, पण तो पहिला विवाह एकाद्या राक्षसासारखा वाटेत आडवा पसरलेला आहे, हें त्याच्या लक्षांत आलें, म्हणजे ते निराश व खिन्न होत.

## प्रकरण सातवें.



बॅरिस्टर वसंतराव यांनीं आपला मुक्काम नानासाहेबाकडेच ठेवला होता. मुंबईस दुसरीकडे स्वतन्त्रपणें राहण्याचा त्याचा विचार होता, परंतु नानासाहेबांनीं फार आग्रह केल्यामुळें वसताला त्यांच्याकडेच रहावें लागलें. विठ्ठलरावांनाहि नानासाहेबांचा हा विचार पसंत पडला व त्यानीं त्यासंबंधानें नानासाहेबांजवळ कृतज्ञताहि व्यक्त केली. विठ्ठलराव यासाठीं मुद्दाम आठ दिवसांची रजा घेऊन आले होते व ही रजा संपेपर्यंत नानासाहेबांनीं त्यांनाहि ठेवून घेतलें होतें. आणखी एक दोन दिवसांनीं विठ्ठलराव पुण्यास जाणार, असें पाहून नानासाहेबांनीं त्यांची एकांतीं मुलाखत घेतली व लीलेसंबधानें आपल्या अतःकरणाची कशी विलक्षण स्थिति झाली आहे, हें त्यांनीं विठ्ठलरावांना कळविलें. हायस्कुलांतल्या विद्यार्थिदशेपासून त्या दोघांचा स्नेहसबंध एकसारखा वाढत गेलेला असल्यामुळें विठ्ठलरावांकडून आपणास योग्य तोच सल्ला मिळेल, असें नानासाहेबांना खात्रीपूर्वक वाटत होतें.

एका लहानशा पण सुसज्ज खोलींत एका मूल्यवान् टेबलाजवळ दोन आराम-खुर्च्या टाकून विठ्ठलराव व नानासाहेब पडले होते. मद हिरवट प्रकाश पाडणारा विजेचा दिवा जळत होता. टेबलावर आगपेटी व उची चिरूट भरलेलें एक लहा-नसें खोकें हीं होतीं. दोघांच्याहि तोंडांत चिरूट असून धुराचीं वेंटोळीं हवेंत तरंगत होतीं. बोलण्याचा विषय लीलेच्या विवाहाचा असल्यामुळें नानासाहेबांचा चेहरा साहजिक खिन्न व उदास दिसत होता. ते म्हणाले, "खरोखर विठ्ठलराव, मी या लीलेच्या काळजीनें अगदीं वैतागून गेलों आहें ससारात लीलेशिवाय मला आतां दुसरें कोण आहे? मूलबाळ होण्याचीहि मला आशा नाहीं लीलेवर मी किती प्रेम करतों, याची जर तुम्हांला बरोबर कल्पना होईल, तर तिच्या काळ-जीनें मी कसा वेडा झालों आहें, याचीहि तुम्हाला चागली कल्पना होईल. लीलेच्या सुखावर पाणी ओतण्याचा खेळ आमचे वडील खेळले, असें म्हटल्यावाचून माझ्यानें आतां रहावत नाहीं मी विलायतेस गेलों आहें, अशी सधी पाहून त्यानीं जाणून-बुजून लीलेला भलत्याच ठिकाणी लोटून दिलें!"

विठ्ठलराव याच सुरानें सहानुभूति दर्शवून म्हणाले, "थोडा विचार करून पाहिल्यास हा विवाहच नव्हे. पण तुम्ही या विवाहास 'विवाह' म्हणून मान्यता दर्शविण्यास कबूल नाहीं ना?

"छट्! मी केव्हाहि असल्या आसुरी विवाहाला मान्यता दर्शविणार नाहीं. हा केवळ बाहुलाबाहुलीचा खेळ! पण असल्या खेळानें आमच्या समाजाचें किती अकल्याण होत आहे, याची कोणाला दादहि नाहीं!"

"तें कांहीं असलें, तरी हिंदूधर्मांप्रमाणें हा विवाह झाला, असें कबूल केल्या-वांचून इलाज नाहीं. आणि—"

"राहू द्या तुमचा तो हिदुधर्म! मी असल्या धर्माला कवडीचीहि किंमत देत नाहीं!!"

"तुम्ही किंमत द्या अथवा देऊ नका, परंतु हिदु कायद्याप्रमाणें लीलेच्या विवाहाला कायदेशीर स्वरूप प्राप्त झालें आहे. तेव्हा आता कायद्याचा भग करणें शक्य नाहीं."

निराशेनें श्वास सोडून नानासाहेब म्हणाले, "तसें असेल, तर हा समाजावर केवळ कायदेशीर जुलूम होय. ज्या अज्ञान मुलीला आपल्या पतीची निवड करण्याचें ज्ञान नाहीं, तिचा विवाह व्हावा आणि तो कायद्यानें मान्य करावा, हा

खरोखरच अन्याय होय. डायव्होर्स–काडी मोडून घेण्याची हिंदु कायद्यात कोठेच सवलत नाहीं काय ?"

"नाहीं. तशी सवलत कायद्यानें दिलेली नाहीं."

"तर मग बाबानीं लीलेला आणि तिच्याबरोबर मला पूर्णपणें आगीच्या खाईत लोटून दिलें असेंच म्हटलें पाहिजे !"

"कां ? तिचा पहिला नवरा आहे ना ?"

टेबलावर हात आपटून नानासाहेब म्हणाले, "त्या गावढळाचे नांवदेखील काढू नका. असल्या पशूच्या स्वाधीन लीलेला करावयाचें माझ्या स्वप्नातहि यावयाचें नाहीं. लीलेला मीं जें शिक्षण दिलें आहे आणि मी जो तिला सभ्यतेचा धडा घालून दिला आहे, त्या मानाने तो जगन्नाथ म्हणजे लीलेचा बूट पुसणाराहि शोभणार नाहीं !"

विठ्ठलराव चिंताक्रांत होऊन म्हणाले, "तर मग आता याला उपाय काय ?"

नानासाहेब म्हणाले, "तेच मी तुम्हाला विचारतो आहें. विठ्ठलराव, तुम्ही या बाबतीत मला काहीं तरी योग्य उपाय सुचवाल अशी फार आशा आहे. समाजात मानमान्यता कायम राहून आणि कायद्याचेहि बंधन न मोडून मला लीलेचा विवाह करता आला पाहिजे. तुम्ही जर तिच्यासाठीं कांहीं खटपट केली नाहीं, तर तिचा सगळा जन्म फुकट गेल्यासारखें होईल !"

थोडासा विचार केल्यासारखें करून विठ्ठलराव म्हणाले, "आमच्या हिंदुधर्म-शास्त्राची या बाबतीत काही व्यवस्था नाहीं, असें काहीं नाहीं. हिंदुधर्म एकाद्या गारुड्याच्या पोतडीसारखा आहे. चार शास्त्रीपंडिताचे हात जरा ओले केले म्हणजे त्याच्याकडून हवा तसला शास्त्राधार खात्रीने मिळेल. थोडे पैसे मात्र खर्च केले पाहिजेत !"

विठ्ठलरावाचे हे शब्द ऐकून नानासाहेबांचा खिन्न चेहरा एकाएकीं प्रसन्न दिसू लागला. ते उत्साहानें म्हणाले, "विठ्ठलराव, परमेश्वरानें पैशाच्या बाबतींत मला कांहीं कमी केलेलें नाहीं ! माझ्या लीलेसाठीं तुम्ही सागाल तितके रुपये मी खर्च करीन; पण दुसऱ्या पतीसमवेत समाजात तिला उजळ माथ्यानें नादतां येईल अशी कांहीं तरी व्यवस्था झाली पाहिजे." असें म्हणून टेबलावरील विद्युत्‌घंटा नाना-साहेबांनीं वाजविली. त्याबरोबर शिपायीबाण्याचा पाढरा स्वच्छ पोशाक केलेला एक अठरा एकोणीस वर्षांचा नोकर आंत आला व सलाम करून ताठ उभा राहिला.

त्याला पाहतांच नानासाहेब म्हणाले, "जा, दोन पेले चहा आण." तो नोकर आज्ञेप्रमाणें जाणार तोंच त्याला परत बोलावून नानासाहेब विठ्ठलरावाकडे वळून म्हणाले, "विठ्ठलराव, चहाच मागवू कीं-'

विठ्ठलराव किंचित् हसून म्हणाले, "तुमची इच्छा असेल ते मागवा, पण सोडा आणि व्हिस्कीच मागवा ! मला जरा आज बरेंहि वाटत नाही"

त्या नोकराला नानासाहेबानीं त्याप्रमाणें हुकूम करतांच सोडा बर्फ घातलेले मोठाले काचेचे दोन पेले व व्हिस्कीची एक बाटली टेबलावर ठेवून तो निघून गेला. त्या दोन्ही पेल्यात आपापल्या मगदुराप्रमाणें व्हिस्की ओतून त्या मिश्र पेयाची लज्जत घेत घेत पुन्हा दोघाच्या भाषणास सुरुवात झाली नानासाहेब म्हणाले, ' हिंदुधर्मशास्त्राची या बाबतींत काय व्यवस्था आहे, हे तुम्हाला माहीत आहे का ?"

दहापाच घोट घशाखालीं गेल्यामुळें विठ्ठलरावहि उत्साहित झाले होते. ते म्हणाले, "मला या बाबतींत चागलीशी काही माहिती नाही पण—

नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते पतौ ।
पंचस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ॥

असें शास्त्रवचन आहे. पति कोठे निघून गेल्यास, मृत झाल्यास, त्याने सन्यास घेतल्यास, तो क्लीब असल्यास किंवा समाजानें त्याला पतित ठरविल्यास स्त्रीला दुसरा विवाह करता येतो, अशी या शास्त्रवचनाची आज्ञा आहे तेव्हा चागली खटपट करून जगन्नाथाला पतित ठरवावें, म्हणजे लीलेला आपोआप अन्य मार्ग मोकळा झाला !"

नानासाहेब आतुरतेनें म्हणाले, "तर मग आता जगन्नाथाला पतित ठरविण्याचा उद्योग आपणास प्रथम हातीं घेतला पाहिजे !"

विठ्ठलराव गभीरतेनें म्हणाले, "नानासाहेब, जगन्नाथ पतित ठरला, म्हणजे आपला बराच कार्यभाग झाला, हें खरें, पण हें कार्य वाटतें तितकें सोपें नाहीं ! त्याला पतित ठरविण्यास आपल्या हातीं साधन काय आहे ?"

"का ? तो ब्राह्मण असून शेतीचा व्यवसाय करतो. मराठ्यांत व कुणब्यात मिसळतो, हीं कारणें काय थोडीं आहेत ?"

"छे! एवढयानें जुळावयाचें नाहीं. कारण या सुधारलेल्या युगांत असल्या गोष्टी जगन्नाथाला पतित ठरविण्यास पुऱ्या पडणार नाहींत. जगन्नाथावर कांहीं तरी विलक्षण अपराध लादले पाहिजेत; म्हणजे सुदरपूर येथील भटभिक्षुकांकडून त्याला सहज पतित ठरवितां येईल. सुदरपूरला अशीं ब्राह्मणांचीं घरें आहेत तीं कितीशीं? अवघीं पांच पंचवीस घरें आहेत त्यांतलीं फार तर चार पाच जगन्नाथाला अनुकूल अशी आहेत बाकी सर्व आपणासच सहाय्य करतील. त्या सर्वांना चांगल्या रीतीनें खूष केलें म्हणजे झालें! जगन्नाथाला ताबडतोब ते बहिष्कृत करतील!"

हर्षानें प्रफुल्ल होऊन नानासाहेब म्हणाले, "विठ्ठलराव, तर मग या कार्याला तुम्ही आजपासूनच लागा पैशाबद्दल तुम्हांला मुळींच काळजी नको. एक तर सुदरपूरचे तुम्ही रहिवाशी असल्यामुळें तुम्हांला तेथली सर्व माहिती आहे. शिवाय तुमच्या हातांत अधिकार आहे, तेव्हा तुम्हाला यश मिळाल्यावांचून खचित राहणार नाहीं."

थोडा विचार करून विठ्ठलराव म्हणाले, "मी आता वसताच्या प्रायश्चित्तासाठीं सुदरपूर येथें जातों आणि कसे काय जुळण्यासारखें आहे, ते पाहतों."

"म्हणजे? तुम्ही वसतरावाना प्रायश्चित्त देणार कीं काय?"

"खरें विचाराल, तर त्याला प्रायश्चित्त देण्याचा माझा मुळींच विचार नव्हता, पण या एकदर नाटकाच्या तयारीसाठीं मला आतां वसताला प्रायश्चित्त देणें जरूर झालें आहे नानासाहेब, हें सगळें खरें, पण लीला आता बरीच समजूत-दार झाली आहे, तेव्हां तिचा काय मनोदय आहे, याची आपण कांहीं चौकशी केली आहे का?"

"तिचा मनोदय तो कसला पहावयाचा? माझ्याच देखरेखीखालीं ती वाढली आहे. तसेंच तिची आई जरी सावत्र आहे, तरी तिनेंहि या बाबतींत लीलेच्या मनावर योग्य ते बीजारोपण करण्याचा प्रयत्न केला आहे, आणि मुख्य गोष्ट ही कीं, तुमच्या वसतरावांना यासबधानें मीं आपला मनोदय कळवून लीलेबरोबर बोलण्याचालण्यास परवानगी दिली आहे."

जणूं काय कांहींच माहीत नाहीं, अशा अर्थाचें विलक्षण आश्चर्य दाखवून विठ्ठलराव म्हणाले, "म्हणजे? एवढयांत वसताची आणि तुमची इतकी दाट ओळख झाली? नानासाहेब, एक प्रकारें मी हें वसंताचें भाग्यच समजतों; पण या कार्यांत जर आपणास यश आलें नाहीं, तर मात्र त्याची विलक्षण निराशा होईल!"

" अशी निराशा होऊ नये, म्हणून तुम्ही आतां काय लागेल ती खटपट करा. पैशाची वगैरे तुम्ही सांगाल ती मदत करावयास मी तयार आहें."

या वेळीं विठ्ठलराव अगदीं खुशींत होते. नानासाहेबाच्या कानांत कांहीं हलकेच सांगून नंतर ते मोठ्यानें म्हणाले, " हा उपाय आहेच कीं नाहीं ? पधरा वीस वर्षे जगन्नाथाला तुरुंगांत कोंबण्याइतकें विठ्ठलरावाचें डोकें तरतरीत आहे."

विठ्ठलरावांनीं नानासाहेबांना काय सागितलें, तें परमेश्वराला ठाऊक ! पण ते शब्द ऐकून नानासाहेबांचा चेहरा थोडा भयाकुल झाला, एवढे मात्र खरे ! विठ्ठलरावांनीं सुचविलेला उपाय त्यांना जरा चमत्कारिक असा वाटला, पण लीलेवर त्यांचें विलक्षण प्रेम असल्यामुळें त्यानीं त्यासबधानें विरोध दर्शविला नाहीं. ते म्हणाले, " विठ्ठलराव, तुम्ही अगोदर सुदरपुरास जाऊन भटभिक्षुकाकडूनच आपला कार्यभाग साधून घ्या. तसे न जुळल्यास तुमच्या या उपायासबधानें पाहतां येईल. कांहीं झालें, तरी समाजांत आपली मानमान्यता कायम राखली पाहिजे, व लीलेचेहि कल्याण झालें पाहिजे. हिंदुधर्मातले शास्त्राधार मिळून हा विवाह चार प्रतिष्ठित शास्त्रीपडिताच्या हातानें झाला, म्हणजे आपल्या समाजावर देखील फार उपकार होतील. ज्या अनेक बालिका अयोग्य पतींच्या हातीं पडल्या असतील, त्यांचा योग्य पतीशीं पुन्हा विवाह करण्यास मार्ग मोकळा होईल."

" वास्तविक मीदेखील या महदुद्देशाकडेच लक्ष देऊन हें काम करणार आहें. वसत आता ब्यारिस्टर होऊन आला असल्यामुळें त्याच्या विवाहाची काळजी करण्याचे खरोखरच काहीं कारण नाहीं. परंतु आता केवळ लीलेसाठींच त्यानें इतर मुलींच्या मागण्या नाकारल्या पाहिजेत. तो समजूतदार आहेच; शिवाय उद्या त्याला मी यासबधानें आणखी चार दोन गोष्टी सागेन. वसतासारख्या तरुणांनीं समाजांत आपली कर्तबगारी दाखविल्यावाचून समाजाची तरी प्रगति कशी होणार ? आतां कांहीं लोक नांवेंहि ठेवतील, पण तिकडे लक्ष दिल्यास समाजातल्या निरपराधी बालिका आजन्म दुःखांत राहतील; तेव्हां याचाहि विचार केला पाहिजे. बरें, आतां यासंबंधानें उद्यां अधिक बोलूं. आज मला एका गृहस्थाकडे काही कामासाठीं जावयाचें आहे." असें म्हणून विठ्ठलरावानी टेबलावरील पेल्यात उरलेलें सर्व पेय उदरस्थ केलें आणि त्या नादांत आणि मनोराज्यांत दग होऊन ते निघून गेले !

---

## प्रकरण आठवें.



ब्यारिस्टर वसंतराव थोड्याच दिवसात मुंबई शहरीं प्रसिद्धीस आले. आतां ही त्यांची प्रसिद्धि लौकिक व दुर्लौकिक या दोन्हीहि प्रकारानीं झालेली होती! कसेंहि असलें, तरी एवढें खरें कीं, वसंतराव ही एक विलक्षण व्यक्ति आहे, अशी लोकवार्ता मुबईच्या बऱ्याच भागातून प्रचलित झालेली होती. त्यांची विलक्षण विद्वत्ता, त्यांचें अगडबब ज्ञान, समाजसुधारणेचीं त्यांचीं अश्रुतपूर्व मतें, वगैरेचें जेव्हां जेव्हां ते प्रदर्शन करीत, तेव्हां तेव्हा ते जणू काय एकाद्या निराळ्याच लोकीं असून अगदीं नवीनच कांहीं सागत आहेत, असें प्रत्येकास वाटे. केवळ नाविन्यामुळेंच पुष्कळ गोष्टी जशा चमत्कारिक वाटतात, त्याचप्रमाणें या नवीन विचारांमुळें वसंतराव हे एक विक्षिप्त तरुण आहेत, असाच पुष्कळाचा समज झाला होता. समाजसुधारणेसबधाच्या अगदीं क्षुल्लक सभेलासुद्धा वसतराव हे हजर असावयाचेच व तेथे त्याचे थोडें फार भाषण हे व्हावयाचेंच, असें अगदी त्या वेळीं ठरून गेलें होतें. ‘मी विलायतेस जाऊन आलो आहे, आणि विलायतचे लोकहि असेंच करतात.’ हा एक त्यांच्या कोणत्याहि भाषणांतील ठराविक मुद्दा असावयाचाच आणि या मुद्यावरच त्यांच्या सगळया भाषणाची इमारत रचलेली असावयाची हें तात्पुरतें सपादन केलेलें वसताचें ज्ञान हळू हळू सपुष्टांत येऊं लागलें आणि त्यातलें नाविन्यहि आतां जुनें झाल्यामुळें इतरत्र तर असो, पण त्याच्या स्नेह्यातही त्याच्या बद्दलचा आदर कमी होऊ लागला. प्रथम प्रथम हे खरोखरच कोणी आदर्श पुरुष आहेत, असा निदान त्याचा तरी समज झाला होता. त्यांना वसतरावांचे आरंभी आरंभीं बरेंच महत्त्व वाटत होतें, परंतु त्यांत जे समंजस होते, त्यांना पुढें पुढें हें त्याचें महत्त्व वाटेनासें होऊन वसंताला त्यांनीं दूर दूर लोटण्यास आरंभ केला.

बिचारे खुशाल लोटोत! वसंतानें त्याबद्दल मुळींच क्षिति बाळगिली नाही. जगांत हें असें चालणारच. आपलीं मतें सगळ्यांच्याच पसंतीला उतरविण्याचें सामर्थ्य ब्रह्मदेवाच्या देखील अगीं नाही. मग वसताच्या कांहीं मताबद्दल अथवा त्याच्या आचरणाबद्दल कोणी तिरस्कार दर्शविला, तर त्यांत वसंतानें तरी काय

म्हणून विषाद मानावा? आणि जसे कांहीं तिरस्कार दर्शविणारे होते, तसे कांही त्याचा सत्कारहि करणारे होते. ज्या नानासाहेबाच्या घरीं वसंताचा मुक्काम होता, ते स्वतः नानासाहेबच वसंताला अत्यंत आदरानें चाहत होते. नानासाहेबांची पूर्ण मेहरनजर असल्यावर वसताला दुसऱ्यांच्या आदरसत्काराची एवढी गरजहि नव्हती. तसेंच मुबईस आल्यावर वसंताला असे काहीं स्नेही मिळाले होते कीं, वसंताचें स्तुतिस्तोत्र गाण्याशिवाय दुसरें कांहीहि त्यांना रुचत नसे. आतां इतकें खरें कीं, वसताचा खिसा गरम असल्यावांचून मात्र ते त्याचें स्तुतिगान गात नसत. आतां हा सौदा कितीहि महाग असला, तरी त्यावाचून वसताचें चालणें शक्य नव्हतें त्याच्याचसारख्या साहेबी पोषाकाचे चार दोन स्नेही जर मुंबई शहरात नसले, तर आणखी कोठे असावयाचे आणि लोकांना विलायती सस्कृतीचे नमुने तरी कसे दिसावयाचे? तात्पर्य, काहीं लोक वसंताचा सत्कार करीत, तर कांहीं तिरस्कारहि करीत वसताचा सत्कार करण्यात जसा नानासाहेबानी पहिला नबर पटकावला होता, तसा वसताचा तिरस्कार करण्यात लीलेनें पहिला नबर पटकावला होता. वसत आणि लीला या उभयतात नितांत पवित्र स्वर्गीय प्रेमभाव उत्पन्न व्हावा, म्हणून नानासाहेबानी वसताला घरात सगळीकडे वावरण्याची परवानगी दिली होती, पण आश्चर्य हें कीं, लीलेची आणि वसताची गाठ अशी क्वचितच पडे, आणि पडलीच तर त्या सभाषणाची कामगिरी लीलेनें नोकरीस ठेवलेली चंद्रभागा आपणाकडे घेऊन वसताला रजा देई हायकोर्टाचें दर्शन घेण्याचा वसतास अद्यापि एकहि प्रसग आला नव्हता, तथापि त्याबद्दल काळजी करण्याचें त्याला कारण नव्हते. नानासाहेबाची प्रचंड दौलत लीलेसह आपणासच मिळावयाची आहे, अशी त्याची खात्री होती व या आशेनें त्याचें मन इतकें गुग झालें होतें की, लीलेच्या प्रत्येक हालचालींत तिरस्कार न दिसता त्याला आदरच दिसत असे. वसताच्या अगीं अनेक दोष असतील, पण एक गुण मात्र त्याच्या अंगीं निःसशय होता. तो गुण म्हणजे त्याचें मिठ्ठास बोलणें हा होय. तो बोलूं लागला, म्हणजे नानासाहेबांना मोठी मौज वाटे.

विठ्ठलराव पुण्यास जाऊन पोहोंचल्यावर वसंताच्या प्रायश्चित्ताचा विधि कशा रीतीनें उरकावयाचा, हें त्यांनीं सुंदरपुराच्या भटभिक्षुकाना पत्रानें विचारलें व त्या बाबतींत त्यांच्याकडून उत्तर आल्यावर त्यांनीं त्याप्रमाणें वसंताला कळविलें. स्वतःला प्रायश्चित्त देण्याचें ठरविलें आहे, हें जेव्हा वसंताला समजलें, तेव्हां

त्याला फार वाईट वाटलें व बापाचा फार रागहि आला; परंतु या प्रायश्चित्तविधींतलें एकदर रहस्य जेव्हां एक लांबलचक पत्र लिहून विठ्ठलरावांनीं वसंताच्या नजरेस आणून दिलें, तेव्हां विठ्ठलराव सुदरपूरला जाऊन पोहोंचण्याच्या आधींच वसंत आपल्या चार दोन मित्रांसह सुदरपूरला आला. ही मुबईहून आलेली साहेबी पोषाकाची मडळी जेव्हां त्या खेड्यांत हिंडू लागली, तेव्हा वसंताचा व लोकांचा एकमेकाविषयीं बराच गैरसमज उत्पन्न झाला. आपण कोणी तरी राजमान्य व लोकमान्य गृहस्थ गावांत आलों असल्यानें गावात मोठी गडबड उडाली असावी, असें या वसत–मडळास वाटलें, तर गावात कोणी क्रिस्ताव–बाटे आले आहेत कीं काय, असा गावांतल्या लोकाना सशय उत्पन्न झाला. जवळ कोठे तरी साहेब स्वारी आली असावी आणि त्याचे हे बबर्जी असावेत, असेंहि कोणी म्हणू लागले. एक गृहस्थ म्हणाला, "तुम्हाला काही माहिती नाहीं. ते फार सभ्य गृहस्थ असून कोणी वकील, कोणी ब्यारिस्टर असे आहेत! मुबईहून येथें हवा पालटण्यासाठीं चार दिवस आले आहेत." यावर दुसरा गृहस्थ जरा मोठ्यानें म्हणाला, "अरे, राहू देत तुझे सभ्य गृहस्थ! सभ्य गृहस्थ आम्ही केव्हा पाहिले नाहींत कीं काय? काल रात्री सगळे दारू पिऊन धिंगामस्ती करीत होते! त्या रामदीन हलवायाला विचार! त्याच्या दुकानाजवळच त्यानीं दगा केला." तिसरा एक म्हणाला, "हो, हो! काल हलवायाच्या दारापुढें दगा झाला, असें मींदेखील ऐकलें. पोलिसानीं दोघाना पकडलें होतें, पण थोड्या वेळानें सोडून दिलें! यावरून ते कोणा तरी साहेबाचेच नोकर असावेत!" "अरे, पण त्यांच्या अगांतले कपडे तर फार उची दिसतात." "त्यात काय मोठेंसें? युरोपियन लोक आपले सूट चार आठ दिवस वापरून खुशाल नोकरांना देऊन टाकतात!" "पण ते रस्त्यानें जातांना इंग्रजी बोलतात!" "साहेबांचें ऐकून ऐकून आगगाडीवरचा कोळसेवाला देखील इंग्रजी बोलतो!"

लोकच ते! त्यांच्या तोंडाला कोण हात लावणार? पण एवढें खरें कीं, मुबईहून आलेल्या या पाहुण्यांसंबंधानें गावात बरीच खळबळ उडाली होती. खेड्यांतले लोक म्हणजे खेडवळ, तेव्हा त्यांच्या समक्ष वाटतील तसले चाळे करण्यास या वसंत–मडळास अर्थातच कसलीहि शंका आली नाहीं. इतकेंच नव्हे, तर सोल्जर किंवा अन्य युरोपियन केव्हा केव्हां जो उच्छृंखलपणा करतात, त्याचा कित्ता गिरविण्यास मुंबईसारख्या शहरांत सवड नसल्यानें या खेड्यांत ती हौस

या मडळानें भागवून घेतली, असाहि गांवांतले लोक त्यांच्यावर आरोप करू लागले. हें म्हणणें कितपत खरें असावें, याची आम्हांस तरी शका वाटते. सुशिक्षित व सभ्य गृहस्थ असे कसें करतील ? जाऊ द्या, या सभ्य गृहस्थांची अब्रू राखण्याचा आम्ही कितीहि प्रयत्न केला, तरी त्यांत आम्हांला यश मिळूं न देण्याचा त्यांनीं निश्चयच केलेला दिसतो. कारण एक दिवस रानात हवा खात असतां एक निराळाच प्रकार या वसत–मडळानें केला आणि सगळ्यानाच त्याबद्दल चांगलें बक्षिस मिळालें खेड्यांतले आडदांड व अशिक्षित लोक ते ! त्यानीं या सभ्य गृहस्थाना त्या वेळीं खरपूस बक्षीस दिलें कोणी म्हणतात, हा बक्षिससमारंभ जगन्नाथाच्या चिथावणीनें पार पडला. कसेंहि असो, इतकें मात्र खरें कीं, प्रायश्चित्त घेण्याच्या आधीच वसंतरावाची स्वारी सुदरपुरातून अतर्धान पावून एकदम मुबईत अवतीर्ण झाली

विठ्ठलरावाना हा प्रकार काहींच माहीत नव्हता. वसंत सुदरपुराला गेला आहे, या समजुतीवर ते पुण्याहून निघाले ते सुदरपूरला आले त्याचा कुलोपाध्याय त्याची वाटच पहात होता. वसंतानें गावांत चार दोन दिवसाच्या अवधीत कसा लौकिक सपादन केला, हें जेव्हा त्यानें विठ्ठलरावांना सागितलें, तेव्हा विठ्ठलरावहि गार झाले. थोडा विचार करून ते आपल्या उपाध्यायाला म्हणाले, " शामभट, तारुण्यात असें व्हावयाचेंच ! गांवातल्या लोकांनीं याचा निष्कारण बाऊ केला आहे, दुसरें काय ! अहो, आपण आपल्या तारुण्यात कशा रीतीनें वागलों, याचा विचार करा म्हणजे झाले वसत गेला, हेंहि एक प्रकारें बरें झालें. तिकडे त्याचें कोर्टाच्या कामाचे तरी नुकसान होणार नाहीं. "

शामभट साधारणपणें पंचेचाळीस वर्षाचे असून शरीराने बरेच स्थूल व वर्णानें काळेसावळे होते. भटजींना तपकिरीचें विलक्षण व्यसन जडले होते. कनवटीला तपकिरीनें भरलेली एक मोठी थोरली काळी डबी नेहमीं असावयाचीच. एक चिमूट त्या डबींतून काढून भटजीनीं नाकात कोंबली आणि नतर फडक्यानें नाक पुशीत पुशीत ते म्हणाले, " तें खरें, पण हा प्रायश्चित्तविधीचा सगळा खटाटोप व्यर्थ गेला ना ? "

भटजींनीं नाकांत तपकीर कोंबलेली पाहून विठ्ठलरावानीहि आपल्या सामानाच्या पेटींतून एक चिरूट काढला आणि तो पेटवून धुराचे फूत्कार सोडण्यास आरंभ केला. नंतर त्यांनीं एक सिगारेट काढली व ती भटजीपुढें केली.

मोठ्या विनयानें ती घेऊन भटजी म्हणाले, "कशाला, कशाला. मला कांहीं ओढण्याची सवय नाही ! पांच वर्षांपूर्वी एकदां आगगाडीत ओढली होती. वाः ! ही मोठी छान आहे ! धुराला एक प्रकारचा स्वाद आहे ! चार सहा आणे एकीला पडत असतील ! असल्या सिगारेट आम्हा गरिबाच्या दृष्टीसदेखील पडावयाच्या नाहीत. खरेंच रावसाहेब, आपण अगदीं नांव काढलेंत. सुदरपुराचे सगळे लोक तुमचे पोवाडे गातात. या गावात तुमच्याशिवाय श्रेष्ठ असा कोण आहे ? वसत-रावांचा प्रायश्चित्तविधि एकदा यथासाग पार पडला, म्हणजे मग तुमच्या कीर्तीत उणेपणा असा राहिला नाही."

भटजीचें हें लाघव पाहून विठ्ठलराव मनांतल्या मनांत हसून म्हणाले, "भटजी, वसंतानें प्रायश्चित्त घ्यावयाचे खरें, पण कोर्टाचे काम टाकून तो राहणार तरी कसा ? मी असें ऐकतो की, तुम्ही मोठे शास्त्रव्युत्पन्न आहा, तेव्हां मी तुम्हांला असे विचारतों की, हा प्रायश्चित्त विधि दुसऱ्यानें केला, तर चालतो की नाही ? ग्रहाचे जप जसे ब्राह्मणाकडून करवितात, तसें प्रायश्चित्तही दुसऱ्यानें घेतल्यास काय हरकत आहे ? बरें, हें प्रायश्चित्त अगदीच दुसऱ्याकडून घ्यावयाचे आहे, असेंहि नाही, मुलाकरता बापानें घ्यावयाचें ! "

शामभटजी डोकें खाजवीत म्हणाले, " वास्तविक असें करावयाला काही हर-कत असू नये, पण तसा शास्त्राधार—अ–अ–आणि—"

विठ्ठलराव म्हणाले, " शामभटजी, केवळ लौकिक दृष्टीनें हा प्रायश्चित्ताचा विधि उरकावयाचा आहे. पैशासबधानें तुम्ही काळजी करू नका. पाच पन्नास रुपये अधिक लागले, तरी हरकत नाही–आणि–शिवाय—"

जास्त पैशाचें नाव ऐकताच शामभटजीच्या तोंडाला पाणी सुटलें ते हें हें करीत म्हणाले, " रावसाहेबाची प्रकृति पहिल्यापासूनच उदार, धर्मावर श्रद्धाहि दांडगी. रावसाहेब, अहो या बाबतीत एक दोन काय, पण अनेक शास्त्राधार आहेत. पाहिजे तर उद्या ते मी आपणाला दाखवितों."

" छे ! छे ! मला दाखविण्याचें काहीं कारण नाहीं. ते तुमच्याच भटभिक्षु-काना पसंत पडले म्हणजे झालें. आणि हें पहा शामभटजी, या समारंभासाठीं सगळे भटभिक्षुक व शास्त्रीपुराणिक आले पाहिजेत. त्याची समति कशी मिळ-वावयाची, ते तुमचें तुम्ही पहा."

" त्याबद्दल तुम्हांला काळजी नको. झाडून सगळा गाव मी गोळा करतों. अहो, चकाकणाऱ्या रौप्य वर्तुलासाठीं प्रत्यक्ष मनूदेखील आपली स्मृति बदलील ! मग या शास्त्रीपुराणिकाची काय कथा ? बरें जातों. मी आता या उद्योगाला लागतों "

विठ्ठलरावानीं ' बरे ' म्हणून म्हणताच शामभटजींची स्वारी आपलें पाढरें स्वच्छ पागोटे डोक्यावर ठेवून आणि नाकात तपकीर कोंबीत कोंबीत खोलीच्या बाहेर पडून रस्त्याला लागली शामभटजी गेले असें पाहून विठ्ठलरावानीं आपली कातड्याची ब्याग उघडली आणि तीतून एक मोठी थोरली बाटली काढून त्यातले पेय एका पेल्यात ते ओतू लागले. इतक्यात शामभटजी चटकन् आत शिरले ! " म्हटलें, सामानाची यादी रात्रीं दाखवायला आणू की उद्या ?" असे काहींसें ते पुटपुटले, पण यजमान शक्तीची उपासना करीत आहेत, असे पाहून भटजीनीं पुन्हा झटकन् दार लावून घेतलें आणि तेथून पलायन केलें ! ' कसेंहि असो. आपला खिसा गरम झाला, म्हणजे झालें. यजमानाच्या असल्या कृतीवरून आम्ही जर त्याच्यावर रुसलों, तर आमच्याच पोटाला चिमटा बसावयाचा. यजमानाचा तरी काय दोष ? काळ बदलला, तसें आचरणहि बदलत चाललें.' असे कसें तरी मनाचे समाधान करून शामभटजी गावातल्या भटभिक्षुकाच्या भेटी घेण्यात गर्क होऊन गेले !

दुसऱ्या दिवशी सकाळचे नऊ दहा वाजले नाहीत, तोंच विठ्ठलरावाची ओसरी सुमारें पधरावीस गृहस्थानी फुलून गेली यात कांही भटभिक्षुक असून काहीं शास्त्रीपुराणिकहि होते ओसरीवर गाद्यातक्याची जुन्या थाटाची बैठक माडलेली असून तीवर वाटेल तसे शास्त्राधार काढून देणारी ही विद्वान् मडळी फार व्यवस्थेनें बसली होती. मुख्यासनावर शामभटजी सफेत पागोटे घालून बसले होते, आणि त्याच्याच शेजारीं लालभडक रेशमी पगडी घालून विठ्ठलराव बसले होते. खरोखर ज्याना गृहस्थ म्हणता येईल, असें या मंडळीत कोणीच नव्हते. गांवांत अत्यत विद्वान् व सदाचारसपन्न म्हणून प्रसिद्ध असलेले नारायणशास्त्रीहि या मंडळींत दिसत नव्हते. निमत्रित सर्व मडळी जमल्यावर या सभेची स्तब्धता मोडण्यास हरिशास्त्री यानीं आरंभ केला. हे शास्त्री शास्त्रव्युत्पन्न नसले, तरी विद्वत्तेचा डौल मिरविण्याची कला त्याना चांगली साधली होती. त्याच्या जवळच गंगाधर दीक्षित बसले होते. या दीक्षितांनाहि धर्मसिंधु वगैरे ग्रंथ मुखोद्गत

असल्याबद्दल फार अभिमान होता. हरिशास्त्री दीक्षिताना म्हणाले, " दीक्षित, रावसाहेबांच्या चिरंजिवांनी–वसतरावांनीं–आपल्या गांवाचे नांव राखलें. अहो, विलायतेस जाऊन ब्यारिस्टर होऊन येणें म्हणजे कांहीं चेष्टा नव्हे. त्याला केवढी बुद्धिमत्ता लागत असेल, याची आम्हाला तर कल्पनाहि होत नाही !"

गगाधर दीक्षित हसून म्हणाले, " बुद्धिमत्तेवाचून असल्या गोष्टी शक्यच नाहीत शिवाय चिरजीवांचे आचरणहि अत्यत शुद्ध ! विलायतेस म्हणे फार सदाचरणानें वागत होते !" असे म्हणून दीक्षित विठ्ठलरावांकडे सहास्य नजरेनें पाहू लागले. विठ्ठलराव किंचित् विनीतभावानें म्हणाले, " आचरण शुद्ध खरें, पण कांहीं झालें तरी परका मुलूख. तेथे किती जपून वागणार ? तथापि मी बरोबर एक ब्राह्मण स्वयपाकी दिला होता, आणि पुष्कळशीं तुळसीपत्रेहि दिली होती "

" तुलसी सर्वपापघ्ना गदाधर शिरोस्थिता " असें गभीर स्वरानें उच्चारून एकवार सगळ्या सभेवर दीक्षितांनी नजर टाकली नतर ते म्हणाले, " अहो, ती सर्व पापाचें हरण करणारी तुलसी बरोबर असल्यावर दोष येणार कोणत्या दिशेनें ?" असे म्हणून दीक्षित हंसू लागले. दीक्षितावर ताण करण्याच्या हेतूनें हरिशास्त्री तितक्यांत म्हणाले, " 'वसति नृपति यत्र स तीर्थ पुष्करादपि !' अहो, राजा म्हणजे विष्णुस्वरूप तेव्हां खरे पाहिलें असतां, इग्लंड म्हणजे वैकुठ ! अशा ठिकाणी जाण्यात दोष नसून उलट पुण्यच आहे ! ! "

विठ्ठलराव म्हणाले, " तें सगळें खरें, पण काही झालें, तरी परधर्मीयाचा मुलूख अल्प स्वल्प ससर्गदोष लागणारच. तरी मी त्याला घरी आल्याबरोबर गंगास्नान घातलेंच, तथापि लोकापवाद आणि स्वत चीहि इच्छा म्हणून प्रायश्चित्त घेणें युक्त होय. "

" अहाहा ! केवढी ही धर्मश्रद्धा ! अहो, कलियुगात असल्या विभूति क्वचितच दिसतात ! गंगेच्या नुसत्या नामस्मरणानें देखील प्राणी पावन होतो, मग स्नानाचें महात्म्य काय सांगावें ? असे असतांहि प्रायश्चित्त देण्याचा विठ्ठलरावाचा हेतु पाहिला, म्हणजे धर्माचा अवतार पुन्हा प्रगट झाला, असेच वाटतें ! " असें म्हणून शामभटजींनीं तपकिरीची चिमूट नाकांत कोंबली आणि डबी हरिशास्त्र्यांपुढें केली. तपकिरीला हात लावला न लावल्यासारखें करून हरिशास्त्री म्हणाले, " अहो, या असल्या श्रद्धेमुळेंच लक्ष्मी आणि सरस्वति या दोघी विठ्ठलरावांपुढें हात जोडून उभ्या आहेत. अहो, भाग्यदेवता अपवित्र ठिकाणीं मुळींच वास

करीत नाहीं ! " नंतर विठ्ठलरावाकडे वळून ते म्हणाले, " आपला हेतु खरोखर योग्य आहे. वसतराव प्रायश्चित्तासाठीं केव्हा येणार आहेत ?"

विठ्ठलराव थोडे अडखळत म्हणाले, " तो तेवढ्यासाठीं येथे आलाहि होता, पण धदा पडला ब्यारिस्टरीचा, तेव्हा मी येण्यापूर्वीच त्याला मुबईला जाणें भाग पडलें ! आणखी थोडे दिवस त्याला येण्यास सवडहि होणार नाही, आणि तितके दिवस प्रायश्चित्तावाचून घरातले कुलाचार चालविणें मला प्रशस्त वाटत नाहीं. म्हणून त्याच्यासाठीं मीच प्रायश्चित्त घेण्याचे ठरविलें आहे. अशा रीतीनें प्रायश्चित्त घेतलें असता चालते, असें पुण्याच्या एका विद्वान् शास्त्र्यानें सागितल्यावरून मुद्दाम येथे आलों. मुलासाठी बापाला प्रायश्चित्त घेण्यास काहीं हरकत नाहीं, असें शामभटजींचेहि म्हणणें आहे. "

शामभट गभीर स्वरानें म्हणाले, " मी म्हणजे पदरचे थोडेच सागतों आहें ? तसा शास्त्राधारच आहे ! कां हरिशास्त्री ? "

शास्त्राधाराचा हवाला हरिशास्त्र्याच्या अगाशी आल्यावर ते साहजिक गोंधळले, पण तितक्यात त्याना शामभटजीनी आपल्या खिशात काल रात्रीं एक लहानसा काळ्या ताबड्या छापाचा कागद कोंबल्याची आठवण झाली व त्याबरोबर ते मोठ्या उत्साहाने म्हणाले, "अहो, एक काय, पण छपन्न आधार आहेत ! ज्या गृहस्थास खरोखर प्रायश्चित्त घ्यावयास पाहिजे, त्याच्याकरता त्याच्या मुलाने, स्त्रीनें अथवा पित्यानेंहि प्रायश्चित्त घेण्यास शास्त्रकारानीं पूर्ण मोकळीक ठेवली आहे !"

दीक्षित म्हणाले, " अहो, नाहीं तर मग शास्त्रकार ते काय ? इतकी दूर दृष्टि ठेवून त्यानी शास्त्रे तयार केली म्हणूनच तीं अजून चालू आहेत ! लोकांच्या व्यवहारास सुलभता यावी, हाच नाही तरी शास्त्रकाराचा हेतु ! रावसाहेबांनीं पूर्ण प्रायश्चित्त घेऊन वसतरावानीं नुसतें पचगव्य घेतलें म्हणजे झालें ! "

विठ्ठलराव गभीरतेनें म्हणाले, " मला या बाबतींत काय समजतें ? तुम्ही सांगाल तसें वागावयाचें, एवढेंच मला माहीत आहे. माझी इच्छा अशी आहे कीं, उद्या प्रायश्चित्त घ्यावे आणि परवां ब्राह्मणांची योग्य सभावना करून त्यांना व गांवांतील चार प्रतिष्ठित गृहस्थाना भोजनास बोलवावें. प्रत्येक ब्राह्मणास एक एक धोतरजोडा, एक रुपया दक्षिणा व पळीपंचपात्री, इतकें देण्याचें मीं ठरविलें आहे. शिवाय याज्ञिक ब्राह्मणांचा योग्य पुरस्कार घ्यावा, अशीहि माझी इच्छा

आहे; पण या गांवांत नारायणशास्त्र्यांचें प्रस्थ मोठें आहे. या सगळ्या प्रांतात लोक त्यांना फार मोठे विद्वान् व सत्वस्थ समजतात, तेव्हां या कार्याला त्याची संमति मिळाली, तर फार चागलें. अगोदर तुम्ही सगळे काय म्हणतां ते पहावें आणि मग त्याना बोलवावें, असें मी ठरविलें होतें तेव्हा तुमच्यापैकी कोणीं तरी जाऊन त्याना बोलावून आणाल, तर दुधात साखर पडल्यासारखें होईल."

शामभटजी कांहींसे चिंतातुर झाले. शामभटजीच काय, पण नारायणशास्त्र्याचें नाव ऐकून सगळेच भटभिक्षुक बावरल्यासारखे झाले शामभट म्हणाले, "मीच जाऊन त्याना बोलावून आणतों, पण ते तेथे येण्यानें दुधात साखर पडण्याऐवजीं कदाचित् दुधात मिठाचा खडाहि पडावयाचा!"

विठ्ठलराव म्हणाले, "तसे जरी झालें, तरी त्याचा दोष मग आपणावर नाहीं. तुम्ही सगळ्यानीं वसताला पावन करून घेतल्यावर एकट्या नारायणशास्त्र्याच्या मताला कोण विचारतो? जा तुम्ही त्याना बोलावून तर आणा."

शामभट तसेच नारायणशास्त्र्याना बोलावण्यास गेले शामभट गेल्यावर थोड्या इतर गप्पागोष्टी मडळीत सुरू झाल्या इतक्यांत सत्यभामा तेथे येऊन उभी राहिली. कोर्टातल्या तट्याचा निकाल होऊन अर्धी मिळकत सत्यभामेला मिळाल्यानतर पुष्कळ वर्षांत तिचे आणि विठ्ठलरावांचे मुखावलोकनहि झालें नव्हतें. वसंत तेथे आल्यावर तिनें त्याला एक दोन वेळा घरीं फराळास बोलाविलें होतें, पण त्यानें तिची गाठच घेतली नाहीं आता विठ्ठलराव आले आहेत, असे समजल्यावर मागचे सगळें विसरून जाऊन ती मुद्दाम त्याना त्यांचें कुशल विचारण्यास गेली, परंतु सत्यभामेला समोर पाहताच विठ्ठलरावाना सगळ्या गोष्टी आठवल्या आणि ते सत्यभामेवर चरफडून म्हणाले, "जा, आपल्या घरीं जा. विठ्ठलरावाचें घर म्हणजे काहीं धर्मशाळा नाहीं. तू आमच्या घराण्याचा नावलौकिक चागलाच राखलास हो! एक भावजय आणि एक पुतण्या याना पोसण्याचें सामर्थ्य आम्हाला नव्हतें असें काहीं नाहीं, पण केवळ घराण्याचें नाव बुडविण्यासाठीं तू भाडण-तटा केलास आणि वेगळी निघालीस!"

इतके दिवस सत्यभामेनें दिराचा मानमरातब सभाळला होता, पण यावेळीं तो राखणें तिला अशक्य झालें. तीहि त्वेषानें म्हणाली, "घराण्याच्या नावलौकिकाची किती चाड आपल्याला आहे, तें आतां सगळ्या जगाला कळून चुकलें आहे. भावाची सगळी मिळकत घशाखालीं ढकलून भावजयीला मोलकरीण आणि पुत-

ण्याला गडी करावयाचा सगळा बेत फसला, म्हणून माझ्यावर का हा राग ? आपल्या नशिबावर रागवावें. तरीच म्हटलें, एकाएकीं घराण्याच्या नावलौकिकाची कां आठवण झाली ? भावोजी, घराण्याचा लौकिक कशाला म्हणतात, तें तरी तुम्हाला समजतें का ? लौकिक म्हणजे काही रावबहादुरकी नव्हे ! लोकाना खरें खोटें सगळें काहीं समजतें ! ”

सत्यभामेचे हे शब्द ऐकून विठ्ठलरावाचे पहिलें अवसान बरेंच खचलें. तरी पण ते त्वेषानें म्हणाले, “ पुरे कर तुझा शहाणपणा. खेड्यातल्या लोकाच्या नादीं लागून मुलाच्या शिक्षणाची सगळी माती केलीस, आणि म्हणे मी लौकिक राखला ! तो मुलगा म्हणजे नुसता ‘ ढ ’ आहे, ‘ ढ ! ”

मुलावर केलेला आरोप सत्यभामेला मुळींच सहन झाला नाहीं. ती रागानें म्हणाली, “ असले ‘ ढ ’ पुरवले, पण आपल्या मुलाचे ते शहाणपण नको हो ! वसत एवढा शहाणा, म्हणूनच वाटते परवा रानातल्या मराठ्यातर्फून जोड्याचे बक्षीस घेऊन मुबईस पळाला ! अहाहा ! काय पण मुलाचे शहाणपण ! पशूदेखील इतके अनाचारी नसतील !”

विठ्ठलरावाना सत्यभामेचा अगदी सताप आला, पण तिला निरुत्तर कसें करावें, तें त्याना समजेना शेवटीं तिच्याशी न बोलता जमलेल्या मडळीला उद्देशून ते म्हणाले, “ पहा, आमच्या भावजयीचा हा उद्धटपणा पहा ! ”

गगाधर दीक्षित गभीरतर स्वरात म्हणाले, “ सत्यभामाबाई, काहीं झालें तरी ते तुमचे दीर आहेत तुमच्यापेक्षा वडील आहेत. त्याना असे बोलणें बरें नव्हे. स्त्रीने बालपणी पित्याच्या, तारुण्यात पतीच्या आणि वृद्धपणी पुत्रादिकाच्या सल्ल्याने वागावे असें शास्त्रवचन आहे ”

हरिशास्त्री म्हणाले, “ स्त्रीस्वातत्र्य कदापि श्रेयस्कर नाहीं सत्यभामाबाई, असल्या सत्वशील दीरापासून तुम्ही वेगळ्या झाला, हें काहीं चागले केलें नाहीं. म्हणूनच आमचे शास्त्रकार स्त्रियाना स्वातत्र्य देऊ नये, असें सागतात ”

सत्यभामेच्या रागाची कमान थोडी अधिक चढली. ती म्हणाली, “ माहीत आहेत मला तुमचीं सगळीं शास्त्रें ! चार दोन रुपये लोभी भटांच्या हातांवर ठेवले, म्हणजे या शास्त्रांचे आधार वाटेल तसे फिरतात. भावजयीने दीराच्या ताब्यात रहावें, असे शास्त्र आहे आणि भावजयीला सन्मानानें न वागविता

एकाद्या बटकीप्रमाणें चोवीस तास गुलामगिरी करावयाला लावावी, असेंहि त्या शास्त्रात लिहिलें आहे ना ? "

आपला या बाईनें मोठाच अपराध केला, असें वाटून हरिशास्त्री थोडे रागावून म्हणाले, " सत्यभामाबाई, शास्त्रवचन कसें आहे, तें तुम्हाला सागितलें. त्याप्रमाणें वागणें न वागणें हें तुमचें काम ! तुम्ही दिराला सोडून स्वतत्र राहिलां, यांत माझी अपकीर्ति न होतां तुमचीच अपकीर्ति झाली आहे. "

हें ऐकून सत्यभामा अधिकच चिडली. ती म्हणाली, " माझी अपकीर्ति करणारे मेले दारू पिऊन बडबड करणारे असतील किंवा असल्या पाप्याच्या अन्नावर पोसलेले तुमच्यासारखे भटभिक्षुक असतील ! म्हणे असे शास्त्रवचन आहे ! एवढी शास्त्रवचनावर श्रद्धा असती, तर या ओसरीवर एकहि भटभिक्षुक दिसला नसता. एकाद्या श्रीमंतानें तुमच्या हातात चार दोन रुपड्या टाकल्या, म्हणजे विष्ठेला देखील सोने म्हणणारे तुम्ही शास्त्री ! आज विठ्ठलरावानीं थोडा हात सैल केल्याबरोबर लागला त्याच्याभोवती नाचायला ! शिते खाणारीं भुतें तुम्ही ! म्हणे आम्ही शास्त्री नी पडित ! पैशाचे गुलाम मेले ! " असे बडबडत सत्यभामा तेथून निघाली आणि आपल्या घरी आली ती गेल्यावर जणू जिवावरचें दडपण गेल्यासारखें होऊन वरील सभेंतल्या मलीन झालेल्या सगळ्या मुखातून एकदम हास्यलहरी बाहेर पडल्या ! जणू काय सत्यभामा वेड्यासारखें बडबडून गेली, हेच त्या हास्यावरून ते सुचवीत होते, पण त्याच्या मुखावर जी मलीनतेची छाया पसरली होती, ती मात्र तशीच कायम होती आपण येथें अनुचित कार्यासाठीं सर्व जमलो आहों, हेच जणू ती मलीनता सुचवीत होती. विठ्ठलरावाच्या चेहऱ्यावरहि बरीच उद्विग्नता आली होती. एवढे मोठे आपण, पण भावजयीने आपला पाणउतारा केला आणि तोहि या भटभिक्षुकाच्या देखत केला, हे पाहून त्याचें मन उद्विग्न झाले. यजमानाची ही अस्थिरता ओळखून हरिशास्त्री म्हणाले, " सत्यभामेचें तोड म्हणजे जणू विजापूरची मुलूख मैदान तोफच ! "

गगाधर दीक्षित म्हणाले, " साक्षात् रणचडिका ! "

" पण रावसाहेब मात्र अगदी शात होते. शातीचे सागरच ते ! "

" अहो, हत्तीसारखें त्याचे थोर अत करण ! कुत्रीं भुकू लागली, तरी हत्ती मागें वळूनदेखील पहात नाहीं ! "

विठ्ठलरावाची ही स्तुति आणखी अशीच किती वेळ चालली असती; परंतु तितक्यांत नारायणशास्त्री येत असल्याचें समजल्यामुळें ही सगळी मंडळी बरीच व्यवस्थेनें बसली व रंगास आलेला प्रायश्चित्ताचा डाव न फसो, म्हणून प्रत्येकजण मनात ईशचिंतन करू लागला. लवकरच नारायणशास्त्र्याना बरोबर घेऊन शामभट तेथे आले. नारायणशास्त्र्याना पाहतांच विठ्ठलरावासह सगळे उठून उभे राहिले आणि त्याना प्रमुखस्थानीं बसण्यास जागा दिली. नारायणशास्त्र्यांचे तेज व रुबाब हीं पाहून सगळ्यानाच थोडी भीति वाटू लागली. खाली बसल्यावर नारायणशास्त्री विठ्ठलरावाना गोड स्वराने म्हणाले, " कसे काय, सगळी मंडळी कुशल आहेत ना ? "

विठ्ठलराव उसन्या शालीनतेनें म्हणाले, " होय. आपल्या कृपेनें सर्व कुशल आहेत वसत आपल्या आशीर्वादानें ब्यारिस्टर झाल्याचें आपणास समजलें असेलच. आपलाच मुलगा तो. त्याचें ससर्गदोषपरिमार्जन करून त्याला आपण सगळ्यांनी आपल्या घरात ध्यावे एवढीच माझी तुम्हा सर्वांना प्रार्थना आहे तो विलायतेस असताना देखील त्यानें आपले आचरण अगदीं शुद्ध ठेवलें होते, तथापि—"

नारायणशास्त्री मध्येंच म्हणाले, " होय, होय. ते सगळें मला शामभटजींनीं वाटेने येताना सागितलें. बरोबर तुलसी दिल्या असून स्वयपाकालाहि ब्राह्मण होता, असेंहि त्यानीं सांगितलें ! पण हें पहा विठ्ठलराव, तुम्ही आपणास सुशिक्षित म्हणविता, तेव्हा या बाबतींत तुम्ही चागला विचार करावयाला पाहिजे. विलायतेस असतांना परधर्मीयाशीं अन्नव्यवहारादि ससर्ग होणें अपरिहार्य आहे. केवळ तेवढयासाठी समाजानें वसताला समाजाच्या बाहेर ठेवणे अयोग्य होय. शिक्षण, व्यापार आणि राजकार्य यासाठीं प्राचीन काळापासून आमचे लोक बाह्य देशीं जात येत होते व परधर्मीयाशीं त्यांचा क्षणोक्षणीं सबंध येत होता. त्यांचे अन्नव्यवहार होत नव्हते असें काहीं नाहीं, पण तेवढयासाठीं त्यानीं प्रायश्चित्त घेतलें, असा कांहीं इतिहास नाहीं, आणि आजकाल तर देशातल्या देशातच अनेक परधर्मीयांच्या दुकानात जाऊन आमचे लोक पानाहारादि व्यवहार करतात. तेव्हां असल्या क्षुल्लक कारणासाठीं प्रायश्चित्त घेण्याचे काहीं कारण नाहीं आणि तेवढयासाठीं प्रायश्चित्तासारख्या महत् विधीची योजनाहि नाहीं. देशांतल्या देशात आम्ही जे अपराध करीत असतों, त्यापेक्षा विलायतेस ते काय अधिक करणार ?

शिवाय काहीं व्यवहारच असे आहेत कीं, त्यांना 'दोष दोष ' म्हणून त्यांचा बाऊ करण्यात काहीं अर्थ नाहीं. हल्लीं दळणवळणाचीं साधनें इतकीं वाढलीं आहेत की, ससर्गदोष टाळणेंच अशक्य झालें आहे, मग असल्या दोषाना हे प्रायश्चित्ताचें थोताड कशाला ? तेव्हां ब्राह्मण बरोबर दिला होता, तुलसी दिल्या होत्या, गगास्नान घातलें होते, वगैरे गोष्टी सागण्यात तरी काय मोठेपणा ? "

नारायणशास्त्र्याचे हे विचार पोटार्थी भिक्षुकाना अर्थातच थोडे चमत्कारिक वाटले. तुलसी–ब्राह्मण वगैरे निव्वळ थापबाजी असल्यामुळें विठ्ठलरावहि थोडे कचरले ! ते म्हणाले, " तुमचे म्हणणें सयुक्तिक आहे, पण या सर्वांनी वसताला पावन करून घेण्याचें ठरविलें आहे. आपणहि—"

नारायणशास्त्री म्हणाले, " जो पावन आहे, त्याला आणखी पावन करून कसें घ्यावयाचे ? आणि हा पावन करण्याचा उपद्याप तरी कशाला ? वसत आमच्या घरचा मुलगा ! त्यानें खुशाल घरात यावे आणि आमच्या पक्तीला बसावे ! यात पहावयाचे ते एवढेंच कीं, वसंत आमच्या घरात येण्याला उत्सुक आहे कीं नाही, तो आम्हाला ' आमचे ' म्हणण्यास कबूल आहे की नाहीं, तो आपल्या धर्माचा अभिमानी आहे कीं नाही, आणि आमची भाजीभाकर व वस्त्रपात्र त्याला रुचते कीं नाहीं ! या बाबतींत जर आम्हांला समाधान झालें, तर वसताला प्रायश्चित्त देण्याचें काय कारण ? आता जर तो ' साहेब ' झाला असेल, आपल्या बाधवाचा तिरस्कार करण्याचें व्रत जर त्याने पत्करले असेल, आपल्या धर्मासबधानें जर त्याच्या चित्तांत अनादर उत्पन्न झाला असेल आणि अभक्ष्य व अपेयपान जाणून बुजून करण्याची प्रवृत्ति जर त्याला जडली असेल, तर प्रायश्चित्त देण्यात तरी काय अर्थ ? वसत कोठे आहे ? त्याला येथे मडळीत बोलवा, म्हणजे त्याची आत्ताच परीक्षा होईल !"

नारायणशास्त्र्याचे हे विचार तर कित्येकाना नास्तिकपणाचेच वाटले ! उठल्या बसल्या प्रायश्चित्त देत सुटणाऱ्या भिक्षुकाना नारायणशास्त्र्याचा फार राग आला, पण त्याच्या विरुद्ध बोलण्याची कोणालाहि छाती होईना ! विठ्ठलरावाच्या पोटातहि मुद्यावर गोष्ट आल्यामुळें धस्स झाले ! ते म्हणाले, " तो येणार होता, पण इतक्यातच कोर्टाच्या कामाची अशी गर्दी उडाली कीं, त्याला घटकेची देखील फुरसत नाहीं ! म्हणून त्याच्यासाठीं मी—"

" पण कर्तव्यासाठीं वेळात वेळ काढला पाहिजे ! जरूर तर थोडें पैशाचेंहि नुकसान सोसलें पाहिजे ! "

" तें खरें; पण धदा नवीनच असल्यामुळें–तो–"

" त्याचा अर्थ इतकाच कीं, वसंत 'आमचा' नाहीं आणि तोहि पण आम्हांला 'आमचे' म्हणून म्हणावयाला कबूल नाहीं! एकदर हिंदु संस्कृतीविषयीं ज्याला एवढा तिरस्कार वाटतो, त्याला प्रायश्चित्त घेण्याचा अधिकारच पोहोंचत नाहीं आणि एकासाठीं दुसऱ्यानें प्रायश्चित्त घेणें हा तर निव्वळ मूर्खपणा आहे! अपराध एकानें करावयाचा आणि दड दुसऱ्याला द्यावयाचा हा न्याय कोठला ?"

विठ्ठलराव म्हणाले, " पण यानी सगळयानीं तर मला तशी परवानगी दिली आहे मग तुम्ही कां या सगळ्यांच्या विरुद्ध जाता ? "

नारायणशास्त्री म्हणाले, " छे ! छे ! मी कशाला त्यांच्या आड येऊ ? तुमच्या जर एकदर गोष्टी पूर्वीच ठरल्या आहेत, तर त्याची जशी इच्छा असेल तसें तुम्ही वागावें आणि तुमच्या इच्छेप्रमाणे त्यांनी वागावे हें परस्पराना युक्तच आहे बरें, येतों "

असें म्हणून नारायणशास्त्री उठले आणि विठ्ठलरावाच्या परवानगीची वाट न पाहताच घरीं निघून आले नारायणशास्त्री निघून गेल्यावर मनाची ग्लानी दूर करण्यासाठीं या सभेत पुन्हा एकदा हशा पिकला, परंतु शरीराचा थकवा घालविण्यासाठीं एकादा अप्रबुद्ध जसा धान्येश्वरीचा घुटका घेऊन थोड्या वेळानें अधिकच शिणतो, त्याप्रमाणें या हंसण्याने सर्वांची खिन्नता कमी न होता थोडी वाढली मात्र. आपल्या प्रत्येकाच्या खिशाचे वजन विठ्ठलरावाकडून वाढणार आहे, ही गोष्ट जर या भटभिक्षुकाच्या लक्षात नसती, तर त्यानी ही खिन्नता वाढू न देता विठ्ठलरावाची ओसरी रिकामी केली असती ! परतु नारायणशास्त्र्याच्या म्हणण्याचा जरी त्याच्या मनावर परिणाम झाला होता, तरी गोळा झालेले सगळे सज्जन रौप्यवर्तुलाचे भक्त असल्यामुळें त्यानी शास्त्रीबोवाची टर उडविण्यास आरभ केला. शामभट उगीच मोठ्यानें खो खो हसले ! जणू काय नारायणशास्त्री वेड्याप्रमाणें बडबड करून गेले ! गगाधर दीक्षित म्हणाले, " एवढा मोठा मनुष्य, पण विचार अगदींच नास्तिकपणाचे ! अहो, आतां धर्मश्रद्धा राहिली आहे कोठे ? थोडी फार विठ्ठलरावांसारख्याच्या ठिकाणीं दिसत आहे, तिलाहि अशा रीतीनें मोडा घालणें किती अप्रयोजकपणाचे आहे ! "

हरिशास्त्री म्हणाले, " दीक्षित, तुमच्यासारख्या मडळीनीच ' नारायणशास्त्री !' 'नारायणशास्त्री ! ' म्हणून त्यांचें स्तोम माजविलें, त्याचा हा परिणाम ! गृहस्थ

थोडेसें सस्कृत शिकला आहे आणि जवळ थोडा पैसा आहे, म्हणून या सगळ्या गोष्टी ! माझ्यासारख्या गरिबानें अशी भाषा वापरली असती, तर त्याला तुम्ही लागलाच अपक्त केला असता ! ''

गंगाधर दीक्षित म्हणाले, '' नाहीं तरी ते अपक्तच आहेत ! कारण परान्न ग्रहण न करण्याचा त्यांचा नियमच आहे ! तेव्हा एक प्रकारें त्याना अपक्त म्हणावयाला कांही हरकत नाहीं. ''

नारायणशास्त्र्याविषयीं यापेक्षा अधिक चर्चा झाली नाहीं. कारण जमलेल्या दहावीस भटापेक्षा नारायणशास्त्री याना त्या प्रांतांतल्या दहावीस गांवच्या विद्वान्, सज्जन व कुलीन ब्राह्मणाचा पाठिंबा होता. शिवाय त्यांच्या विद्वत्तेविषयीं व निस्पृहतेविषयी लाबलाबच्या ब्रह्मवृंदातहि प्रसिद्धि व आदर होता. या एकदर गोष्टी डोळ्याआड करण्याइतकी ही भिक्षुक मडळी अज्ञान नसल्यामुळें त्यानी नारायणशास्त्र्याचा विषय बाजूला ठेवून प्रायश्चित्ताचीच वाटाघाट केली आणि त्याप्रमाणें एक दोन दिवसांत तो विधि उरकून भटभिक्षुकानीं आपले खिसे थोडे फार गरम करून घेतले. विठ्ठलरावासारख्या सुधारक गृहस्थानें हा जो प्रायश्चित्ताचा फार्स केला, त्याबद्दल पुष्कळाना आश्चर्य वाटलें, पण आमच्या वाचकाना मात्र एवढें आश्चर्य वाटणार नाहीं असें वाटते गावांतील काही ब्राह्मणाना हाताशीं धरून त्यांना या वेळीं ज्या एका गोष्टीचें बीजारोपण करावयाचे होते, तेवढे करून त्यानीं या ब्राह्मणाचे आशीर्वाद घेतले आणि ते पुन. पुण्यास येऊन राहिले.

---

## प्रकरण नववें.



सायकाळीं सहा वाजण्याच्या सुमाराला सत्यभामा आपल्या घराच्या दरवाजात भाजी चिरीत बसलेली असून घरासमोरच्या अगणांत पाच सहा लहान मुली आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ खेळत होत्या. एक दोन अगदीं लहान मुलीहि या खेळांत उगीच लुडबूड करीत होत्या. खेळतां खेळता मध्येंच कांहीं तंटा झाला, तर या सगळ्या मुली न्याय मागण्यासाठीं सत्यभामेकडे येत होत्या. सगळ्या मुलींना कांहीं तरी सांगून सत्यभामा खुष करी आणि पुनः त्यांना खेळावयाला लावी. या मुली जरी शेजारच्या होत्या, तरी सत्यभामेच्या गोड स्वभा-

वामुळें या मुलींनीं सत्यभामेचें घर आपलें स्वतःचेंच करून टाकलें होतें. शनवार आदितवार असला म्हणजे शेजारपाजारचीं लहान लहान मुलेंदेखील येऊन या अंगणांत खेळत असत. सत्यभामा घरीं एकटीच असल्यामुळें तिला या पोरा-सोरांची मोठी करमणूक होत असे. यांपैकीं एक दोन मुलांची घरची फारच गरिबी असल्यामुळें सत्यभामा त्यांना केव्हां केव्हां जेवायला देखील घालीत असे.

पुडलिकाच्या शिक्षणाची सगळी जबाबदारी सत्यभामेनें नारायणशास्त्री आणि विनायकराव याच्यावर टाकली होती, हें वाचकाना आठवत असेलच पुंडलिकाची मॅट्रिकची परीक्षा झाल्यावर विनायकरावांनीं त्याला मुबईस कापसाचा धदा शिक-ण्यासाठीं ठेवलें कापसाचा व्यापार करणाऱ्या बऱ्याच बड्या व्यापाऱ्यांशीं विना-यकरावाची ओळख असल्यामुळें एका व्यापाऱ्यानें मोठ्या आनदानें हा धदा पुड-लिकाला शिकविण्याचें कबूल केलें होते. नोकरी न करता काहीं उद्योग धदा करावा अशी पुडलिकालाही प्रथमपासून हौस होती. शिवाय विनायकरावांनीं त्याचा शिर-काव एका नव्याच धद्यात करून दिल्यामुळें मोठ्या उत्साहानें पुडलिक तें शिक्षण संपादन करीत होता ज्या पेढीवर राहून तो हें शिक्षण सपादन करीत होता, त्या पेढीवरील मडळी फार सुस्वभावी असल्यामुळें पुडलिकाला शिक्षणाच्या बाब-तींत त्याची फार मदत झाली सुमारें दीड वर्षाच्या अवधींत पुडलिकाला या धद्याची बहुतेक माहिती झाली कापूस हातात घेतल्याबरोबर त्या कापसाची जात व त्याच्या उत्पत्तीचें स्थान हीं त्याला बरोबर ओळखतां येऊं लागलीं. तसेच त्या कापसांतले गुणदोष व त्याच्या बाजारभावांत पुढें मागें होणारा फरक हींहि त्याला चांगलीं समजू लागलीं. ज्या पेढीवर तो शिक्षणासाठी म्हणून नोकरीस होता, त्या पेढीवरच्या लोकांनाहि पुडलिकाची ही बुद्धिमत्ता पाहून फार आश्चर्य वाटलें व त्यांनीं त्याला शंभर रुपये पगारावर नोकरीस ठेवलें. एवढया प्रगती-वरच पुडलिकाचें समाधान झाले नाहीं. हाच धदा करणाऱ्या युरोपियन पेढीवर नोकरीस राहून हा धंदा ते कशा रीतीनें चालवतात, हें शिकण्याची पुंडलिकाची फार इच्छा असल्यामुळें त्यानें आपल्या पेढीच्या मार्फत एका युरोपियन पेढीवर नोकरी मिळविली. तेथेंहि त्याला शभर रुपये पगार मिळत असे या मनुष्यापासून आपल्या पेढीचा फार फायदा होत आहे, असें पाहून त्या पेढीच्या व्यवस्थापकानें नतर त्याला दीडशें रुपये पगार केला. या पेढीचे नवे व्यवस्थापक विलाय-तेहून आल्यावर त्यांचा व पुंडलिकाचा कसा खटका उडाला व त्यामुळें पुडलि-काला मुंबईहून कसें पलायन करावें लागलें, हें वाचकांना आठवत असेलच.

सत्यभामेच्या अगणांत मुली खेळत असतां येसूनें या अगणांत प्रवेश केला. अगणांत रांगेनें सात आठ पोपयाचीं झाडे लावलेलीं होतीं, त्यांकडे येसूनें आल्याबरोबर प्रथम लक्ष पुरविलें. एका मोठ्या झाडावर तीन चार पोपये पिकले होते, तिकडे येसू टक लावून पहात आहे, हें पाहून मुलीचेंहि खेळण्यावरचें लक्ष उडालें आणि त्याहि पिक-लेल्या पोपयाकडे पाहू लागल्या. येसू म्हणजे सगळ्या बालगोपाळांच्या ओळखीचा! येसू पोपयाकडे पहात आहे हें पाहून मुलीच्या मनांत मोठी आशा उत्पन्न झाली आणि त्या एकदम सगळयाजणी 'येसू, पोपया काढ' म्हणून म्हणू लागल्या. सत्यभामेचे आपणाकडे लक्ष जाईल अशा बेताने हसून येसू म्हणाला, "वा! मी पोपया काढला आणि सत्यभामाकाकूनीं मला मारलें तर? तुम्ही पोपया खाल नी पळून जाल आणि मार बसेल मला!"

एक लहान मुलगी म्हणाली, "काकू नाहीं मारायच्या! त्या तर भाजी चिरीत आहेत."

येसू साहजिक हंसला. तो म्हणाला, "भाजी चिरता चिरता त्याना जसें काहीं इकडे उठून येतांच येणार नाहीं!"

सत्यभामा हंसत हसत म्हणाली, "येसू, काढ बाबा, दोन पोपये काढ काल-पासून पोरी मागताहेत, पण काढायलाच कोणीं नव्हतें. काढ, चागले पिकलेले पाहून चार पोपये काढ. दोन चिरून मुलीना दे आणि एक नारायणकाकाकडे नी एक यमुनाबाईकडे नेऊन दे."

सत्यभामेचे हे शब्द ऐकून सगळ्या मुली आनदानें हसू लागल्या. येसूनें वेळूची लाब काठी घेऊन चागले पिकलेले चार पोपये काढले आणि ते सगळे सत्यभामाबाईंच्या पुढे ठेवून तो म्हणाला, "काहीं कापायला आणा, म्हणजे तुकडे करून मुलींना देतो"

सत्यभामेने लागलीच ताट नी विळी येसूपुढे आणून ठेविली आणि दोन पोपये त्याला दिले. येसूनें पोपयाची साल काढून त्याचे लहान लहान तुकडे केले आणि प्रथम मुलींना देऊन मग स्वत खात खात म्हणाला, "काकू, तुम्ही झाडें मोठीं निवडून लावलीं आहेत! इतके गोड पोपये क्वचितच मिळतात!"

सत्यभामा म्हणाली, "वेड्या, ही झाडे मीं का लावलीं आहेत? हीं तर तुझ्या जगन्नाथानेंच आणून लावली आहेत. आंगण नुसते रखरखीत होतें; पण जगन्नाथ आल्यापासून नुसते हिरवे गार झालें आहे. भाजीपाला, फुलझाडें, किती तरी त्यानें लावलीं आहेत. मला भाजीपाला मिळून शिवाय लोकांनाहि द्यायला सांपडतो.

शेजारपाजारचे लोक देवाना फुलेंहि तोडून नेतात. एकदरींत त्यामुळें मलाहि पुष्कळ करमणूक होते. शिवाय झाडाना पाणी वगैरे घालण्यांत माझा पुष्कळ वेळ जातो. "

येसू म्हणाला, " ते खरें, पण असले पोपये वगैरे खाण्यास पुडलिकराव नसल्यामुळें तुम्हाला काहीं गोड वाटत नसेल !"

"गोड कसें वाटेल बरे ? कांहीं नवी वस्तु दृष्टीस पडली कीं, 'माझा पुडलिक नाहीं,' असे चटकन् मनात येते, पण करणार काय ? नोकरी केली पाहिजे ना ?"

" हे नोकरीचे काम खरोखरच फार वाईट ! पुडलिकरावाना घरीं खायला प्यायला काय कमी आहे ? पण उगीच त्या नोकरीच्या मागें लागले आहेत "

" मीदेखील त्याला तेच म्हणते, पण तो ऐकतो कोठे ? "

" आणि काकू, आता म्हणे त्याच्या ऑफिसात नवा साहेब आला आहे. दादासाहेब म्हणत होते की, मोठा वाईट साहेब आहे तो ! येता जाता त्याला सलाम केला पाहिजे, आणि सलाम केला, तरी तो एकसारखा तोंडाला येईल त्या शिव्या देत असतो ! "

सत्यभामा आश्चर्याने, पण विषण्णतेनें म्हणाली, "ऑ ! इतका का तो साहेब वाईट आहे ? त्याला घटकोघटकी सलाम करावा लागतो ! छे., असा अपमान कोण सहन करील ! "

" पण नुसत्या सलामानेंच कोठे भागतें ? वर आणखी शिव्या आहेतच ! काम बरोबर केले, तरी शिव्या ! काम चुकले, तरी शिव्या ! 'साला, पाजी, हरामखोर !' असें म्हणे त्याचें तोड सारखे चाललेले असते ! "

" पोटाला नाही मिळाले, तरी पत्करले, पण असली नोकरी नको मेली भाजीभाकर खावी, पण ती मानाने खावी. अशा अपमानानें सोने मिळाले, तरी तें काय कामाचे ? "

" मी जर अशा ठिकाणी नोकरीला असतों, तर त्याला चागला हात दाखविला असता ! उगीचच्या उगीच शिव्या द्यावयाच्या म्हणजे काय ? काहीं न्याय इन्साफ आहे की नाहीं ? त्याने साला म्हटले, तर मी एक खाडकन् श्रीमुखात दिली असती ! पाजी म्हटलें, तर कमरेंत एक लाथ मरली असती ! गुलामाची अगदीं खोड मोडून टाकली असती !!"

" असा काहीं मनुष्याच्या अगी अभिमान असल्यावाचून कसें चालेल ? बाधलेल्या जनावरासारखें मुकाट्यानें राहून हे लोक कसे बाई शिव्या खात असतील

कोण जाणे! खरेंच, त्याला कोणी तरी अशी शिक्षा करावी की, पुन्हां म्हणून त्याच्या तोंडातून अभद्र शब्द निघणार नाहीं! त्याच्या ऑफिसातले लोक यासंबधानें सरकारकडे तक्रार का करीत नाहींत?"

"काकू, तक्रार करून उपयोग काय? पुन्हा त्याच्याच हाताखालीं नोकरी करावयाची ना? त्यापेक्षा असल्या नोकरीला रामराम करावा आणि—अरे! हे दादासाहेब पण इकडेच आले. या दादासाहेब. थोडा पोपया खा. फार गोड निघाला आहे!"

जगन्नाथाला पाहून सत्यभामा जरा मागें सरकून म्हणाली, "ये, बैस पोपया खा. काय, पुडलिकाचे काहीं पत्रबित्र आले की नाही? नारायणकाकांकडे तर काहीं अजून पत्र आलें नाहीं."

पोपयाचे दोन तीन तुकडे खाऊन जगन्नाथ म्हणाला, "काकू, त्याचें आजच पत्र आलें आहे. त्यानें मुबईला मोठी मौज केली!"

'मौज' हा शब्द सत्यभामेच्या कानाला मोठा चमत्कारिक वाटला व त्यामुळें तिचें काळीज थरारल्यावाचून राहिलें नाहीं ती आतुरतेनें व भयशकेने म्हणाली, "त्याने असें काय केलें बाबा?"

जणू काय आपणास काहीच माहीत नाहीं, असें दाखवून येसू म्हणाला, "पुडलिकराव म्हणजे कसला मानी गृहस्थ! त्याने बहुतकरून त्या ऑफिसातल्या साहेबाला त्या शिव्यांचें बक्षीस दिलें असेल! दादासाहेब, पुडलिकरावाचे काहीं पत्रबित्र आले आहे की काय?"

सत्यभामा या वेळी जगन्नाथाच्या तोंडाकडे टकमका पहात होती. ती म्हणाली, "जगन्नाथ, त्याचें पत्र आलें आहे? कोठे आहे ते?"

"खिशात आहे." असें म्हणून जगन्नाथानें खिशातून पत्र काढलें आणि ते उघडून तो म्हणाला, "काकू, एवढे भिण्यासारखें कांहीं नाहीं. त्याच्या साहेबानें त्याला शिव्या दिल्या, तेव्हा पुडलिकानें दोन ठोसे दिले! एवढेंच—दुसरें—"

जगन्नाथाला त्याचें वाक्यही पुरें बोलू न देता एकदम घाबरून सत्यभामा म्हणाली, "ऑ! साहेबाच्या अगावर हात टाकला कार्ट्यानें?" इतकें म्हणून सत्यभामा डोळे पुसू लागली. नतर म्हणाली, "जगन्नाथ, माझ्या पुडलि-

कार्चे आता कसें होईल ? त्याला कोठून ही कुबुद्धि सुचली कोण जाणे ! तरी मी त्याला म्हणतच होते की, पुडलीक, फार जपून रहा. आपल्या वाईटावर पुष्कळ लोक आहेत, पण शेवटी त्याने चूक केलीच ! "

सत्यभामेच्या डोळ्यातून आता अश्रुधारा वाहूं लागल्या वात्सल्याचा तो आवेग पाहून जगन्नाथाचेंही हृदय कळवळून आलें तो म्हणाला, " काकू, तुम्ही वेड्या-सारखें काय करता ? उगीच एवढया घाबरता कशाला ? हें पहा, मी त्याचे पत्रच तुम्हाला वाचून दाखवितो, म्हणजे सगळें काहीं तुमच्या लक्षात येईल. " असें म्हणून जगन्नाथाने मोठ्या खुबीने ते पत्र सत्यभामेला वाचून दाखविलें

पत्र संपताच येसू मोठ्या डौलानें म्हणाला, "अ , एवढेंच ना ? मी म्हटलें कीं काही मोठीच भानगड आहे की काय ? यात काय आहे ? मी तर म्हणतों कीं, पुडलिकरावानी अगदी वाजवी गोष्ट केली ! "

पुडलिक मुंबईस नसून कोठे तरी पळून गेला आहे, हें जेव्हा सत्यभामेला समजलें, तेव्हा त्या दु:खातहि तिला थोडा धीर आला. डोळे पुशीत पुशीत ती म्हणाली, " ते सगळे खरें, पण त्या साहेबाने आता फिर्याद केली तर ? "

जगन्नाथ म्हणाला, " काकू, त्याची तुम्हाला मुळीच काळजी नको. तो साहेब मुळीच फिर्याद करणार नाही कारण, साहेब लोक अशा बाबतीत फिर्यादीच्या भानगडीत पडत नाहीत ! शिवाय त्यानेंही शिव्या देण्याचा अपराध केलेला आहेच कीं नाही ? "

येसू म्हणाला, " आणि त्या साहेबाला फिर्याद करावयाची असती, तर त्यानें ती यापूर्वीच केली असती पुडलिकराव उगीच भीतीने पळाले तरीपण त्यानीं मुंबई सोडली, हे एक प्रकारे बरे केलें. मला वाटते ते आता चार आठ दिव-साच्या आतच येथे येतील "

सत्यभामेच्या अंत:करणातली फिर्यादीची भीति बऱ्याच अंशाने कमी झाली हें खरें, पण पुडलिक कोठें तरी पळून गेला आहे, हे जेव्हा तिच्या लक्षात आलें, तेव्हा तिचा जीव पुन्हा खालीवर होऊ लागला. ती म्हणाली, " जगन्नाथ, माझ्या पुडलिकाचा शोध आता कसा लागेल रे ? पोर कोणीकडे गेला, आणि कोणीकडे नाहीं ! "

जगन्नाथ हसून म्हणाला, " काकू, तो काय लहान आहे ? त्याला सगळें काहीं समजते. चार आठ दिवस गेला असेल कोठे तरी भटकायला. चार आठ दिवसाच्या

आंत जर तो परत आला नाहीं, तर त्याच्या शोधाला मी जाईन आणि त्याला शोधून आणीन. "

" पण तो कोठे गेला आहे, हें समजल्यावांचून तू त्याचा शोध कसा करशील ? "

जगन्नाथ म्हणाला, " तो कोठें आहे, हें जरी मला माहीत नसलें, तरी ' आपण उत्तरेकडे जात आहो ' असे त्यानें या पत्रात लिहिलें आहे, तेव्हा त्याचा शोध लावणें मोठेसे कठिण नाहीं. शिवाय या निमित्तानें मलाहि थोडा उत्तर हिंदुस्थानात प्रवास करावयाला सापडेल ! "

येसू म्हणाला, " मला बरोबर नेल्यास मला गरिबालाहि काशीयात्रा घडेल, आणि तुमचें गाठोडे साभाळावयाला माझा उपयोगही होईल !"

सत्यभामेची काळजी आता बरीच दूर झाल्यामुळे ती किंचित् हसून म्हणाली, " आता आलें माझ्या लक्षात. तो काशीला असावा आणि त्यानें तसें पत्रात लिहिलेंहि असावें ! तू मुद्दाम मला सागत नाहीस ! "

" नाही काकू. त्यानें पत्रात खरोखरच काहीं लिहिले नाहीं. मी केवळ अदमासावरून ओळखलें. आता लवकरच अलाहाबादेला प्रदर्शनाची वगैरे मोठी गर्दी होणार आहे, तेव्हा बहुतकरून तो तेथें सापडेल असा माझा अजमास आहे बरें काकू, आता मी जातों. तुम्ही पुडलिकासबधानें मुळींच काळजी करू नका. चारआठ दिवसाच्या आत मी त्याचा शोध लावतों. "

असें म्हणून जगन्नाथ घरीं गेला. त्याच्याच बरोबर दोन पोपये घेऊन येसूहि गेला. सत्यभामेची काहीशी काळजी दूर झाली हें खरे, पण पुडलिकाचा कसा शोध लागेल, या काळजीनें मात्र त्या बिचारीची स्थिति वेड्यासारखी झाली.

चार आठ दिवसाच्या ऐवजीं दहा बारा दिवस गेले, तरी पुडलिकाचा काहींच तपास लागला नाहीं, तेव्हा जगन्नाथानें अलाहाबादेला जाण्याची तयारी केली आणि बरोबर येसूला घेऊन तो मार्गस्थ झाला या वेळीं अलाहाबादेला कॉंग्रेस, प्रदर्शन व इतर अनेक परिषदा असल्यामुळें स्टेशनावर कोणत्याहि गाडीला जागा मिळण्याची मारामार झाली होती. सेकडक्लासमधून किंवा फर्स्ट क्लासमधून प्रवास करण्याची जगन्नाथाला शक्ति नव्हती असे नाहीं, पण हा केवळ पशाचा अपव्यय होय, असें त्याला वाटे आणि शिवाय आपल्या गोरगरीब बाधवासमवेत प्रवास करणें, त्याला अभिमानास्पद वाटत असल्यामुळें जगन्नाथ तिसऱ्या वर्गातूनच

प्रवास करीत होता. प्रवासांत सहजासहजीं घडणाऱ्या अनेक गोष्टींतलीं रहस्यें हुडकून काढण्यात त्याला मोठी मौज वाटत असल्यामुळें आपल्या सामान्य देशबंधू-बरोबर प्रवास करताना जगन्नाथाला खरोखर फार आनंद वाटत होता वाटेत काहीं पाहण्यासारखें आहे, असें समजल्यास तेथे उतरावे, दोन तीन दिवस तेथे रहावें आणि नतर पुढें जावे, अशा रीतीनें त्याचा हा प्रवास चालला होता राष्ट्रीय सभेचे आणि अनेक परिषदाचें त्याला विशेष महत्त्व वाटत नसून औद्योगिक प्रदर्शन पाहण्याची मात्र त्याला इच्छा होती, तसेंच परमेश्वराने जागोजाग माडून ठेवलेल्या विश्वप्रदर्शनातल्या वस्तु पाहण्याची उत्कंठा त्याला विशेष असल्या-मुळें वाटेत त्याचे सात आठ दिवस सहज मोडले जबलपुरापर्यंत त्याचा हा क्रम चालला होता जबलपुराच्या जवळपास पाहण्यासारखी स्थळें बरीच असल्यामुळें तेथे त्याचे तीन चार दिवस ती स्थळें पाहण्यात निघून गेले ऐन गर्दीत अलाहा-बादेला न जाता थोडी गर्दी कमी झाल्यावर मग तेथे जावे, असा जगन्नाथाचा विचार असल्यामुळें त्याने मुद्दामच हे दिवस अशा रीतीने घालविले. इतके दिव-सात कॉंग्रेस व सामाजिक परिषद सपून राष्ट्राचे व समाजाचे आधारस्तभ आपा-पल्या घराच्या दिशेनें मोठ्या आरामाने मार्ग आक्रमित होते

अलाहाबादेकडे जाणाऱ्या गाडीला अद्यापि बराच अवकाश असल्यामुळें स्टेश-नच्या धक्क्यावर जगन्नाथ उगाच इकडून तिकडे खेपा घालीत होता. तिसऱ्या वर्गाच्या विश्रांतिगृहात कातड्याची मोठी पेटी व अथरापाघरावयाच्या कपड्याची वळ-कटी, ही ठेवलेलीं असून या सामानाचे रक्षण येसू गडी करीत होता. नाताळची रजा सपत आली असल्यामुळे मोठमोठे ऑफिसर व अनेक चैनी गृहस्थ पहिल्या व दुसऱ्या वर्गाच्या विश्रांतिगृहात व उपहारगृहात आपापल्या श्रीमतीचे, ऐषारामाचें व सुशिक्षितपणाचे प्रदर्शन करीत बसलेले जगन्नाथाच्या दृष्टीस पडत होते. काही काहीं एतद्देशीय गृहस्थानी युरोपियन लोकाप्रमाणे मोठ्याने हसण्याचा व इग्रजीतच गप्पा मारण्याचा कित्ता उचललेला दिसत होता. हा सर्व प्रकार जगन्नाथाला विशेष अपूर्व असा जरी नव्हता, तरी कसा तरी वेळ काढावयाचा असल्यामुळें एका आरामगृहासमोर तो उभा राहिला आणि हिंदी साहेबाच्या लीला पाहू लागला. खोट्या सुधारणेच्या भ्रामक कल्पनानीं फसून जाऊन खावे, प्यावे, आणि मजा मारावी, या त्रयींतच हे गावठी साहेब मग्न झालेले पाहून जगन्नाथाचा चेहरा काहींसा उद्विग्न झाला. काहीं तरी अव्यापारेषु व्यापाराच्या गप्पा माराव्यात आणि मध्येच मोठ्यानें हसावे, यापेक्षा अधिक उपयुक्त असे येथें जगन्नाथाच्या

काहींच दृष्टीला पडलें नाहीं. आणखी चार पावलें पुढें जाताच पहिल्या वर्गाच्या उतारूचा पांथ-निवास त्याच्या नजरेस पडला. येथेहि पण सदरहूप्रमाणेच गप्पा गोष्टी चाललेल्या होत्या. यात काहीं युरोपियन असून थोडे गावठी साहेबहि होते. यांपैकीं एक गावठी साहेब जगन्नाथाच्या दृष्टीस पडताच त्याच्या मनात कुतूहल उत्पन्न होऊन तो मुद्दाम लक्षपूर्वक त्याच्याकडे व त्याच्या जवळ बसलेल्या मडळीकडे पाहू लागला. हे गृहस्थ आपले श्वशूर असावेत, असा जगन्नाथाला सशय आला व तो त्याचा सशय बराच दृढहि झाला या प्रौढ गृहस्थाजवळच एक तरूण साहेब बसले होते. त्यानाहि जगन्नाथानें ओळखिलें पुण्यास हायस्कुलात असताना वसताला त्यानें चागलें लक्षात ठेवले असल्यामुळें हे गावठी साहेब ब्यारिस्टर वसतराव आहेत, हे त्यानें तेव्हाच ताडलें मध्यें पाढऱ्या स्वच्छ प्रस्थ-राचें एक मोठे मेज असून त्यावर दोन तीन इग्रजी वर्तमानपत्रें पडलेली होतीं वेतानें विणलेल्या व त्यावर गाद्या घातलेल्या कोंचावर वरील दोघे देशी साहेब बस-लेले असून या मेजाच्या पलीकडे ठेवलेल्या तसल्याच कोचावर तीन स्त्रिया बसल्या होत्या. त्यांपैकीं दोघींचा पोषाक जरी पाश्चात्य स्त्रियांसारखा नव्हता, तरी त्या पोषाकात देशी-विदेशीचें मिश्रण झालेलें स्पष्टपणे दिसत होते गरम पातळ पश्मीनाच्या रेशमी किनारीच्या साड्या दोघींनी पारशी स्त्रियाप्रमाणे परिधान केलेल्या होत्या. दोघीचे भालप्रदेश दिसते न दिसते इतक्या बारीक कुकुमतिलकांनीं सुशोभित झाले होते दोघींच्याहि अगावर अलकार असे फारच कमी होते. गळयात एकपदरी पाश्चात्य पद्धतीचा गिनीच्या सोन्याचा एक हार असून हातांत एक दोन सोन्याच्या बांगड्या होत्या. दोघींच्याहि डाव्या हाताच्या मनगटावर सोन्याचीं नाजुक घड्याळें सोन्याच्या पट्यानी बाधलेलीं होतीं. दोघींच्या पायात उच टाचेचे पाढरे स्वच्छ बूट होते. यापैकीं एक स्त्री बरीच प्रौढ असून तिच्या चेहऱ्यांत विशेष आकर्षकता नव्हती चेहऱ्यातला हा सर्व उणेपणा तिनें पोषाकानें भरून काढला होता. तिच्या शेजारी एक तरुणी बसली होती. ही तरुणी बरीच सुस्वरूप असून तिच्या चेहऱ्यावर विलक्षण मोहकता होती. परंतु त्या प्रौढ स्त्रीच्या डोळ्यात जो दर्प होता, तो या तरुणीच्या डोळ्यात नसून उलट तिचे डोळे शालीनता व मार्दवता दर्शवीत होते तिची दृष्टि भूमिगत असून केव्हांतरी एखादवेळ ती दरवाजाकडे आपली दृष्टि फेकी आणि तितक्यात जर तिच्याकडे कोणी दृष्टि वळविली, तर ती पुन्हा चटकन् खाली पहावयास लागे. या तरुणीपासून दोन वितींच्या अतरावर त्याच कोंचावर

दुसरी एक तरुण स्त्री बसली होती. ही स्त्री काळी सावळीच होती, पण तिचा चेहरा मोठा गोड असून, चेहऱ्यावर पवित्रतेचे विलक्षण तेज चमकत होते या स्त्रीच्या पोशाकावरून तिचा पेशा नोकरीचा असावा, हे स्पष्ट दिसण्यासारखें होते. मध्येंच केव्हां तरी ती सुदर तरुणी या स्त्रीला कांहीं विचारीत होती आणि ही स्त्री त्या प्रश्नाचीं उत्तरे मोठ्या विनयाने देत होती

या सगळ्या मडळीकडे जगन्नाथ मोठ्या कुतूहलानें पहात होता हें खरें, पण जगन्नाथाकडे मात्र या मडळीपैकीं कोणाचेच लक्ष नव्हते. नानासाहेबांच्या तोंडात एक मोठा चिरूट असून ते स्वस्थ पडून चिरुटाच्या धुराची लज्जत घेत होते वसतहि चिरूट ओढता ओढता एका वर्तमानपत्रावरून दृष्टि फिरवीत होता तिघी स्त्रियाहि साधारणपणे स्वस्थच बसलेल्या होत्या. प्रथम वसताला ओळखल्यामुळेंच जगन्नाथ या सर्वांकडे थोड्या तीक्ष्ण दृष्टीनें पहात होता. त्यानें आपल्या श्वशुराला जरी एक दोन वेळाच पाहिलेलें होते, तरी विवाहाच्या भानगडीमुळे त्याचा चेहेरा त्याच्या चागलाच लक्षात राहिला होता. जगन्नाथ घरी असता लीला सासरीं दोनदा गेली होती, आणि तेवढया अवकाशात लीलेची आकृति त्याच्या चित्तावर जी उमटली होती, त्या स्मृतीवरून जगन्नाथाला लीलेच्या चेहऱ्याचीहि ओळख पटली लीला आता बरीच मोठी झाली होती. तिच्या पोषाकात तर विलक्षणच बदल झाला होता, तरी ही लीलाच आहे, हें जगन्नाथानें तेव्हाच ताडले लीलेच्या पोषाकाकडे पाहून जगन्नाथाच्या पोषाकाकडे दृष्टि वळविली म्हणजे पाहणारास साहजिक आश्चर्य वाटलें असते डोक्याला काश्मिरी लांबट टोपी, त्यावरून लोकरीच्या रुमालानें कान व गळा बाधून घेतलेला, अगात धाबळीचा लठ्ठ कोट, त्या खालीं प्रवासात मळलेलें नेसते धोतर, पायात गरम पायमोजे आणि त्यावर मळकट पिवळा बूट, अशा पोषाकात जगन्नाथाला पाहून आपली सगळी इभ्रत नव्या पद्धतीच्या पोषाकांत आहे, असें वाटणाराना जगन्नाथाची खचित् कींव आली असती. कारण, त्यांच्या दृष्टीनें दिसणाऱ्या या खेडवळ पोषाकानें जगन्नाथाचा चेहरा बेगरूळ दिसत नसून उलट असावा त्यापेक्षां अधिक सतेज व रुबाबदार दिसत होता

वसंताचा आणि नानासाहेबांचा काय ऋणानुबध आहे, हें जगन्नाथाला मुळींच माहीत नव्हतें. शिवाय नानासाहेब लीलेचा पुन्हां विवाह करण्याच्या प्रयत्नात आहेत, हेंही जगन्नाथाला समजलेलें नव्हते जगन्नाथालाच काय, पण नानासाहेबांच्या सुधारणेचें हें अद्भूत उड्डाण नानासाहेबानीं खास विश्वासाच्या अशा चार

दोन मित्रांशिवाय व वसंत वगैरे कुटुंबातल्या मंडळीशिवाय इतरांना कळू दिलें नव्हतें. या मंडळीबरोबर असलेली प्रौढ स्त्री जरी जगन्नाथाच्या ओळखीची नव्हती, तरी ती नानासाहेबांची पुनर्विवाहित स्त्री असावी, असे त्यानें अनुमानानें ताडलें. दुसरी तरुणी तिच्या पोषाकावरून, त्या दोन स्त्रियांच्या तैनातीसाठीं बरोबर घेतलेली असावी, असे जगन्नाथास वाटलें. जगन्नाथ या सगळ्या मंडळीच्या हालचाली थोड्या तीक्ष्ण दृष्टीने पहात होता, हें निराळें सांगावयास नको. विशेषत लीलेची ती शांत, सौम्य पण काहीशी खिन्न मूर्ति पाहून जगन्नाथाच्या हृदयास थोड्या फार वेदना झाल्यावाचून राहिल्या नाहींत. सगळ्यांचे चेहरे प्रफुल्ल होते, परंतु लीलेचा चेहरा मात्र त्याला तितकासा प्रसन्न दिसला नाहीं. उलट प्रसन्नतेपेक्षा विषण्णताच त्याला अधिक दिसली. लीलेचा बाप व सापत्न मातोश्री यांच्यासंबंधाने त्याच्या मनांत काहींच विचार आले नाहींत. परंतु वसंतासारख्या चारित्र्यहीन तरुणाबरोबर आपली स्त्री प्रवास करीत आहे, हा विचार जेव्हा जगन्नाथाच्या अंतःकरणात उत्पन्न झाला, तेव्हा त्याचे रक्त थोडे तापल्यावाचून राहिलें नाही. इतक्यात, आता लीलेचा व आपला संबंध काय, हा विचार मनात येऊन त्याचे तापलेलें रक्त हळू हळू थंड होऊ लागलें. हा विचार उद्भवल्यामुळें जगन्नाथाची लीलेवरची दृष्टीहि हळू हळू दूर होऊ लागली. जगन्नाथाच्या या सर्व मनोभावनांकडे इतरांचें लक्ष नव्हते, परंतु चंद्रभागेला तो सर्वच प्रकार कांहींसा हास्यास्पद वाटला. एक खेडवळ तरूण लीलाबाईसाहेबांकडे 'आ' वासून पहात आहे, हें पाहून तिला साहजिक हसू आलें. हा प्रकार लीलेच्याहि लक्षांत आणून देऊन तिला ती मौज दाखवावी, असें चंद्रभागेला वाटलें आणि ती लीलेला म्हणाली, "ताईसाहेब, ती गंमत पाहिलीत का?"

चंद्रभागेच्या तर्जनी-निर्देशानुरूप लीला आपला दृष्टिनिक्षेप करीत आहे, तोंच जगन्नाथानें आपली दृष्टि लीलेवरून काढून मंद पावलें टाकीत तो दुसरीकडे निघून गेला. तो गेला खरा, पण लीलेची अवस्था मात्र मोठी चमत्कारिक झाली. जगन्नाथाचा चेहरा तिनें तत्क्षणीं ओळखला. जगन्नाथ तिला विसरणें शक्य होतें, पण ती जगन्नाथाला विसरणें अशक्य होते. जगन्नाथाची ती सतेज व रम्य मूर्ति तिच्या चित्तावर कायमची अंकित झालेली असून अद्यापि ती अधुकहि झालेली नव्हती. उलट उष्ण अश्रूंच्या अभिषेकानें ही मूर्ति नेहमीं निर्मल राहिलेली होती. जगन्नाथाला पाहतांच आपली परिस्थिति लीला समूळ विसरली आणि ती विस्मयानें म्हणाली, "माझ्याकडे का टक लावून पहात होते ते?"

भागू हसत हसत हळूच 'हो' म्हणून म्हणाली नेहमीं मुकाट्यानें असणाऱ्या लीलेच्या मुखांतून वरील शब्द निघताच सगळ्यानी आपली दृष्टि दरवाजाबाहेर फेकली, पण या वेळीं जगन्नाथ पाठमोरा झाल्यामुळें तो कोण आहे, हें कोणाच्याच लक्षांत आलें नाहीं लीला मात्र पूर्वीपेक्षाहि अधिक खिन्न झाली. याच वेळीं नानासाहेबानीं खिशातून घड्याळ काढलें आणि किती वाजले, तें पाहून ते म्हणाले, "अजून गाडीला वीस मिनिटे अवकाश आहे"

वसत म्हणाला, "गाडी वीस मिनिटानी येईल, पण ती येथें अर्धा तास उभी राहील म्हणजे अजून पाऊण तास आपणाला येथें काढावा लागेल"

याप्रमाणें त्या दोघाचे बोलणें होत आहे, तोंच तेथें तांबड्या हिरव्या निशाणाची वळकटी काखोटीला मारून लाल डोळे केलेली गार्डसाहेबाची स्वारी आली. एक मालगाडी पलीकडच्या रस्त्यावर नुकतीच येऊन उभी राहिली होती व त्या गाडीचे हे रात्रभर जागरण केलेले गार्डसाहेब शेजारच्या उपहारगृहात खाद्यपेयावर यथेच्छ ताव मारून टाईम्स वर्तमानपत्राचा शोध करण्यासाठी या खोलींत शिरले होते. हा गार्ड युरेजियन होता, पण तो आपणास युरोपियन म्हणवीत असे व त्याच अभिमानानें तो सगळ्याशी वागत असे वास्तविक तो टाइम्स पाहण्यासाठी आला होता, पण आत येताच लीलेसारखी सुदर स्त्री दृष्टीस पडल्यावर इकडे तिकडे न वमता लीला व चद्रभागा याच्यामध्यें जी थोडीशी जागा होती, तेथेच बसून तो वर्तमानपत्र वाचू लागला तो त्या कोचावर बसताच लीला तेथून चट्कन् उठली आणि मेजाजवळ जाऊन उभी राहिली गार्डचे हें कृत्य नानासाहेब व वसत या दोघानाहि अनुचित वाटलें, पण गार्डाला त्यासबधानें काय बोलावे, हेंच त्याना सुचेना. आमच्या वसताला तर हा प्रसग थोडा फायद्याचाच वाटला! नानासाहेबाच्या बाजूला सरकून तो लीलेला आपल्या शेजारी येऊन बसण्याविषयीं सुचवू लागला. परंतु त्याच्या शेजारीं बसण्याइतकी लीलेच्या मनाची तयारी झालेली नसल्यामुळें ती तशीच उभी राहिली थोडे मद्यपान केल्यामुळें गार्डची स्वारी बरीच रंगांत होती लीलेला उद्देशून तो इग्रजींत म्हणाला, "बाईसाहेब, तुम्हीं तुमच्या जागेवर येऊन बसा. तुम्हीं माझ्या शेजारीं बसल्यामुळें मला अडचण होईल असें मुळींसुद्धा मनात आणू नका!"

हे शब्द ऐकून लीलेचा चेहरा गोरामोरा झाला आणि ती दीनवाणीनें बापाच्या तोंडाकडे पाहूं लागली; पण नानासाहेब अद्यापिहि शात दिसत होते आपण एवढे

सुधारक म्हणवितों आणि एका गोऱ्या मनुष्याजवळ बसण्यास लीलेनें असें भ्यावें, याचें कदाचित् त्याना वाईटहि वाटलें असावे! वसंताचा चेहरा मात्र रागानें किंचित् लाल झाल्यासारखा दिसला तो त्या गार्डला रागानें म्हणाला, "महाराज, एका सभ्य स्त्रीशीं आपण बोलत आहा, हे लक्षांत ठेवा! नाही तर सभ्यपणानें कसे वागावें, हें मला तुम्हाला शिकवावे लागेल!"

गार्डसाहेबाची स्वारी वसताच्या ह्या भाषणाने जास्तच चिडली. तो म्हणाला, "या सभ्य स्त्रीशीं कसें बोलावयाचे, ते तुमच्यापेक्षा मला अधिक समजते!" असे म्हणून गार्डने आपली दृष्टि लीलेकडे वळविली आणि तिला तो हसत हसत म्हणाला, "का बाईसाहेब, मी म्हणतो हे खरे आहे ना? या, तुम्ही अशा माझ्याजवळ बसा!

गार्डाचे हे शब्द ऐकून लीलेला मरणप्राय दु ख झाले! खोलीच्या बाहेर पडून तिसऱ्या वर्गाच्या उतारूत जावे म्हणजे ही विटबना टळेल, असे तिला वाटू लागले. इकडे नानासाहेब आणि वसत हे दोघेहि आपणाकडून सभ्यतेचा अतिक्रम होऊं नये म्हणून जपत होते, पण वसताला आता बराच राग आला. तो म्हणाला, "महाराज, तुम्ही उठून या खोलीच्या बाहेर जाण्याचे श्रम घ्याल, तर फार उपकार होतील! सभ्य लोकात तुम्हाला बसू देणे योग्य नाहीं."

गार्ड मोठ्याने हसून म्हणाला, "गाडी येईपर्यंत विश्रांति घ्यावी, म्हणून तुम्ही येथे थाबलेले दिसता आणि मीही त्यात व्यत्यय आणू इच्छित नाहीं. पण त्याच वेळीं मी हेंही सागू इच्छितो की येथून मात्र मी बिलकुल हलणार नाहीं!

वसत रागानें लाल झाला! तो मोठ्यानें म्हणाला, "महाराज, काय म्हणता तुम्हीं तेथून हलणार नाहीं? पहातो कसे जात नाही ते? आत्ताच स्टेशनमास्तरा-कडे याबद्दल मी तक्रार करतो!"

वसताचे हे शब्द ऐकून गार्ड मोठ्यानें हसला. तो म्हणाला, "तुझ्यासारख्या काळ्या आदमीच्या धमकावणीला किती किंमत द्यावी, हे मला चागलें समजतें!"

ब्यारिस्टर वसतराव आता खरोखरच चिडले, पण ते भयानें, लज्जेनें कीं रागानें तें त्याचे त्यानाच माहीत! वसत रागावून कपयुक्त स्वराने म्हणाला, "तुला पुन्हा बजावून सागतों, आपल्या जिभेला लगाम घाल आणि येथून बाहेर निघून जा. आम्ही पहिल्या वर्गाचे उतारू आहों, हें तूं ध्यानात ठेव!"

गार्ड आपल्या जाग्यावरून उठून वसतापुढें जाऊन उभा राहिला आणि विद्रूप स्वरानें म्हणाला, "कोणाला तू मघापासून सभाळून बोलण्याविषयी बजावीत आहेस ? मी युरोपियन आहे आणि तू नेटिव्ह आहेस! तू माझा इतका वेळ काय म्हणून अपमान केलास ?" असें म्हणून त्या गार्डानें एक लहानसा ठोसा वसत-रावाच्या बरगडीत ठेवून दिला. नतर तो म्हणाला, "नामर्द पुरुषा, आता कसें वाटते ? आणखी एक पाहिजे ?"

वसत रागाने म्हणाला, "काही हरकत नाहीं. याबद्दल तुला कोर्टांत जबाब देणें भाग पाडीन"

मोठ्यानें हसून गार्ड म्हणाला, "कोर्ट बिर्ट तुझ्यासारख्यासाठीं आहे, माझ्यासाठीं नाही !" असें म्हणून तो गार्ड आपल्या जागेवर बसला व लीलेचा हात धरून तिला जवळ बसविण्याकरिता ओढू लागला. साहेबाने हस्तस्पर्श करताच लीला भयाकुल झाली करुण दृष्टीनें बापाकडे पाहून तिने दीन स्वरानें 'बाबा' म्हणून हाक मारली; परतु नानासाहेब म्हणजे पक्के शातीचे सागर ! ते बसल्या जागेवरून हललेदेखील नाहीत. शिवाय या वेळी हलण्याच्या स्थितीतही ते नव्हते, असे म्हटलें तरीही चालेल काय करावे आणि काय नाही, हच त्याना सुचेनासे झाले. आपल्या भावी पत्नीचा हात साहेबाने धरलेला पाहून वसताला खरोखरच फार राग आला, पण साहेबाच्या हातातून लीलेला सोडविण्याचे धैर्य त्याला होईना. बसल्या जागेवरच हातपाय आपटून तो रागाने म्हणाला, "सोड त्या बाईना, नाही तर याचा परिणाम फार वाईट होईल ! विचार कर ! नाही तर मला पोलीसला बोलवावे लागेल ! !"

वसताच्या या धमकावणीस साहेबानें मुळीच दाद दिली नाहीं. हे दोन पुरुष कोणत्या योग्यतेचे आहेत, याची त्याला नुकतीच ओळख पटल्यामुळें तो वसताच्या धमकीला नुसता हसला मात्र लीलेला आपल्याजवळ बसविण्यासाठीं त्यानें तिचा हात पुन्हां ओढला. त्याबरोबर लीलेने मोठ्यानें किंकाळी फोडली ! पण नानासाहेब आणि त्यांचे भावी जामात तसेच स्वस्थ बसले ! युरोपियनाच्या अगाला कसा हात लावावा, याचीच त्याना भीति वाटू लागली ! बिचाऱ्या अशिक्षित चद्रभागेला मात्र आता राहवेना. हे पुरुषासारखे पुरुष काय करतात, हेंच ती इतका वेळ पहात होती; पण दोघेहि जागच्या जागीं सतापण्यावाचून दुसरे काहीं करीत नाहींत, असें पाहून चंद्रभागेनें अगावरची शाल कोंचावर ठेवून दिली आणि रागानें

फणफणून ती म्हणाली, "मेल्या, सोड ताईसाहेबांचा हात! मेला पशु आहे पशु! आईबहिणीची तरी याला ओळख आहे कीं नाहीं, कोण जाणे!"

लीलेची किंकाळी, चद्रभागेचे हे रागाचे शब्द आणि साहेबाचें हसणें यामुळें या विश्रांतिगृहाच्या दाराशीं पाचपचवीस लोक गोळा झाले होते आणि ते हा तमाशा निःशंकपणे पहात होते! काहीं थोड्या लोकाच्या मनात या प्रकारानें सताप उत्पन्न झाला नाही, असे नहीं, परंतु सतापाबरोबर आत जाऊन लीलेला त्या पशूच्या हातून सोडविण्याचे धैर्य मात्र कोणासच झालें नाही! जगन्नाथ याच वेळी स्टेशनच्या धक्क्याच्या दुसऱ्या टोंकाला जाऊन परतला होता. लीलेची मूर्ति त्याच्या दृष्टीस पडल्यामुळें त्याचा चेहरा साहजिक चिंताक्रांत झाला होता आणि तो हळू हळू पावलें टाकीत होता इतक्यात त्याची नजर दरवाजासमोर गोळा झालेल्या लोकावर गेली ज्या खोलीत लीला बसली आहे, त्याच खोलीच्या दाराशी गर्दी जमली आहे, हे पाहून तोहि थोड्या घाईने तेथे आला. येऊन पाहतो तो अगदीच निराळा प्रकार त्याच्या दृष्टीस पडला! एका हातात लीलेचा हात असून दुसऱ्या हाताने चद्रभागेचा हात धरण्याचा प्रयत्न करीत असता तो साहेब म्हणाला, "वा! ही तरुणी काळी आहे, पण मोटी पराक्रमी आहे. ये, ये, तूंही माझ्याजवळ बैस!"

साहेबाच्या तोंडातून हे शब्द बाहेर पडले असतील नसतील, तोच त्याच्या कमरेत एक सणसणीत बुटाची लाथ बसली आणि त्यामुळे तो साहेब कोलमडून खाली पडला! लगेच वज्रगभीर स्वरानें उच्चारलेले, "बदमाष! परक्या स्त्रीच्या अगावर हात टाकायला शरम नाहीं वाटत?" हे शब्द त्या खोलींत दुमदुमले!

साहेबाच्या कमरेंत एकदम लाथ बसल्यामुळें लीलेचा हात त्याच्या हातातून सुटला आणि त्यामुळें तिचा झोक जाऊन तीहि पडण्याच्या बेतात आली परतु चंद्रभागेनें तिला तितक्यात सांवरून धरलें व लीलेची भीति दूर व्हावी म्हणून ती म्हणाली, "ताईसाहेब, भिऊ नका ते पहा मघाचेच गृहस्थ! त्यांनींच आपल्याला त्या पशूच्या हातून सोडविलें!!"

चद्रभागेनें असे म्हटल्यावर पूर्ण कृतज्ञतेनें पण सकरुण दृष्टीनें तिनें जगन्नाथाकडे पाहिलें जगन्नाथानेंहि लीलेकडे सहृदयतेनें पाहिलें. चार चक्षूचें याप्रमाणें सम्मीलन होताच लीलेची दृष्टी अवनत झाली! या गृहस्थाचे आभार मानावेत या उद्देशानें वसंताने जगन्नाथाकडे पाहिलें मात्र; तों तो विस्मयानें व लज्जेनें अधोवदन झाला व मोठ्या कष्टानें तो म्हणाला, "कोण! जगन्नाथ!!"

" होय, जगन्नाथ ! खेड्यांतल्या असभ्य लोकांत वावरणारा असभ्य जगन्नाथ तो हाच ! सकटांत स्त्रियांचें संरक्षण करण्याचें सामर्थ्य अगीं नसता त्याना बरोबर हिंडविण्याची हौस, म्हणजे केवळ मूर्खपणा होय ! असेच नाहीं का वसंतराव ? "

वसंत निरुत्तर झाला. हा सर्व प्रकार फारच अल्पावधींत घडला. एवढया अवधीत भूमिशय्येवर शय्यागत झालेला साहेब ताडकन् उठला आणि तो जगन्नाथाच्या अगावर धावून गेला तेव्हां जगन्नाथानें त्याला अलग उचलून लाब झुगारून दिला ! साहेबाला हा अपमान असह्य झाला तो मोठ्यानें " पोलिस, पोलिस " म्हणून ओरडला. त्याच्या ओरडण्याच्या आधीच पोलिस व दोन युरोपियन तिकिट कलेक्टर कसली गर्दी आहे, म्हणून पाहण्यास धावले होते साहेबाला उचलून फेंकलेला पाहताच ते चौघेहि जगन्नाथाच्या अगावर धावले, तेव्हा जगन्नाथानें त्या सर्वांबरोबर एकाच वेळी मारामारीस सुरवात केली. सप्त-रथी वेष्टित अभिमन्यूप्रमाणें जगन्नाथानेहि त्या सगळयाना आपल्या शरीरापासून दूर ठेविलें होतें हा चमत्कार पाहण्यास अर्थातच लोकाची गर्दी लोटली इतक्यात या गर्दीतून मोठ्या आश्चर्यानें ' ऑ ! हा तर जगन्नाथ !! ' असे शब्द कोणी उच्चारले, आणि त्याच क्षणीं जगन्नाथाच्या मदतीला एक तरूण धावला. एक निमिषार्ध या तरुणावर आपली दृष्टि फेंकून आनदोत्साहानें जगन्नाथ म्हणाला, " कोण ? पुडलीक ! स्वस्थ रहा. मी एकटा या चौघाना पुरे आहें ! "

पण पुडलिकाच्यानें स्वस्थ रहावेना. या चार पांच इसमाच्या मदतीला स्टेशनवरील दुसरे लोक येण्याच्या पूर्वीच येथून मार्ग काढला पाहिजे असें पुडलिकाने जगन्नाथाला सुचवून पुडलिक या गर्दीत शिरला आणि दोघा तिघाना त्यानें चीत करून खालीं लोळविलें. जगन्नाथानेंहि याच उपायाचें अवलबन केलें आणि ते दोघेहि त्या गर्दीतून निसटून वाट फुटेल तिकडे पळून गेले ! स्टेशनवरील कांहीं लोक त्याना पकडण्यासाठीं धावले, परंतु तिसऱ्या वर्गाच्या बहुतेक उतारूनीं या पाठीमागून पळणाऱ्या लोकांच्या मार्गात काहीतरी अडथळे आणल्यामुळें दोघेहि लांब पळून गेले !

पलीकडच्या प्लॅटफॉर्मवर लोकाची विलक्षण गर्दी असून कांहीं आरडाओरडहि होत आहे, हें पाहून स्टेशनमास्तरसाहेब आपल्या खोलींतून बाहेर पडले आणि या प्लॅटफॉर्मवर आले. निरनिराळ्या लोकाच्या तोंडून निरनिराळी हकीकत ऐकत ऐकत वसंत वगैरे मडळी होती त्या खोलींत स्टेशनमास्तर शिरले.

मास्तरला पाहतांच वसंताची लोल जिव्हा नृत्य करू लागली आणि गार्डानें लीलेला कसा त्रास दिला, ती हकीकत त्यानें मास्तरला बरेंच तिखटमीठ लावून सांगितली. तक्रार पहिल्या वर्गाच्या उतारूची असल्यामुळें मास्तराने एका कागदाच्या कपट्यावर कांही गोष्टी टिपून घेतल्या आणि आपण कंपनीच्या म्यानेजरकडून याचा बंदोबस्त करवितों असे सांगितलें. स्टेशनमास्तर खोलीच्या बाहेर पडतांच खोलीच्या दाराशीं गम्मत पाहण्यासाठीं गोळा झालेले लोकहि एकंदर प्रकाराविषयीं आपापसात बोलत बोलत तेथून दुसरीकडे निघून गेले.

खोलींतील आपली मंडळी आता बरीच शांत झाली होती हें खरें, परंतु सगळेच स्तब्ध असून घडलेल्या प्रकारामुळें सगळ्यांचेच चेहरे विषण्ण झाले होते! आलेली ग्लानी दूर करण्याच्या उद्देशाने वसंत तेथून उठला, आणि उपहारगृहाच्या व्यवस्थापकाला भेटून परत आला लागलीच त्याच्या पाठोमाग एक खानसामा आला आणि त्यानें लीला व चंद्रभागा या दोघींपुढें चहाचे पेले ठेवून सोडा व्हिस्कीचे तीन उंच पेले बाकीच्या तिघापुढें ठेवले त्या तिघानीं आपापले पेले मानसिक क्लेश दूर व्हावेत म्हणून उचलले, पण चंद्रभागा व लीला यानीं चहाच्या पेल्याना स्पर्शहि केला नाहीं! लीलेच्या शरीरास सुटलेला कंप अद्यापिही कायम असून तिचे हृदयहि धाड् धाड् उडत होते. जगात तोंड दाखवू नये इतकी तिच्या मुखावर म्लानता आली असून तिच्या अंतःकरणासहि विलक्षण वेदना होत होत्या. ती हळूच चंद्रभागेला म्हणाली, " भागू, मला पाणी पाहिजे. "

लीला अजूनहि देहभानावर नाहीं, असें चंद्रभागेनें ओळखलें. येथून कोठे तरी बाजूला गेल्यास ताईसाहेबांना जरा बरें वाटेल, असे जाणून भागू म्हणाली, "चला, आपण स्नानगृहात जाऊ या. "

विश्रांतिगृहाच्या एका बाजूला सुंदर स्नानगृह होते. दोघीहि त्यात गेल्या. आत जाताच लीलेनें दार लोटून घेतलें आणि चंद्रभागेला मिठी मारून स्फुंदण्यास आरंभ केला. हृदयात सांचलेली वेदना अशा रीतीनें अश्रूंच्या रूपानें बरीच बाहेर पडल्यावर लीलेला थोडें बरें वाटलें. चंद्रभागेनेंहि तिला दोन धीराच्या गोष्टी सांगितल्यानंतर हात, पाय, तोंड धुवून त्या दोघी बाहेर आल्या. गार पाण्यानें हात पाय धुतल्यामुळें लीलेचें तापलेलें शरीर बरेंच थंड झालें आणि त्यामुळें तिला बरेंहि वाटलें. इकडे त्या तिघाचें सोडाव्हिस्कीचें पान चाललेंच होते. पेय पीत असतां वसंत उत्तेजक स्वरानें म्हणाला, " हा मनुष्य युरोपियन

असून इतका असभ्य असावा याचेंच मला मोठे नवल वाटतें ! सभ्य स्त्रीशीं अशा रीतीचे वर्तन करणारा पाश्चात्य गृहस्थ मी आजच पाहिला ! छे ! अगदींच पशु ! ”

नानासाहेब खिन्न स्वरानें म्हणाले, “ छे वसत ! केव्हाहि न विसरण्यासारखा आज आपल्या सगळ्याचा अपमान झाला ! ”

आतापर्यंत जवळ जवळ अर्धा पेला वसतानें पोटात ढकलला असल्यामुळे त्याच्या स्वरात रागाचें बरेंच मिश्रण झाले होते बुटाचा पाय आपटून तो म्हणाला, “ मी त्याला एक लाथ मारून दूर फेकणार होतो, पण त्याच्यासारख्या असभ्य माणसाशीं मारामारी कशी करावी याचाच मला विचार पडला ! दुसरे लीलेसमक्ष मारामारी करणेंहि मला श्रेयस्कर वाटलें नाहीं ! स्टेशनमास्तर मात्र फार सभ्य गृहस्थ ! त्या गार्डाला तो काही तरी शिक्षा केल्यावाचून राहणार नाहीं !” असें म्हणून वसंतानें मोठ्या प्रौढीनें नानासाहेबाकडे पाहिले, परतु त्याच्या चेहऱ्यावरची खिन्नता दूर झाल्यासारखी त्याला दिसली नाहीं. वसत पुन्हा म्हणाला, “ आता मुबईला गेल्याबरोबर टाइम्स पत्रात ही सगळी हकीकत प्रसिद्ध करतों आणि त्यासबधानें दोन तीन सणसणीत लेख लिहितों हे रेल्वेचे नोकर सभ्य स्त्रीशीं कशा रीतीनें वागतात, ते सगळया जगाला कळावयाला पाहिजे ! ”

एक दीर्घ श्वास सोडून नानासाहेब म्हणाले, “ हाच तो जगन्नाथ कीं काय ? कीं ज्याच्याबरोबर लीलेचा विवाह—”

वसत म्हणाला, “ होय, हाच तो मूर्ख ! बेट्याने एकदम आंत घुसून मारामारीलाच आरभ केला ! कांहीं झाले, तरी गोरे लोक म्हणजे पाश्चात्य सस्कृतीनें विभूषित ! त्याच्या अगावर हात टाकण्याचा प्रयत्न त्या असभ्य खेडवळाशिवाय दुसरा कोणीहि करणार नाहीं ! ”

लीला इतका वेळ स्तब्ध होती. इतका वेळच कां ती वसतबरोबर केव्हांच बोलत नसे. बापाशीं देखील ती फारच भीत भीत भाषण करीत असे, परतु वसंताचे हे शब्द ऐकून तिचा सुप्त राग एकदम जागृत झाला. ती म्हणाली, “ स्त्रियाची अब्रू राखण्याचें सामर्थ्य ज्याच्या अगीं नाहीं, त्यांच्याशिवाय इतराच्या तोंडातून असले शब्द कधींच निघणार नाहींत ! कृतज्ञता मानण्याऐवजीं त्याची निंदा करणें हा महाकृतघ्नपणा होय ! ते असभ्य असतील, खेडवळ

असतील, पण स्त्रीचें सरक्षण करण्याचें पौरुष त्यांच्या अंगीं आहे! केवळ वल्गना करणारे नामर्द नाहींत!!"

वसत विद्रूप स्वरानें म्हणाला, "विजयी वीराचा सन्मान पचारती घेऊन वीरपत्नी करणार होती, असें वाटते!"

"पतीचे वीरत्व पाहून कोणत्या स्त्रीचे हात पचारतीचें ताट उचलण्यासाठीं आतुर होणार नाहीत? उलट पतीचा भ्याडपणा पाहून मात्र तिला मरणप्राय दुःख होईल!"

लीलेचे हे शब्द ऐकून वसत मनात फारच खोंचला. तो म्हणाला, "लीला, याला वीरत्व म्हणत नाहीत, याला साहस म्हणतात! असल्या साहसाचे बक्षीस म्हणजे तुरुगाची शिक्षा!"

लीला चटकन् म्हणाली, "पण असल्या पतीची स्त्री त्या तुरुगाला वैकुंठा-प्रमाणें पूज्य मानील! त्यात ती अपमान न मानता अधिक सन्मान मानील! स्त्रीचे सतित्व सरक्षण करण्यात ज्या पुरुषाना तुरुगाची भीति वाटते, त्यानी 'पुरुष' म्हणवून घेण्यात अर्थ तरी काय?"

नानासाहेब लीलेवर डोळे रोखून म्हणाले, "लीले, त्या असभ्य खेडवळाचे गुणकीर्तन आता पुरे लक्षात ठेव, त्याचा व तुझा कोणताहि सबध नाही लग्न म्हणून तुझ्या अज्ञानावस्थेत जो एक तमाशा झाला आहे, त्यानं फसून जाण्याइतकी तू आता अशिक्षित नाहोस व अज्ञानहि नाहींस."

लीला यावर काहीच बोलली नाहीं. यापुढे बोलण्यात काहीं अर्थ नाहीं, असें जाणून ती स्तब्ध राहिली. आणखी थोडा वेळ गेल्यावर मुबईकडे जाणारी गाडी आली आणि तीत ही सर्व मडळी बसून मुबईस रवाना झाली. वाटेने वसत व नानासाहेब याच्या काही तरी कानगोष्टी झाल्या व त्या जगन्नाथासबधानेंच असल्या पाहिजेत, असें वाटून लीलेचा सगळा प्रवास चिंतातुरावस्थेत गेला.

---

# प्रकरण दहावे.



तिसऱ्या वर्गाच्या विश्रांतिगृहात आपल्या धन्याचें सामान सांभाळण्यासाठीं येसू गडी बसून राहिला होता. स्टेशनच्या धक्क्यावर जेव्हा दगल सुरू झाली, तेव्हा ती पाहण्याची येसूला फार इच्छा झाली, पण जबलपुरासारख्या स्टेशनावर सामानासुमानापासून दूर जाणें धोक्याचें आहे, हे त्याला माहीत असल्यामुळें सगळें सामान घेऊन तो लोखडी गजाच्या जाळीजवळ आला व तेथून काहीं दिसतें की काय, ते पाहूं लागला, परतु दगा बराच दूर असल्यामुळें त्याला अर्थातच काहीं दिसले नाही व आरडाओरडीवरूनहि त्याला या मारामारीचे स्वरूप ओळखता आलें नाहीं इतक्यात 'पकडो, पकडो' असे शब्द त्याच्या कानीं आले व त्याबरोबर धक्क्यावरून दोन तरुण वायुवेगाने पळालेले त्याने पाहिले. त्या तरुणाना पाहताच 'अरे, हे तर दादासाहेब ! असें ओरडण्याच्या बेतात येसू आला होता, पण तितक्यात पुडलिक त्याच्या दृष्टीस पडल्यामुळें त्याने आपली जीभ चावली आणि तो तसाच गप्प राहिला. या सगळ्या प्रकारासबधाने येसूची समजूत अगदीच निराळी झाली. पुडलिकाला येथे पोलिसानी पकडून आपल्या ताब्यात ठेवले असावें आणि दादासाहेबानी त्या स्थितीत त्याला पाहिल्यावर पोलिसाबरोबर मारामारी करून पुडलिकाला सोडवून दोघानीहि पलायन केले असावें, अशी जेव्हा येसूची समजूत झाली, तेव्हा प्रथम त्यानें मनातल्या मनात दादासाहेबाना शाबासकी दिली, पण मागाहून दादासाहेबानीं हें बरें केले नाही, असेहि त्याच्या मनात आले पोलिसचे लोक पळालेल्या कैद्याला आज ना उद्या केव्हा तरी पकडतील, पण कैद्याला पळण्यास मदत केली म्हणून ते आता दादासाहेबानाहि पकडतील, असे येसूला वाटून त्याला फार काळजी वाटू लागली. ते दोघे ज्या दिशेने पळत गेले, तिकडे येसूने सारखे डोळे लावले होते. थोड्या वेळाने ते दोघेहि दिसेनासे झाले ते दिसेनासे झाल्यावर त्या दिशेला वळविलेले डोळे येसूने जवळपासच्या इतर प्रवाशावर वळविले आणि त्यातल्या एकदोघाना मघा धक्क्यावर काय झालें म्हणून त्याने विचारले. प्रत्येक प्रवासी आपापल्या समजुतीप्रमाणे काहीं तरी सांगत होता आणि त्यामुळे येसूची काळजी कमी न होता अधिकच वाढत होती. शेवटीं येसूने डोक्यावर सामान घेतले आणि ज्या दिशेनें पुडलिक व जगन्नाथ पळून गेले होते, त्या दिशेने तो जाऊ लागला.

वेळ साधारणपणें नऊ दहा वाजण्याची झाली असून ऊनहि चागलें पडलें होते; परंतु थडीचा जोर अजूनहि तसाच होता. बिचारा म्हातारा त्या थडींत तसाच कुडकुडत चालला होता. सुमारें दोन मैल गेल्यावर एका लहानशा ओढयाच्या कांठीं एका झाडाखालीं दोन व्यक्ती त्याला दिसल्या! जवळ गेल्यावर ते जगन्नाथ व पुडलीकच आहेत हें पाहून येसूला फार आनद झाला. उलट येसूनें आपला शोध लावला हें पाहून त्या दोघानाहि मोठा आनद झाला या गर्दीत पुंडलिकाचे सामान मात्र स्टेशनावर राहिलें! ते विशेष किंमतीचे होते असें नाहीं, परंतु थडीच्या दिवसात उपयोगी पडण्यासारखें होते. पुन्हा स्टेशनावर गेल्यास ते सापडेल कीं नाहीं, याची शकाच होती, शिवाय स्टेशनावर जाणेहि आतां धोक्याचे होते. पैसाअडका मात्र पुडलिकाच्या खिशातच असल्यामुळे नवीन कपडे घेण्यास अडचण नव्हती. असो. ते कसेही सुटले यातच त्यानी समाधान मानलें

मारामारीच्या प्रसगातून यशस्वीपणें निभावल्यामुळे आणि पुडलिकाची अकस्मात् गांठ पडल्यामुळें दोघाचे चेहरे प्रफुल्ल झाले होते, असें म्हणावयाला काहीं हरकत नाहीं, परंतु जगन्नाथाच्या चेहऱ्यावर मात्र या वेळींहि विषण्णता दिसत होती. स्टेशनावर लीलेची झालेली मुलाखत, तिच्यावर आलेला प्रसंग आणि त्या प्रसगांतून लीलेची सुटका केल्यावर लीलेचें ते कृतज्ञतेने पाहाणें, यामुळें इतके दिवस लीलेविषयीं जगन्नाथ जो उदासीन होता, ती उदासीनता नाहीशी होऊन त्याच्या मनांत लीलेविषयीं अनेक विचार येऊ लागले! आपल्या स्त्रीची अशी अप्रतिष्ठा व्हावी, हें त्याच्या चित्ताला अर्थातच सहन झालें नाहीं. तिनें आपल्या आईबापांबरोबर का होईना, पण असे स्वैरपणें हिंडावें, याबद्दलही जगन्नाथाला फार खेद वाटूं लागला.

पुडलिक या मारामारींत सामील झाला होता व तींत त्यानें यशहि सपादन केलें होतें, परतु या मारामारीचे उगमस्थान कोठें आहे, हे त्याला अद्यापि समजलें नव्हते. जगन्नाथाच्या अगावर चार पांच इसम चालून आले आहेत, हें पाहून तो त्या मारामारींत सामील झाला होता, परंतु मारामारीचे कारण त्याला उमगलें नव्हते. हें कारण रस्त्यात जगन्नाथाला त्यानें विचारलेंदेखील; पण जगन्नाथानें उत्तर देण्याची टाळाटाळच केली. जगन्नाथाचा चेहरा हळू हळू खिन्न होत चालला आहे, हे पाहून पुडलिकानें पुन्हा तोच प्रश्न केला. पुडलिकाचा आणि जगन्नाथाचा अकृत्रिम स्नेह असल्यामुळें पुंडलिकाजवळ ती हकीकत सागण्यास कांहीं हरकत नव्हती; परंतु घडलेल्या एकंदर प्रकारानें जगन्नाथाचें

मन अत्यत उद्विग्न झालें असल्यामुळें तो कांहींच बोलला नाहीं. शेवटीं ही हकीकत पुडलिकाला न सांगितल्यास त्याच्या मनाला वाईट वाटेल आणि अत क-रणातलें दु ख ओकल्याशिवाय स्वतःसहि बरें वाटणार नाही, असा विचार करून जगन्नाथानें सगळी हकीकत पुडलिकाला सांगितली. इतका वेळ जगन्नाथ ही हकीकत का सागत नव्हता, हें जेव्हा पुडलिकाच्या लक्षात आलें, तेव्हां त्यालाहि जगन्नाथाच्या या अपमानास्पद स्थितीबद्दल फार वाईट वाटलें तो सहानुभूतीनें म्हणाला, " यात एवढे वाईट वाटण्यासारखें काय आहे ? तुझ्या तर मला यात काहीच अपराध दिसत नाहीं. दुसऱ्याच्या चागल्या अथवा वाईट वागणुकीमुळें आपला मान वाढला किंवा कमी झाला, ही समजूतच अगदीं खोटी होय तुझी स्त्री कोणती, तें आतां माझ्या लक्षात आले प्लॅटफॉर्मवर हिंडत असता मी वसताला ओळखले, पण बाकी कोणीच माझ्या ओळखीचें दिसलें नाही वसतानें मला मुळीच पाहिलें नाही आणि त्याच्या दृष्टीस पडावे अशी माझीहि पण इच्छा नव्हती त्याचे ते कपडेबिपडे पाहिले म्हणजे जणूं काय त्याला ब्यारिस्टरीच्या धद्यात हजारो रुपये मिळत असावे असें एकाद्याला वाटावयाचे, पण बिचाऱ्यावर अजून हायकोर्टांत जाण्याचा एकहि प्रसग आलेला नाही ! त्याच्याजवळ तशाच साहेबी थाटाचे एक प्रौढ गृहस्थ बसले होते, तेच तुझे श्वशुर वाटते ? "

जगन्नाथ खिन्न स्वरानें म्हणाला, " होय, तेच ! "

पुडलीक म्हणाला, " त्याच्या समोरच्या बांकावर मध्यभागीं बसलेली तरूण मुलगी तीच तुझी स्त्री असावी ती व तिच्याबरोबरची ती मोलकरीण थोड्या वेळापूर्वी स्टेशनच्या धक्क्यावर फिरत होत्या. जगन्नाथ, त्या तरुणीकडे पाहून मला तर असें वाटलें कीं, ती त्या भपक्याच्या राहणीला अगदी कटाळलेली असावी. तिच्या चेहऱ्यावरची शालीनता आणि तो पोषाक ही दोन्ही अगदीं परस्परविरुद्ध आहेत, असें मला तर वाटलें आणि आतां तुझ्याकडून जेव्हा तीच तुझी स्त्री असे समजलें, तेव्हा तू तिची हेळसाड करीत आहेस, असेंहि मला वाटू लागलें आहे. जगन्नाथ, बोलतों याचा राग मानूं नकोस. तुझ्या स्त्रीने असें परक्याबरोबर वाटेल तिकडे हिंडावें आणि वाटेत त्या बिचारीची अशी अप्रतिष्ठा व्हावी, याचें तुला कांहींच वाटत नाहीं काय ? "

" वाटतें. वाटत नाहीं, असें कसें होईल ? पुष्कळ राग येतो, पुष्कळ वाईट वाटतें, पण उपयोग काय ? "

" उपयोग काय ? जा, आणि आपल्या घरीं तिला घेऊन ये !"

" तूं म्हणतोस तें खरें, पण तसें करण्यास धैर्य होत नाहीं ! "

पुडलीक आश्चर्य दर्शवून हसत हंसत म्हणाला, " 'धैर्य होत नाही' हे शब्द तुझ्याच तोंडांतून निघत आहेत ना ? अरे, तुझ्या अगी एवढें साहस असून धैर्य होत नाहीं म्हणतोस ? "

जगन्नाथ गभीर स्वरानें म्हणाला, " पुडलीक, ज्या कार्यासाठीं खरोखर धैर्याची जरूर आहे, त्या कार्याना लागणारें धैर्य परमेश्वरानें मला विपुल दिलें आहे, परतु त्याबरोबरच त्यानें मला मानी स्वभाव दिल्यामुळें असल्या कामीं साहस करण्याची मात्र मला खरोखर भीति वाटते ती माझी स्त्री आहे, हे खरे, गृहस्थधर्माप्रमाणें तिला सुखात ठेवण्याला योग्य ते ऐश्वर्यहि देवाने मला दिलें आहे आणि तिचें सरक्षण करण्याची शक्तीहि अगी आहे, पण मी खेड्यांत राहणारा, अशिक्षित, धनगर, म्हणून जर तिनें माझा अपमान केला, तर माझ्या अगीं धैर्य असूनहि काय उपयोग ? अशा वेळीं माझ्या धैर्याचा काही उपयोग न होता उलट मरण बरे, अशी मात्र माझी स्थिति होईल. तिच्या बापाने तिला ज्या वैभवाने ठेवलें आहे आणि तिला जे शिक्षण मिळत आहे, त्यावरून तिच्या मनांत माझ्याविषयीं जो पूर्वी आदर होता, तोदेखील आता नाहींसा होऊन माझ्याविषयीं तिरस्कार मात्र तिच्या मनात वसत असेल. अशा स्थितींत तिच्याकडे न जाणेंच चागलें. "

जगन्नाथाचे हे म्हणणें पुडलिकालाही पटलें नाहीं, असें नाही तरी पण तें असावें तितकें युक्त नाही, असे वाटून तो म्हणाला, " जगन्नाथ, तुझीं हीं सगळीं अनुमानें आहेत मागे काहीं वर्षापूर्वी नानासाहेबानीं तशा अर्थाचा निरोप पाठविला होता, हे खरे, पण आता लीला ऐन तारुण्यात असल्यामुळे त्याच्या मनांत फरक पडण्याचाहि सभव आहे. "

" छे ! छे ! नानासाहेबाकडे जाण्याची तर मला फारच भीति वाटते ! त्यांचीं वेडीवाकडीं उत्तरे ऐकून माझ्या हातून काहीं प्रमाददेखील व्हावयाचा ! साहेबलोकांना आम्हा हिंदी लोकांचा अपमान करण्यांत जसें भूषण वाटतें, तसेंच या आमच्या गावठी साहेबाना आमचा अपमान करण्यांत कौतुक वाटते ! "

" पण आतां कदाचित् 'साहेब' वसंतापेक्षा खेडवळ जगन्नाथांत अधिक मनुष्यत्व आहे, असें त्याना वाटू लागलें असेल ! "

" छट्! उलट माझ्याविषयीं अधिक तिरस्कार मात्र वाढला असेल! साहेबाच्या अगाला हात लावणें म्हणजे सुधारणेची केवढी विटबना! त्यांच्या सुधारणेचा रथ मीं शभर मैल मागें ओढला, असेंही त्यांना वाटू लागलें असेल आणि त्यामुळें ते माझ्यावर फार रागावलेही असतील!"

यानतर दोघेहि थोडा वेळ स्तब्ध होते. जगन्नाथाच्या चेहऱ्यावरील खिन्नता अद्यापिहि दूर झाली नव्हती दोघे स्तब्ध आहेत, असें पाहून येसू म्हणाला, पुडलीकराव, तुमच्या मुबईच्या मारामारीचें काय झालें? त्या मारामारीची हकीकत जेव्हा तुमच्या आईला कळली, तेव्हा ती बिचारी रडू लागली! मी आणि दादासाहेबानी जेव्हा तिची पुष्कळ समजूत घातली, तेव्हा कोठें म्हातारीला कांहीं बरें वाटलें. त्या साहेबाने काहीं फिर्यादबिर्याद केली नाहीं ना?"

पुडलीक म्हणाला, " त्याने फिर्याद काहीं केली नाहीं, पण न जाणो कदाचित् करील या भीतीनें मी पळालो फिर्यादीची मला एवढी भीति नव्हती, पण हिंदी गृहस्थ आणि युरोपियन याच्या आजपर्यंतच्या मारामारींच्या फिर्यादींत न्यायदेवता हिंदी गृहस्थाकडे कशी वक्रदृष्टीनें पहाते, हें माहीत असल्यामुळें मला पलायनावाचून काही मार्ग सुचला नाहीं आत्ता झालेल्या मारामारीसबधानें देखील मला अशीच भीति वाटते "

जगन्नाथ म्हणाला, " भीति आहे, हें खरें, पण त्यासाठी पळण्याचा मार्ग मला श्रेयस्कर वाटत नाही मारामारीचे परिणाम भोगण्यासहि आम्ही तयार असलें पाहिजे. मग न्यायदेवता आम्हांवर प्रसन्न होवो अथवा न होवो! हिंदी लोकांची आपण काही चेष्टा केली, त्यांचा अपमान केला, किंवा त्यांच्याशीं अन्यायाचें वर्तन केलें, तर त्याचा प्रतिदड हिंदी लोकांकडून ताबडतोब मिळतो, हें आम्हीं पाश्चात्याच्या लक्षात आणून दिलें, म्हणजे आपोआप ते आमच्याशीं सभ्यतेनें वागूं लागतील. हिंदी लोक पशु नसून उलट ते आमच्याच सारखे तेजस्वी आहेत व शिवाय न्यायप्रियहि आहेत, हें त्यांना एकदा पटलें, म्हणजे पाश्चात्यातले उच्छृंखल लोकहि आमच्याशीं शालीनतेनें वागू लागतील. आमचा सामाजिक दर्जा पाश्चात्याच्या चालीरीतींचे अनुकरण करून केव्हाहि वाढणार नाहीं, तर आम्हीं आमचा निस्तेज स्वभाव टाकून देणें, हेंच आमचा सामाजिक दर्जा वाढविण्याचें खरें साधन होय."

येसू म्हणाला, " आम्ही मराठे म्हणजे अशिक्षित; पण आम्हा लोकांची अशी एक समजूत आहे कीं, आपला मान आपण सांभाळावा. पण तुमच्या या

साहेबी पोषाकाच्या बामणामधीं तितकी ताकद नसते आणि ऐट मात्र खूप करतात !"

जगन्नाथ हसत हसत म्हणाला, " येसू, ते सगळें खरें; पण पोटोबाची आता काय व्यवस्था ? दहा तर येथेच वाजले आणि जवळ तर काहीं नाहीं ! "

पुंडलीक म्हणाला, " येसूला पाठवून काही तरी बाजारातून आणवावें म्हणजे झालें. या प्रातात पुऱ्या व बटाट्याची भाजी पुष्कळ दुकानातून विकत मिळते. मीदेखील या प्रवासातले माझे दिवस या दोन वस्तूंवरच काढले आहेत "

जगन्नाथ म्हणाला, " पण मला त्या दोन्ही वस्तूचा फार कटाळा आला आहे मी बरोबर मुद्दाम थोडी भाडी वगैरे घेतली आहेत येसूला बाजारात पाठवून डाळ तादूळ मागवू आणि स्वयपाक करून जेऊ "

हा विचार सगळ्यानाच पसत पडला गावात जाऊन थोड्याच वेळात येसूने हवे असलेले जिन्नस आणले आणि पुडलीक व जगन्नाथ या दोघानी त्या ओढयाच्या कांठीं झाडाखाली छान स्वयपाक तयार केला येसूनें जागा स्वच्छ करून वडाच्या पानाच्या तीन पत्रावळी तयार केल्या आणि त्या तिघानी मोठ्या आनदाने वन-भोजन केलें नतर ते जबलपूरच्या स्टेशनावर न जाता पायीच जबलपूरनतरच्या देवरी स्टेशनावर गेले व तेथून अलाहाबादेस गेले.

* * *

जबलपुराहून सुटून मुबईकडे पळणारी गाडी आता बरीच लाव आली होती व त्या मानानें हवामानात जसजसा फरक पडत चालला होता, तसतसा पहिल्या वर्गाच्या उतारूपैकी काहीं उतारूच्या चेहऱ्यावरील भावहि वदलत चालला होता. विशेषतः वसतराव व नानासाहेब याच्या चेहऱ्यावरील मलीनता व खिन्नता दूर होऊन त्यांच्या चेहऱ्यावर मधून मधून हास्यहि खेळू लागलें होते ! तथापि त्या हास्यात एका कृष्णकृत्याची छायाहि खेळत होती. केव्हां केव्हा ते दोघे मोठ्याने बोलत होते, तर केव्हां केव्हा अगदीं हळूच कुजबूजहि करीत होते. ही त्याची कुजबूज सुरू झाली म्हणजे लीलेचा खिन्न चेहरा अधिक म्लान व चिंतातुर दिसू लागे. एका पाश्चात्य गृहस्थाच्या अंगावर हात टाकून जगन्नाथानें असभ्यतेचें व आडदांडपणाचें वर्तन केलें, अशा अर्थाचा विषय चर्चेला निघाला म्हणजे दोघेहि मोठमोठ्यानें बोलून जगन्नाथाच्या या वीरोचित कृत्याची टवाळी पुष्कळसे तिखटमीठ लावून करीत आणि आता तो साहेब जगन्नाथावर फिर्याद वगैरे करतो कीं काय,

यासंबंधानें जर कोणास बोलावेंसें वाटलें, तर एकमेकांच्या कानांत तोंड खुपसून दोघेहि आपले ओंठ हालवीत. हा प्रकार पाहिला म्हणजे लीलेला साहजिकच चिंता उत्पन्न होई. जगन्नाथावर जर खरोखरच फिर्याद झाली, तर त्याचें कसें होईल, अशी तिला काळजी वाटणें साहजिक होतें त्यात आणखी आपले बाबा या शिक्षेच्या विचाराने आनदित झालेले तिनें पाहिले, म्हणजे तिच्या अतःकरणाला असह्य वेदना होत! ज्यानें आपल्या मुलीची विटबना टाळली, त्याचे उपकार मानावयाचे सोडून उलट आपले वडील त्याच्याशीं कृतघ्नतेनें वागण्याचा विचार करीत आहेत, हें पाहून लीलेला किती दु.ख झाले असेल ते तिचे तिलाच माहीत

ठरल्या वेळी गाडी स्टेशनावर आली व ही मडळी आपल्या वैभवाचा दर्प मुबईच्या गरीब लोकाना दाखवीत दाखवीत वाळकेश्वर येथील आपल्या बगल्यात येऊन पोहोचली. वाटेत जो अपमानास्पद प्रकार घडला होता, त्याच्या विषादाची छाया सगळ्याच्या चेहऱ्यावरून हळू हळू दूर होऊ लागली होती, परंतु लीलेच्या मुखावरील विषण्णता मात्र अद्यापि तशीच कायम होती. तसेंच सहानुभूतीनें म्हणा अथवा स्त्रीचें निर्मल अत करण अशा अपमानानें दुखावलें गेल्यास त्याच्या वेदनाचा अनुभव असल्यामुळें म्हणा, चद्रभागेचा चेहराहि खिन्नच होता. एवढे मोठे पुरुषासारखे पुरुष पण त्यानाही इतक्यातच त्या घोर अपमानाचा विसर पडलेला पाहून चद्रभागेला सुशिक्षितांची अत करणें इतकीं अभिमानशून्य कशीं असावीत याचेच मोठे आश्चर्य वाटलें! बोलून चालून चद्रभागा म्हणजे अशिक्षित, त्यातून भिकारीण! तेव्हा तिची समजूत काहीं निराळी असावी यात नवल नाही अशा विडबनेपासून स्त्रियांचे सरक्षण करण्याचें ज्याना सामर्थ्य नाहीं, त्यानीं 'पुरुष' म्हणवून घेण्यापेक्षां मिशा काढून टाळ्या वाजवीत हिंडावें, असें भागूला वाटे. भागूचा हा विचार कितीहि असभ्य असला, तरी सुशिक्षित या विचाराला कांहींसा मान देऊ लागले आहेत. मिशाना फांटा देऊन भागूचें अर्धें अधिक म्हणणें त्यानीं कृतीनें कबूल केलें आहे. राहिलेल्या अर्ध्या म्हणण्याचा विचार आणखी दहावीस वर्षांनीं होणार नाहीं, असें तरी कोणी सांगावें? सुशिक्षितपणाची ती एक खूण आहे, असें ठरलें म्हणजे झालें! असो. भागूच्या या विचारांशीं आपणास काहीं कर्तव्य नाहीं. लीलेनें तिला आश्रय दिल्यामुळें व ती कांहीं वर्षे तिच्या सहवासात असल्यामुळें लीलेवर तिचें साहजिकच अकृत्रिम प्रेम जडलें होतें आणि म्हणून तिला जबलपूर स्टेशनवर घडलेल्या अपमानास्पद प्रकाराबद्दल लीलेइतकेंच वाईट वाटत होतें. लीलेच्या हृदयाला जो आघात

झाला होता, त्या आघाताच्या वेदना किती दु सह असतात, हें ज्या स्त्रीला निर्दोष व निर्मळ अतःकरण लाभले आहे, तिच्याशिवाय इतरांना समजावयाचें नाही. हृदयास झालेल्या आघाताचें प्रतिबिंब लीलेच्या मुखावर स्पष्ट उमटलें होतें आणि तो मलीन चेहरा पाहिला कीं, भागूच्या पोटात कालवाकालव सुरू होई. आमचे निर्लज्ज व खुशालचदु वसतराव आणि त्याच्याच कोटींतले नानासाहेब याना तर जणूं काय कांहींच घडलें नाही, असें वाटत होते व त्यामुळें लीलेच्या चेहऱ्यावरील उद्विग्नता त्याना उलट हास्यास्पद वाटली सामाजिक प्रगतीसाठीं स्त्रिया समाजांत विशेष पुढें येऊ लागल्या म्हणजे प्रथम प्रथम असले प्रकार हे घडणारच ! त्याबद्दल कुरकुर करणे योग्य नव्हे उलट पाश्चात्याचे व आपलें सघटन वाढत आहे, हें पाहून सुधारणेस मदतच झाली, असेहि कदाचित् या अभिमान-शून्य विद्वज्जनाना वाटत असल्यास त्यात नवल नाही

अलाहाबादेहून आल्यावर दोन तीन दिवस आपले दु ख लीलेने पोटातल्या पोटांतच ठेवलें एकदा ते भागूजवळ ओकावे असे तिला वाटे, तर एकदा तें तसेंच गिळावे असेंही तिला वाटे आपली दु खकथा ऐकून भागू फार तर सहानु-भूति दर्शवील, पण याशिवाय दुसरें तरी ती काय करणार ? तेव्हा तिला सागून उपयोग तरी काय ? असें लीलेला वाटे. परंतु भागूची सहानुभूतीहि आपल्या समाधानास बरीच कारणीभूत होईल, असे वाटून एके दिवशी सायकाळीं कोणी नाहीं, असें पाहून लीला भागूला घेऊन बागेत गेली आणि तिच्यासह एका लताकुजात बसली. बराच वेळ लीला स्तब्ध होती नतर विषण्णतेनें म्हणाली, “ चद्रभागा ! ”

नम्र व गोड स्वरानें चद्रभागा म्हणाली, “ काय ताईसाहेब ! ”

“ ताईसाहेब ! छे ! अगदींच कर्णकटु नाव. भागू , मला यापुढें नुसतेच ‘ताई’ म्हणून म्हणत जा. ‘ ताईसाहेब ’ म्हटलें कीं मला अगदीं चमत्कारिक वाटतें ! ”

“ मला काय मी ताई म्हणून म्हणेन, पण बाबासाहेब रागावतील ! ”

“ बरें तर. ताईसाहेबच म्हणत जा चालचलणूक साहेबी थाटाची, मग नुसत्या नावानेंच काय होणार आहे ? ”

चद्रभागा म्हणाली, “ ताईसाहेब, तुम्हाला जर हा पोषाक नी ही चालचलणूक आवडत नाहीं, तर टाकून कां देत नाहीं ? ”

निराशेनें व खिन्नतेनें लीला म्हणाली, “ पण टाकू कोण देईल ? ”

भागू हसत हंसत म्हणाली, " ज्यांच्या अगीं शक्ति असेल ते."

भागूचे हे शब्द ऐकून लीला थोडा वेळ स्तब्ध राहिली. नतर उसासा टाकून म्हणाली, " त्याना कोठे माझी आठवण आहे, चंद्रभागा ! आज पाच सहा वर्षें मी बापाच्या घरीं आहें, पण एक दिवसदेखील येऊन त्यानीं विचारपूसमुद्धा केली नाहीं."

" तुम्ही साहेबी थाटाची व आचारविचाराची मंडळी, म्हणून त्याना यायला धैर्य होत नसेल ! "

लीला म्हणाली, " ते खरे खरे पुरुष आहेत. वीराप्रमाणे पराक्रमी ! मग येथें येऊन आपल्या स्त्रीला घेऊन जाण्यास त्यांना एवढी भीति वाटते ? "

भागू म्हणाली, " ताईसाहेब, जे वीर असतात, त्याना नाही तरी ही खोडच असते. बाहेर ते पुष्कळ पराक्रम गाजवितील, पण घरीं मात्र स्त्रियाना भितील ! ताईसाहेब, जबलपूरच्या स्टेशनावर ज्यानीं तुम्हाला त्या साहेबाच्या हातून सोड-विलें, तेच ना तुमचे पति ? "

लीलेनें ' हो ' म्हणून मान हलविली. थोडा वेळ लीला सचिंत बसली नतर तिनें आपल्या लग्नाची सगळी हकीकत चद्रभागेला सागितली. चद्रभागे-कडून आपणास योग्य अशी सल्ला मिळेल किंवा तिचे आपणास काहीं सहाय्य मिळेल म्हणून तिनें ही हकीकत चद्रभागेला सांगितली नव्हती, पण केवळ आपल्या हृदयातलें दु ख ओकून टाकावें एवढयाच हेतूनें तिने ती हकीकत तिला सागि-तली होती. लीलेच्या विवाहाची ही हकीकत आणि विशेषतः नानासाहेबांनीं लीलेच्या दुसऱ्या लग्नाची चालविलेली योजना, ही जेव्हा चद्रभागेच्या चागली लक्षात आली, तेव्हा लीलेच्या चमत्कारिक स्थितीची तिला चागली कल्पना आली. एवढया वैभवसपन्न स्थितींत असून लीला ही नेहेमी अशी कष्टी का असते, हें जेव्हा चद्रभागेला समजलें, तेव्हा लीलेची तिला दया आली, आणि या बाबतींत शक्य तो प्रयत्न करून लीलेचे दु ख दूर केलें पाहिजे, असा तिनें मनातल्या मनांत निश्चय केला. भागू म्हणाली, " तर त्यांची आणि तुमची त्या स्टेशनावर ही पुष्कळ दिवसांनीं मुलाखत झाली म्हणावयाची ? इतकीं वर्षे गेलीं, तरी ते बरे तुमच्या लक्षांत राहिले ! त्याची आणि तुमची एकवार गाठ झाली, हेंहि एक प्रकारें बरें झालें. त्यांची आठवण पुसट होते न होते, तों पुन्हां ती त्यानीं ताजी करून ठेवली ! "

काय असेल तें असो, या वेळीं लीलेचे डोळे पाण्यानें भरून आले होते. बहुत-करून लहानपणच्या सासरच्या दिवसांची आठवण होऊन तिचे हृदय गहिंवरून आलें असावें. पदरानें डोळे पुशीत पुशीत ती म्हणाली, " ज्या स्थितींत त्यांनीं दर्शन देऊन विटबना टाळली, ती स्थिति मी आजन्म विसरणार नाहीं. भागू, ते तेथून क्षणार्धात निघून गेले खरे, पण तेव्हापासून माझ्या अतःकरणांत काय होतें नी काय नाहीं, तें माझें मला माहीत ! "

लीलेचे हे शब्द ऐकून भागूला साहजिक हसू आलें. ती म्हणाली, " ताई-साहेब, त्यांनीं तुमचे मन चोरून नेलें म्हणून असें होते आहे ! आणि खरें म्हणाल तर मला त्याचा चेहराहि दुसऱ्याचें मन चोरण्याइतका मोहक दिसला. अशा सतेज, सुदृढ व करारी पुरुषाला सोडून तुमचे बाबा त्या मरतुकड्या नी दु:शील वसतरावावर एवढे का भाळले आहेत ? मला तर त्या मेल्याला पाहिलें कीं किळस येते ! "

लीला थोडा वेळ स्तब्ध राहून नतर म्हणाली, " भागू, तू म्हणतेस त्यांनीं माझें मन चोरले म्हणून, पण मला तर वाटते, त्यानीं माझे पचप्राण नेले ! आतां हें शरीर म्हणजे खरोखर प्रेतवत् होय. "

लीला अत्यंत उद्विग्न झालेली पाहून तिला बरें वाटावें, या उद्देशाने भागू हसत हंसत म्हणाली, " तर ताईसाहेब, मला सागा. मी या प्रेताचा संस्कार करत्ये. ज्यानीं ते पचप्राण नेले, त्यांच्या दाराशी नेऊन टाकत्यें म्हणजे झालें ! "

" छे ! तसें करण्यास धैर्य होत नाही. या कलकित प्रेताच्या स्पर्शानें त्याचा पवित्र देह मलीन होईल ! "

" झाला तर झाला ! आपली मलीनता धुवून टाकण्यास ते समर्थ आहेत ! ते कांहीं माझ्यासारखे भागूबाई नाहींत ! समजा, ते येथे आले आणि बलात्कारानें तुम्हांला घेऊन गेले, तर तुम्ही काय करणार ? "

" मीदेखील त्याच दिवसाची वाट पहात आहें ! ते न्यावयाला येतील तेव्हांच जाईन ! "

" मग तुम्हीं हें त्यांना कळवीत कां नाही ? तुम्ही त्यांच्यावर एवढें प्रेम करतां आणि त्यांच्याविषयीं तुमच्या मनांत एवढा आदर आहे, हें जर त्यांना कळेल, तर ते खचित तुमची अशी अवहेलना करणार नाहींत. तुमचें स्वतःचें

हें मत त्याना समजल्यावर दोनशें नानासाहेब आडवे आले, तरी ते तुम्हांला घेऊन जातील ! ”

“ ते खरें; पण त्याना हें कळवील कोण ? त्यानाच तेवढा मान-अपमान आहे आणि मला मुळींच नाहीं वाटते ? लग्न होऊन इतकीं वर्षे झालीं, पण त्यांनीं कधीं एक दिवसहि येऊन चौकशी देखील केली नाहीं.”

असें म्हणतां म्हणता लीलेचे डोळे अश्रूनीं भरून आले ! लीलेचा हा, अभिमान पाहून भागूला मोठे कौतुक वाटलें ती म्हणाली, “ तर ताईसाहेब मला सागा. मी जाऊन त्याना आपला निरोप कळवीन ! मी आपली दासी, तेव्हा माझें हे कर्तव्यच आहे ! त्याना सागेन कीं, ‘ तुम्हीं चोर आहा आणि म्हणून तुम्हाला आमच्या ताईसाहेबाकडे आलें पाहिजे !’ ते येथें आल्यावर मग त्याना तुम्हीं वाटेल ती शिक्षा करा ! ”

भागूचे हे शब्द ऐकून त्या स्थितींतहि लीलेला हसू आल्यावांचून राहिलें नाहीं. तो म्हणाली, “ भागू, देवानें तुझी आणि माझी गाठ घालून दिली म्हणून कसे तरी दिवस जातात. नाहीं तर या जीवाचे काय झालें असतें आणि काय नाहीं, काहीं सागवत नाहीं !”

“ आणि ताईसाहेब, तुमच्या सगतीमुळें माझीहि विटबना टळली ! हें तरूण आणि थोड्या मोहक चेहऱ्याचे शरीर घेऊन भिक्षा मागत हिंडावयास माझा जीव खरोखरच फार भीत होता ! पण देवाची दया म्हणून या भिकारणीची अब्रु त्यानें राखली. तुमचे हे उपकार मी जन्मोजन्मीही विसरणार नाहीं ! मग जाऊ का मी त्याच्या गावाला ?”

दु खाचा सुस्कारा टाकून लीला म्हणाली, “ नको ! ”

“ का ? ते येणार नाहींत, असे तुम्हाला वाटते होय ? पण मला तरी तसें वाटत नाहीं. त्याना तुमचा निरोप कळल्यावर ते खात्रीनें येतील, आणि असा निरोप कळविण्यात तुम्हाला अपमान वाटत असेल, तर मी त्याना तुमचा कोण-ताहि सबध न दर्शविता तुमची हकीकत कळवून येईन ! ”

“ भागू, ते येतील हें खरें त्याचे हृदय किती थोर आहे, हें तू पाहिलें आहेसच, पण माझ्यामुळें त्याचा सामाजिक मान कमी होईल कीं काय याचीच मला भीति वाटते. आमच्या घरची चालचलणूक तू पहात आहेसच. माझा हा साहेबी थाट त्याच्या दृष्टीस पडला आहेच. गावात लोक आम्हाविषयीं काय

बोलत असतील आणि काय नाहीं, तें भगवंताला माहीत! हे लोकापवाद त्यांच्या कानावर गेल्यावाचून थोडेच राहिले असतील अशा स्थितींत जर त्यांनीं मला नेलें, तर लोकात त्याना खाली पहाण्याचा प्रसग येईल म्हणून म्हणत्ये, त्यांच्यावर मी ही आपत्ति कशाला आणू? राहू दे त्यांना सुखानें! वाटलें तर दुसरें लग्न करून आनदानें ससार करतील. मी कशाला त्याचें यश मलीन करू?"

लीलेचे डोळे पुन्हा पाण्यानें भरून आले. भागू म्हणाली, "तर काय तुम्ही सगळा जन्म असा रडण्यात घालविणार होय?"

"तेंच आता माझ्या नशिबीं आहे आणि मीहि पण त्यासाठीं तयारच आहें! बाबानीं मला या सोन्याच्या पिंजऱ्यांत कोंडून ठेवलें आहे, तेव्हा या पारतंत्र्यांत रडून रडून हृदय कोरडें करण्यावाचून मला आतां दुसरा कोणता मार्ग उरला आहे? त्या खेड्यातल्या साध्या व स्वतत्र ससारासाठीं जीव तळमळतो, पण हा पिंजरा मोडल्यावाचून मी तेथें जाणार कशी? भागू, हा पिंजरा मोडून मी या पारतंत्र्यातून मुक्त होईन, असें तुला वाटतें का?"

शोकसतप्त हृदयातलें दु ख अनावर झाल्यामुळें लीलेनें भागूला आपल्या हृदयाशीं धरून ती स्फुदू लागली! भागूचेहि अत करण कळवळून आलें! अशा परिस्थितींत स्त्रीहृदयात कोण खळबळ उडते, ते भागूला माहीत असल्यामुळें तिला लीलेची अत्यत दया आली सुसस्कृत असा शब्दसंचय भागूजवळ नव्हता, तरी पण अत करणातल्या थोर भावनाविषयीं देवानें तिला कृपणता दिली नसल्यामुळें धैर्याच्या दोनच पण खऱ्या शब्दानीं तिनें लीलेचे सातवन केलें. भागूच्या त्या गोड शब्दामुळें लीलेनेंहि आपलें दु ख तसेच गिळलें.

---

## प्रकरण अकरावे.

जबलपूरच्या स्टेशनावर घडलेली हकीकत विठ्ठलरावांना जेव्हा समजली, तेव्हा भविष्यकालीन वैभवाच्या दोऱ्या जणू काय आजच आपल्या हातीं आल्या, असें त्यांना वाटलें आणि पुढील कार्य त्याना फार सोपें वाटू लागलें. ते लवकरच मुबईस गेले व तेथें नानासाहेबाच्या आणि त्याच्या बऱ्याच मुलाखती झाल्यावर वसतासह ही सर्व मडळी जबलपुरास गेली. हे तीन शहाणे एके ठिकाणीं बसून जेव्हा काहीं कानगोष्टी करू लागले, तेव्हा लीलेनें त्यांतलें रहस्य शोधण्यासाठीं चंद्रभागेची तिकडे रवानगी केली. जगन्नाथावर कांहीं तरी किटाळ आणण्याचा या मंडळीचा

उद्योग चालला आहे हें जेव्हां भागूला समजलें, तेव्हां त्या अत्यत दरिद्री व अशिक्षित भागूच्या चित्तवृत्ती क्षणभर आश्चर्यानें चकित झाल्यावाचून राहिल्या नाहींत जे आपणास सुशिक्षित, समाजसुधारक व समाजाचे आधारस्तभ म्हणवितात, त्यांच्याच अतःकरणांत कसें हालाहल भरलेलें असतें ते पाहून भागूला त्या तिघाचा मनस्वी सताप आला. स्वार्थवश मनुष्याच्या हातून अनुचित गोष्ट घडणें एक वेळ स्वाभाविक म्हणून समजलें जाईल, परतु अशा स्थितींतहि उपकारकर्त्यांवर उलटून त्याशीं कृतघ्नतेनें वागणारा मनुष्य भागूच्या आजवर दृष्टीस पडला नसल्यामुळें हे तिघे ‘ मनुष्यच ’ आहेत ना, असाही तिला सशय आला ! ज्या जगन्नाथानें जबलपूरच्या स्टेशनावर लीलेची विट-बना टाळली व ज्याच्या उपकारऋणात नानासाहेब व वसतराव पक्के जखडले गेले होते, त्या जगन्नाथावरच आता सगळे उलटले असून ज्या प्रसगानें त्याची अब्रु बचावली गेली तोच प्रसग जगन्नाथाच्या विटबनेस कारणीभूत होत असल्यामुळें त्याबद्दल सगळे आनद मानीत आहेत हे पाहून भागूलाच काय, पण ज्याला म्हणून मनुष्यहृदय आहे, त्याला उद्वेग वाटल्यावाचून रहाणार नाही ! इतकेंच नव्हे, तर ज्या वॉटसन् नावाच्या गार्डाची कणिक जगन्नाथानें मऊ केली होती, त्या वॉटसन्‌ला देखील या तिघाचे विचार जेव्हा समजले, तेव्हा त्यालाहि आह्मा हिंदी लोकाच्या ‘ दानती ’बद्दल महदाश्चर्य वाटलें हे तिघे शकुनी एके ठिकाणीं जमून कोणत्या मोहिमेची तयारी करीत आहेत, हें जेव्हा भागूकडून लीलेला समजलें, तेव्हा आपल्या मस्तकावर जणू काय आकाश कोसळून पडत आहे, असेच तिला वाटलें. आपल्या विटबनेच्या वेळीं धावून येऊन ज्यानी आपली आपत्ति टाळली, त्याच्यावरच आपल्यामुळे येऊ पहाणाऱ्या आपत्तीच्या प्रसगीं आपण त्याच्या उपयोगी कशा रीतीनें पडावे, याविषयीं ती विचार करू लागली. लीलेनें या बाबतींत पुष्कळ विचार केला, परंतु या स्त्रीस्वातंत्र्याच्या भोक्त्यानी आपले हातपाय इतके गच्च बाधून टाकले आहेत कीं, परमेश्वराची करुणा भाकण्यावांचून दुसरें काहींहि आपणास करतां येण्यासारखें नाहीं, असेंच शेवटीं तिला दिसून आलें. अशा परतंत्र स्थितींत उपकारकर्त्यांचे हाल पहाणें ही एक प्रकारची शिक्षाच होय, असें लीलेला वाटल्यावांचून राहिलें नाहीं. एकवार वडिलांची गांठ घ्यावी आणि त्याना काय ते स्पष्ट सांगावें, असेंही तिला वाटलें, परंतु अशा प्रकारच्या गुप्त खलबताचा आरोप स्वतःच्या बापावर करण्यास तिला धैर्य झालें नाहीं !

इकडे हे तिघेहि मुत्सद्दी लवकरच जबलपुराला आले आणि त्यानीं वॉटसनची गांठ घेतली. आपणास जगन्नाथानें मारहाण केली, अशा अर्थाची फिर्याद जगन्नाथावर लावण्यासबधानें या गार्डाला तिघाकडूनहि आग्रह होऊं लागला. गार्डाला असें करणें अनुचित वाटू लागलें. तो म्हणाला, "त्यानें माझा कांहीं अपराध केला आहे, असें मला वाटत नाहीं. मारामारीसंबधानें आम्हा लोकाना काहीं वाटत नाहीं. दोन ठोसे देणें घेणें यात निदान आम्हास तरी विशेष असें काहींच वाटत नाही! पण काहीं झालें तरी असली गोष्ट कोर्टांत नेण्यास आमची केव्हाहि तयारी नसते. शिवाय अपराध त्या गृहस्थाचा नसून माझाच आहे, तेव्हा मी त्याच्यावर फिर्याद करण्यास मुळीच कबूल नाहीं"

गार्डानें असें सागितल्यावर नानासाहेब साहाजिकच थोडे निराश झाले, पण विठ्ठलरावानीं त्याना धीर दिला! स्टेशनमास्तराची गाठ घेऊन त्यानीं या मारामारीच्या मुळाशीं राजद्रोहाचा बादरायण सबध जोडला. शिवाय स्टेशनमास्तर व गार्ड या दोघाचे हातहि चागले ओले केले! त्याबरोबर सगळी व्यवस्था लागून लगेच तेथल्या मॅजिस्ट्रेटसमोर या गार्डसाहेबानीं जगन्नाथावर मारामारीची फिर्याद दाखल केली!

या वेळीं जगन्नाथ व पुडलीक अलहाबाद येथील प्रदर्शन पाहून व आणखी काहीं ठिकाणें पाहून पुसा येथील शेतकी कॉलेज पाहण्यास गेले होते तेथे असता अकस्मात् जगन्नाथाला पकडण्यात आलें आणि त्यामुळें पुडलिकासहि त्याच्या बरोबर जबलपुरास यावें लागलें! आपल्या धन्यास पकडलेलें पाहून म्हाताऱ्या येसू गड्याच्या अगाचा अगदीं संताप झाला. त्याला शात करून शिवाय आलेल्या प्रसगाशी कसें झगडावयाचें याचा विचार पुडलिकाला करावयाचा होता. जबलपुराला आल्याबरोबर काही गृहस्थाच्या ओळखी काढून व त्याना विनति करून जगन्नाथाला जामिनावर सोडविण्याचा प्रयत्न पुडलिकानें केला, परंतु तो यशस्वी झाला नाहीं! गावातल्या काहीं देशकार्यधुरंधर गृहस्थाच्या कानावर सगळी हकीकत घालून त्याचें सहाय्य मिळविण्याचा प्रयत्न पुडलिकानें केला, परंतु ही खाजगी बाब आहे, यात राष्ट्रकार्याचा काहीं संबंध नाहीं, असें सागून पुडलिकाला सहाय्य करण्याचें त्यानीं नाकारिलें! पुढें या मारामारीच्या खटल्याची उभारणी कशी झाली व ती कोणी केली, वगैरे हकीकत जेव्हां जगन्नाथ व पुंडलीक या दोघाना समजली, तेव्हां त्याच्या

उद्वेगास तर सीमाच राहिली नाहीं. दुसऱ्यावर उपकार करणें किंवा कोणाला संकटात सहाय्य करणें, हें इतकें भयावह आहे, असे जर या समाजोद्धारकांनींच सोदाहरण दाखविण्याचा प्रयत्न केला, तर या लोकाच्याबद्दल बिचाऱ्या गरीब व अशिक्षित लोकानीं अविश्वास बाळगणें अगदीं साहजिक होय | परतु आश्चर्य हे की, केव्हाहि दानतीचा प्रश्न उत्पन्न झाला कीं, तो मान घेण्यासाठीं केवळ पुस्तकी ज्ञान, श्रीमती आणि भपकेबाज पोषाक या त्रयींनीं अलंकृत झालेले असे चरित्रहीन लोक पुढे होतात आणि खरोखर थोर अत करणाच्या सच्छील दरिद्री लोकावर बददानतीचा शिक्का मारला जातो ! | आपल्या देशात चालू असलेला हा पक्षभेद डोळयाआड करून समाजाची उन्नति करू पहाणे म्हणजे वृक्षाचीं मुळें तोडून त्याच्या पानावर पाणी शिंपडणे होय समाजात केवळ ऐश्वर्याच्या व सुधारणेच्या पाघरुणाखालीं जे अनाचार चालतात आणि श्रीमताकडून गरिबावर जे जुलूम होत असतात, ते पहिल्याप्रथम बद झाले पाहिजेत. हीच खरी समाजसेवा होय 'विवाह कोणत्या वर्षी व्हावा आणि स्त्रीशिक्षण कसें असावें,' या गोष्टींचा विचार व वाद म्हणजे समाजाची उन्नति असून तो केवळ कालापव्यय होय. समाजाचे खरें कल्याण कशाने साधेल, इकडे लक्ष जाऊ नये म्हणून या असल्या खेळण्यानी हे ढोगी समाजोद्धारक आपल्या समाजाला नुसते खेळवीत आहेत, अथवा कदाचित् ते स्वत हि फसत असतील ताबड्या रंगाचे खेळणे चोखून पोर कंटाळलें म्हणजे त्याच्या पुढे हिरव्या रंगाचे खेळणे फेकायचे, पण त्याला बोडलेंभर दूध म्हणून पाजावयाचे नाहीं, त्यातलीच ही समाजोन्नति आहे ! आमच्या राष्ट्रातला सगळा दरिद्री वर्ग ऋणमुक्त झाला पाहिजे म्हणून आमच्या समाजोद्धारकानी काय प्रयत्न केला आहे ? ज्या देशात शेंकडा ऐशी लोक शेतीवर उदरनिर्वाह करतात, त्यातील प्रत्येकास स्वत ची अशी काही जमीन आहे की नाहीं, याचा आमच्या समाजोद्धारकानीं कधीं विचार केला आहे काय ? शिक्षणाच्या आणि सुधारणेच्या नावाखाली पिंजऱ्यातले पोपट बनण्यापेक्षा जगलांत स्वतत्र विहार करून नुसती शीळ वाजविणें हेंदेखील अधिक मानाचे व सुखाचे आहे. नानासाहेब, विठ्ठलराव आणि वसत याची कृति पुष्कळांस उद्वेगजनक वाटेल खरी, परंतु त्याला कांहीं इलाज नाहीं. समाजातल्या लब्धप्रतिष्ठिताचे बुरखे आज जर कोणी वर केले, तर वरील त्रयीप्रमाणें हजारों नानासाहेब, विठ्ठलराव व वसत आमच्याभोंवतीं आहेत, असें आम्हांस दिसून येईल. समाजाच्या उन्नतीविषयीं एवढी मेघगर्जना होत असूनहि आमचा समाज असा अधोगामी का, याचें कारण

यावरून कोणाच्याहि लक्षात येण्यासारखें आहे. या सुशिक्षितांपेक्षां अशिक्षित पुष्कळ बरे असें जें आम्हास वाटतें तें याचसाठीं.

पुडलिक आणि जगन्नाथ या दोघाच्याहि लक्षात या खटल्याचें स्वरूप लवकरच आलें व या बाबतींत आपणास कोणाचेंहि सहाय्य होणार नाही, हेंहि त्याना कळून चुकले. दोघेहि धैर्यानें खबीर असून आपण काहीं अन्याय्य वर्तन केलें नाहीं, अशी दोघाचीहि खात्री होती. या फिर्यादीचा जो काहीं परिणाम होईल, तो भोगण्यास जगन्नाथाची तयारी असल्यामुळें या दोघानी कोणाच्याही सहाय्याची अपेक्षा बाळगिली नाही. तथापि कर्तव्य म्हणून पुडलिकानें ही सर्व हकीकत सुदरपूर येथें पत्र पाठवून नारायणकाकाना कळविली. पुडलिकानें नारायणकाकाना जे पत्र पाठविलें होते त्यात खाली लिहिलेला मजकूर महत्त्वाचा होता —

"आम्ही दोघानी अशा रीतीनें मारामारी केली, हे वाचून तुम्हास वाईट वाटलें असेल, आमचा राग आला असेल, व आता काळजीहि वाटत असेल, पण आम्हीं तरी काय करणार ? ती वेळच अशी चमत्कारिक होती कीं, मारामारी करावी की करू नये, याचा विचार करण्यास अवसरच नव्हता विचार करण्यात वेळ घालविला असता, तर सच्छीलतेने वागण्यास तत्पर अशा गृहिणीचें अत करण त्या अपमानानें कायमचें दुभंगलें असते ! या मारामारीतून यशस्वी रीतीनें आम्ही निभावलों असें आम्हास वाटत होतें, परंतु आता आमचा हा भ्रम दूर झाला आहे. त्यात उद्वेगाची गोष्ट एवढीच की, ज्याच्यावर आम्ही उपकार केला, त्याच्याच प्रयत्नामुळें ही फिर्याद जगन्नाथावर दाखल झाली आहे ! * * जगन्नाथाची सुटका जामिनकीवर करावी म्हणून येथल्या काहीं गृहस्थाना मी मुद्दाम भेटलों, परंतु त्याची मदत मिळाली नाहीं. एका स्त्रीवर जुलूम झाला असता, तर झाला असता, त्यात जगन्नाथानें पडून विकतश्राद्ध कशाला घ्यावयाचें होतें ? असेंहि मला देशभक्त * * * यांनीं विचारलें ! त्याच्या अशा प्रकारच्या या प्रश्नाला अर्थातच उत्तर देण्याच्या भानगडींत मीं पडलो नाही. आमच्या स्त्रियांची इज्जत संभाळणें हें ज्याना विकतश्राद्ध वाटतें, ते आमच्या राष्ट्राचें कल्याण साधण्यासाठीं बोलतात त्या वेळीं खरोखर ते अतःकरणापासून बोलतात, कीं नुसत्या वल्गना करतात, तें

परमेश्वराला माहीत! येत्या शनवारीं खटला मॅजिस्ट्रेट समोर सुनावणीस निघणार आहे. वकील वगैरेच्या भानगडींत न पडता स्वतः जगन्नाथच आपलें सरक्षण करणार आहे. जो निकाल होईल, तो नतर कळवीन."

पुडलिकाचें हें पत्र नारायणकाकाच्या हातीं पडल्यावर त्याना साहजिक काळजी वाटू लागली. जगन्नाथाची आई यमुना हिनें तर रडून रडून नारायणकाकाना पुरें पुरें केलें, परतु काकानीं चार धीराच्या गोष्टी सागितल्यावर यमुनेचे थोडें समाधान झालें काकानीं त्याच दिवशीं पुडलिकाला पत्र लिहिले हे पत्र पुडलिकाच्या हाती पडल्यावर जगन्नाथ व पुडलीक या दोघानाहि पुष्कळ धीर आला. हें पत्र पुष्कळ मोठे असल्यामुळे मुद्याचा तेवढा मजकूर पुढें देत आहो

"तुम्हा दोघाना मीं जें शिक्षण दिलें व मनुष्यत्व म्हणजे काय, हे तुमच्या मनावर बिंबविण्याचा जो प्रयत्न केला, त्याचा योग्य असा परिणाम दोघाच्याहि चित्तावर झाला आहे, असे मला यापूर्वीच आढळून आलें होते. जबलपूरच्या स्टेशनावर जें कृत्य घडलें, तें याच शिक्षणाचे फळ होय. त्याबद्दल मला वाईट वाटत नसून समाधानच वाटत आहे 'अन्याय सहन न होणें, हेच मनुष्यत्वाचे पहिले लक्षण होय.' जुलूम सहन करण्याची सवय एकदा चित्ताला जडली, म्हणजे मनुष्यत्वाच्या उच्च पायरीवरून खालीं अधोगतीकडे जाण्यास मुळीच वेळ लागत नाही. प्रतिकूल परिस्थितींत अन्यायाशी झगडणे साहजिकच कष्टप्रद असते, परतु या स्थितीत मनोबळाचे सुखहि स्वानुभवास येते आणि त्या सुखात पैशाच्चिक वृत्तीच्या लोकाकडून आलेल्या आपदा विपदा सहज विरघळून जातात. जगन्नाथास कदाचित् शिक्षाहि होईल, पण त्याबद्दल मला एवढे वाईट वाटणार नाही. त्या स्त्रीवर आलेल्या सकटाच्या वेळी जगन्नाथ तेथे हजर असून तो तिच्या साह्यार्थ धावला नाहीं, असें जर मला समजले असते, तर मात्र फार वाईट वाटलें असतें. वकील वगैरेंच्या भानगडींत पडला नाहीं, हेंच बरें केलें. न्यायाचीं तत्त्वें फार थोडीं आणि तीं सहज समजण्यासारखी आहेत तीं समजावून देण्यास वकिलांचें कारण नाहीं. केवळ शब्दछळ करून वस्तुस्थितीचा विपर्यास करण्यासाठींच वकिलीचा धदा आहे. अशा स्थितींत न्यायकचेरींत उगीच वितडवाद करण्यापेक्षा आपलें म्हणणें आपणच स्पष्ट सागणें हेंच हितावह होय. सत्य स्पष्ट करण्यासाठीं वाद करावे लागत नाहीत, तर असत्यावर पांघरूण घालण्यासाठीं वाद करावे लागतात. अशा वादांत

विजय मिळाला तरी त्यांत अर्थ नाहीं. तेव्हां मॅजिस्ट्रेटसमोर स्वतः जगन्नाथच आपलें म्हणणें सांगणार आहे, हें वाचून मला समाधान वाटलें. परिणामाबद्दल काळजी करण्याचें कारण नाहीं परमेश्वरावर विश्वास ठेवून सत्याची कांस केव्हाहि सोडू नये."

वरील मजकुराचें उपदेशपूर्ण, पण उत्साहवर्धक पत्र पुडलिकाच्या हातीं पडल्यावर त्याला व जगन्नाथाला मोठा धीर आला. ठरलेल्या दिवशीं खटला मॅजिस्ट्रेटसमोर सुनावणीस निघाला आरंभीं या खटल्याला बरेंच भयकर स्वरूप देण्यात आलें होते, परतु स्वत मॅजिस्ट्रेट फार विचारी गृहस्थ असल्यामुळें प्राथमिक चवकशींतच हें भयकर स्वरूप वितळून जाऊन मारामारीचा प्रश्न काय तो शिल्लक राहिला. गार्ड वॅटसन् याची साक्ष कोर्टात झाली व जगन्नाथानें त्याच्या तोडूनच त्याच्या अपराधाची हकीकत वदविली त्याबरोबर ही फिर्याद अगदीच क्षुल्लक स्वरूपाची झाली. तथापि जगन्नाथाने गार्डाला मारल्याचे कबूल केल्यामुळें त्याला अल्पस्वल्प शिक्षा करणें मॅजिस्ट्रेटसाहेबास भाग झाले. मॅजिस्ट्रेटने जगन्नाथाला एक महिना साध्या कैदेची शिक्षा फर्माविली वास्तविक थोड्याशा दडावरहि भागलें असतें, परंतु तसे न करता मॅजिस्ट्रेटसाहेबानी कैदेची शिक्षा फर्माविली

हा एक महिना पुडलिकानें जबलपुरासच काढला आणि जगन्नाथाची शिक्षा सपताच ते दोघेहि तेथून निघून सुदरपुराला आले सुंदरपुराला येसू गडी अगोदरच येऊन जगन्नाथाच्या शिक्षेचे दिवस मोजीत होता जगन्नाथाला शिक्षा झाल्याचें ऐकून कांहीं थोड्या लोकाना आनद झाला, हें खरें, परंतु ज्याना वाईट वाटलें अशांचीच संख्या पुष्कळ होती. एकट्या सुदरपूरच्याच नव्हे, तर त्याभोवतालच्या गावांतूनहि जगन्नाथासबधानें पुष्कळ लोकाना वाईट वाटलें. विशेषत. एका स्त्रीची अब्रू वाचविल्यामुळें हा प्रसग जगन्नाथावर आला, हें जेव्हा त्या लोकाना समजले तेव्हां तर त्यांना न्यायदानासंबधानें मोठें आश्चर्य वाटलें आणि त्याच्या अत -करणांत जगन्नाथासंबधानें पूर्वीपेक्षांहि अधिक आदर वाढला. आज अमुक वेळीं जगन्नाथ सुदरपूरला येणार असें जेव्हा तेथल्या व भोंवतालच्या गांवच्या लोकांना समजलें तेव्हां जगन्नाथाला पाहाण्यासाठीं स्टेशनावर हजारों लोक गोळा झाले होते. जगन्नाथ गाडींतून उतरतांच लोकानीं त्याचा मोठा सत्कार केला. आपला हा गौरव निष्कारण होत आहे, असें जगन्नाथाला वाटून त्यानें जमलेल्या लोकांना तसें सुचविलेंहि; परंतु त्यावेळीं जगन्नाथाचें ऐकतो कोण? तो नको नको म्हणत असतांहि लोकांनीं मोठ्या थाटानें त्याची मिरवणूक काढून त्याला घरीं आणून पोहोंचविलें.

विठ्ठलरावांचे या सगळ्या हकीकतीकडे लक्ष असल्यामुळें हें वातावरण थंड होऊन कांहीं दिवस लोटल्यावर त्यांची स्वारी सुदरपूरला आली. ते तेथें आल्यावर पुन्हा पूर्वीचे भटभिक्षुक त्याच्या भोंवतीं गोळा झाले आणि पुढील कार्याची योजना मुकरर झाली.

सकाळीं आठ साडेआठ वाजण्याच्या सुमारास नारायणशास्त्री रोजच्या प्रमाणें देवघरात बसून पूजा करीत असता त्याचेकडे विठ्ठलराव, शामभट व गगाधर दीक्षित असे तिघे येऊन दाखल झाले. ते तिघे आल्याचे समजतांच नारायण-काकांनीं त्याना आंत बोलाविलें व त्याना बसण्यासाठीं रगनाथाला सतरंजी आण-ण्यास सागितली. कृष्णी काकाजवळ बसली होती, ती या तिघा परक्या गृहस्थांना पाहून उठून आत गेली. रगनाथानें सतरंजी आथरल्यावर तिघेहि तीवर येऊन वसले खालीं बसतां बसता विठ्ठलराव म्हणाले, “ आपली पूजा संपेपर्यंत आम्ही बाहेरच बसणार होतों. म्हटले उगीच आपल्या पूजेंत व्यत्यय नको ! ”

नारायणकाका हसत हसत म्हणाले, “ आपणहि परमेश्वरस्वरूप आहा, तेव्हां आपल्या येण्याने पूजेंत व्यत्यय कसा येईल ? कोणत्या कारणास्तव आज गरिबाच्या घरीं पायधूळ झाडलीत ? सर्व मंडळी कुशल आहेत ना ? ”

विठ्ठलराव म्हणाले, “ होय. आपल्या आशीर्वादानें सर्व कुशल आहेत. चार दोन दिवसांपूर्वी येथे काहीं कामासाठी आलो, तो या शास्त्रीपडितानीं मला मोठ्या सकटात टाकले आहे. तेव्हा याना बरोबर घेऊन तुमच्याकडे आलो. ”

या म्हणण्याचा अर्थ नारायणकाकाच्या लक्षात प्रथम आला नाहीं. ते म्हणाले, “ छे ! छे ! ते सगळे भले गृहस्थ आहेत. ते तुम्हाला केव्हाहि सकटांत टाकणार नाहींत. काय, त्याचे म्हणणे तरी काय आहे ? ”

विठ्ठलराव अडखळत म्हणाले, “ काका, त्यांचें म्हणणे अयोग्य आहे, असें काहीं नाहीं. पण ते तुम्हाला कळविण्याचा भार त्यानीं मजवर घातला, हेच मला सकट वाटते. मीं त्याना म्हटले, नारायणकाका म्हणजे विद्वान, थोर व समजूतदार गृहस्थ ! त्यांना सगळें काहीं समजतें. त्याच्या कानावर तुमच्या गावातल्या भानगडी मीं कशाला घालू ? तुम्हीच जाऊन सांगा. पण येथें आलों आहें, असें पाहून त्यानीं सगळ्यांनीं मलाच पुढें केलें आहे. त्याचे असें म्हणणें आहे कीं, जगन्नाथाला एक महिना कैदेची शिक्षा झाली होती. तुरुंगांत असतांना आपल्या जातीधर्माप्रमाणें अर्थातच राहता येणें शक्य नाहीं. तो घरीं आल्यावर त्याला तुम्ही प्रायश्चित्त घाल

अशी इतके दिवस गांवांतल्या लोकांनीं वाट पाहिली, पण अजूनपर्यंत प्रायश्चित्त न दिल्यामुळें गांवात मोठा गोंधळ माजला आहे. तुम्ही स्वत. वर्णाश्रमाचे अभिमानी आहां. तेव्हां तुमच्याच घरात असा अनाचार असूं नये, अशी सांगळ्यांची इच्छा आहे."

विठ्ठलरावांचे हे शब्द ऐकून नेहमीं शांत वृत्तीनें बोलणारे नारायणकाका थोडे संतप्त झाले. जगन्नाथाला शिक्षा होण्याच्या मुळाशी विठ्ठलराव आहेत, हें त्यांना समजलें होते व त्यामुळें विठ्ठलरावावर त्याचा साहजिक रोष होता. विठ्ठलरावांनीं हा एवढा प्रयत्न का केला, हें आता त्याच्या लक्षांत आलें, परंतु जगन्नाथाला बहिष्कृत करण्यात त्याचा पुढें काय डाव आहे, हें मात्र नारायणकाकांच्या लक्षात येईना. ते म्हणाले, "विठ्ठलराव, तुम्ही मोठ्या स्तुत्य हेतूनें मज-कडे आलां आहां, हे स्पष्टच दिसते माझ्या घरात व जगन्नाथाच्या घरांत अनाचार चालू नये, अशी माझी इच्छा आहे व परमेश्वरानें त्यांत मला यशहि दिलें आहे. तुमच्या दृष्टीनें आमच्या घरात अनाचार चालत असतील, पण ते अनाचार पाळणें आम्हाला आमचें कर्तव्य वाटते. जगन्नाथाला शिक्षा झाली खरी, पण ती का झाली, याचाहि विचार केला पाहिजे. एका स्त्रीची विडबना त्यानें एका नरपशूच्या हातून टाळली, म्हणून त्याला तुरुगांत जाण्याचा प्रसग आला. जगन्नाथाच्या सहवासानें उलट तुरुंगासच तीर्थस्थानाचें पावित्र्य प्राप्त झालें आहे. जे पुरुष त्या स्त्रीजवळ होते आणि ज्यांनी तिचें सरक्षण केलें नाहीं, त्यानाच वास्तविक समाजानें बहिष्कृत करावयाला पाहिजे. जगन्नाथानें आपलें कर्तव्य बजावल्यामुळें समाजानें उलट त्याच्या पायावर मस्तक ठेवून पावन व्हावयास पाहिजे, परंतु हा समाज जगन्नाथासच बहिष्कृत करू पहात आहे! अहो, आगींत उडी घालून एखाद्याचा प्राण वांचविला, तर थोडेंफार शरीर भाजणारच. तसाच हा जगन्नाथालाहि तुरुगवास भोगावा लागला. याबद्दल समाज जगन्नाथाचा उपकृत नसून उलट त्यालाच बहिष्कृत करू पहात आहे, हे मोठे आश्चर्यच म्हणावयाचें!"

नारायणकाकांचे हे विचार या तिघांनाहि पसंत पडले नाहींत; परतु ते विचार खोडून कसे काढावेत हें मात्र कोणासहि सुचेना. विठ्ठलराव म्हणाले, "काका, तुमचे म्हणणें खरें आहे; पण तें या लोकांना पटणार नाहीं. तुरुंगांतून कोणी जाऊन आला कीं, त्यानें प्रायश्चित्त घेतलेंच पाहिजे, एव्हढें यांना माहीत. तेव्हां मी म्हणतों, यांच्या शब्दाला मान देण्याला हरकत काय आहे?"

इतक्यांत शामभटजी म्हणाले, "काका, तुमच्या या अशा करण्यानें गावची घडी बिघडते. उद्या लोक वाटेल तीं कृत्यें करतील आणि प्रायश्चित्त घेत नाही म्हणून म्हणतील. जगन्नाथानें घेतलें नाहीं, मग आम्हीच का घ्या? असे ते म्हणतील. शिवाय आम्हाला काहीं सोवळें ओंवळें आहेच कीं नाहीं? जगन्नाथाला पक्तीला घेऊन बसणें आम्हाला तर काहीं योग्य वाटत नाहीं!"

नारायणकाका शातपणें म्हणाले, "शामभटजी, तुम्हांला जें योग्य वाटेल, ते करण्याला तुम्ही मोकळे आहांतच. आपल्याला पक्तीला घ्या म्हणून जगन्नाथानें केव्हां तुम्हाला आग्रह केला आहे? त्याचें आचरण त्याला शुद्ध वाटतें, तर तुमचे आचरण तुम्हाला शुद्ध वाटतें. जगात हें असें चालणारच. त्याला काहीं इलाज नाही"

विठ्ठलराव गभीर स्वरानें म्हणाले, "काका, आपल्या गावांत अगोदरच फक्त पाचपचवीस घरे ब्राह्मणाचीं आहेत. त्यात अशी दुफळी होणें चागले नाहीं तुम्ही चागले शास्त्रव्युत्पन्न असल्यामुळे तुम्हाला सगळें काही समजतेच आहे. जगन्नाथाला प्रायश्चित्त द्यावयाचे नसेल, तर नका देऊ; पण प्रायश्चित्त दिलें, असे लोकात तर सांगाल कीं नाहीं?"

काका म्हणाले, "काय खोटे बोलू म्हणता? छट्! असें तर कधींच व्हावयाचे नाहीं"

विठ्ठलराव म्हणाले, "बरें खोटे बोलूं नका. खरें बोलून कार्यभाग साधण्याचा मार्ग मी तुम्हाला सागतों. तुरुगातून बाहेर पडल्यावर गगास्नान घातलें होते, म्हणून सागा म्हणजे झालें."

काका म्हणाले, "हें तर खोटे बोलण्यापेक्षांहि भयकर. एक वेळ खोटे बोललेलें पत्करलें, परंतु खोट्यावर खऱ्याचा मुलामा चढवून बोलणें, अत्यत पापजनक होय. प्रायश्चित्त घेण्यास सागणारे तुम्ही, असें खोटे बोलण्याची सल्ला मला कशी देता, याचेच आश्चर्य वाटतें! सत्कृत्याबद्दल जगन्नाथाला प्रायश्चित्त देणे हें जर तुम्हाला योग्य वाटत असेल, तर तुमच्या पक्तीचा लाभ न होणें हेच कोणीहि सुज्ञ आपलें भाग्य मानील."

गगाधर दीक्षित इतका वेळ स्वस्थ बसून होते. त्याना नारायणकाकाचे हे म्हणणें रुचलें नाहीं. ते म्हणाले, "काका, हा केवळ आपल्या धर्मशास्त्राचा तुम्ही अपमान करीत आहा. नाहीं तरी जगन्नाथाचे आचरण आम्हाला पूर्वीपासून पसंत

नाहीं. मराठे, कुणबी वगैरे शेतकऱ्याच्या सहवासात ब्राह्मणानें आयुष्य घालविणें हे अत्यत अनुचित होय."

नारायणकाका म्हणाले, "अथवा ब्राम्हणाचें हे कर्तव्यहि असेल! दीक्षित, ज्ञानदान आणि त्याग हींच ब्राम्हणांचीं दोन प्रमुख कर्तव्यें होत. जगन्नाथानें या दोन कर्तव्यासाठीं आपलें सर्व तनमनधन खर्च करण्याचा निश्चय केला आहे ज्या ऋषींनीं कृषिशास्त्र निर्माण केलें, ते ऋषी ब्राह्मणच होते ना? कालाच्या परिस्थितीप्रमाणें जगन्नाथ हेंच कृषिशिक्षण आपल्या दरिद्री व अज्ञ बाधवाना देत आहे. आज अशी अनेक कर्तव्ये आहेत आणि तीं ब्राह्मणानी सोडल्यामुळेंच त्याचें उच्चस्थान भ्रष्ट होऊ लागलें आहे. धर्म, शास्त्र आणि रूढि याच्या आकुन्चित व भ्रामक विचाराच्या बधनांनीं बांधून घेऊन ब्राह्मणवर्ग लोभी व परदास्योत्सुक झाल्यानेंच ब्राह्मणाचें महत्वहि कमी झालें आणि त्याचे तेजहि नाहीसें होत चाललें आपल्या अज्ञ बाधवाच्या स्पर्शानें तुम्हाला विटाळ होतो, आणि अत्यत नीच अशा 'नावाच्या' ब्राह्मणाकडून चारदोन रुपये दान घेताना मात्र तुमच्या हाताला काळा डाग पडत नाहीं? दीक्षित, निस्पृहपणा आणि त्याग हींच ब्राह्मणाची खरी लक्षणे होत शुचिर्भूतपणा हाहि पाहिजे, परतु 'विटाळ विटाळ' म्हणून कर्तव्याची हेळसाड करणें आणि आपल्याच बाधवाबद्दल नसता तिरस्कार दर्शविणे, हें नुसत्या ब्राह्मणत्वाचेच नव्हे, तर मनुष्यत्वाचेंहि लक्षण नाही. आम्ही नुसते ब्राह्मणत्व साभाळून चालणार नाही, तर त्याबरोबर मनुष्यत्वहि साभाळले पाहिजे तुम्हाला एवढें सागण्याचे मला काही कारण नव्हते, पण ओघाने विषय निघाला म्हणून बोललो, त्याबद्दल क्षमा करा"

विठ्ठलराव म्हणाले, "काका, तुमचें म्हणणें खरोखर विचार करण्यासारखे आहे, परतु ते या शास्त्रीपडिताना कसें पटणार? पूर्वपरपरा कायम ठेवावी एवढेंच याना माहीत."

शामभट म्हणाले, "वाडवडिलानीं जे मार्ग घालून ठेवले आहेत, त्याप्रमाणें वागणें हेंच आम्हांला आमचे कर्तव्य वाटतें जगन्नाथ त्याचा नातू असल्यामुळें त्याचे अपराध त्याना स्पष्ट दिसत नाहींत. आम्हास तर जगन्नाथाचे प्रत्येक कार्य ब्राह्मणधर्माविरुद्ध असे वाटते आणि म्हणून त्यानें प्रायश्चित्त घेतलेंच पाहिजे"

गगाधर दीक्षित म्हणाले, "काका, आमचें म्हणणें कांहीं अन्यथा नाहीं. तेव्हा तुम्हीहि हट्ट धरण्यात काहीं अर्थ नाहीं. प्रायश्चित्त देण्यांत पाप नसून पुण्यच आहे."

नारायणकाका म्हणाले, "अशा प्रकारानें पुण्य मिळविणें मला प्रशस्त वाटत नाहीं. याचा अर्थ इतकाच दिसतो कीं, येनकेन प्रकारेण जगन्नाथाला अपक्त करण्याचा तुमचा विचार दिसतो. तेव्हां तुम्हाला समजुतीच्या चार गोष्टी सांगण्यात तरी अर्थ काय ? जगन्नाथाबद्दल तुम्हाला काहींहि वाटो, पण माझी पक्की खात्री आहे कीं, तुमच्यासारख्या ब्राह्मणापेक्षां तो शतपट शुचिर्भूत आहे. तो जेव्हां तुरुगांतून आला, तेव्हा त्याच्या चरणावर मस्तक ठेवून तुम्ही पावन व्हावयाला पाहिजे होतें. आमच्या राष्ट्राच्या हल्लींच्या विपन्न स्थितींत ज्यानें तेजस्वितेचें उदाहरण तरुणांना घालून दिलें आणि त्यासाठीं कष्ट सोसले त्या पतितोद्धारकाला पतित ठरविण्याचा अधिकार तुम्हाला खचित नाही. ही प्रायश्चित्ताची गोष्ट सुचविण्यात तुमचा उद्देश चागला असो वा वाईट असो, पण मला कांहीं ती मान्य करता येत नाहीं. तुम्ही खुशाल आम्हा सर्वांना अपक्त ठरवा!"

यानतर सगळेच थोडा वेळ स्तब्ध होते. नंतर विठ्ठलराव म्हणाले, "बरे तर, येतो आम्ही. तुम्हां गावकऱ्याचें आपसात तटाभाडण नसावें, एवढ्यासाठीं मी ही खटपट केली तिला यश आलें असते, तर मला मोठे समाधान वाटलें असते!"

काका म्हणाले, "काय करणार ? माझाहि नाइलाज आहे. कारण नसता प्रायश्चित्त घेण्याचा परमेश्वराचा हुकूम नाहीं नाहीं तर मींदेखील तुम्हाला नाखुष केलें नसते."

इतकें बोलणें झाल्यावर तिघांनीं काकांना नमस्कार केले आणि ते तेथून दुसरीकडे गेले. त्याच दिवशीं गांवांतल्या श्रीराममदिरांत ग्रामस्थ ब्रह्मवृंदाची सभा भरून जगन्नाथाला अपंक्त ठरविण्यांत आलें! या सभेला अर्थात् फार थोडे ब्राह्मण जमले होते व जे जमले होते, त्या सर्वांचे खिसे विठ्ठलरावांकडून बरेच जड झाले होते, हें निराळें सांगावयाला नको.

जगन्नाथाच्या या बहिष्कारासंबधानें गावांतल्या लोकांनाहि विशेष कांहीं वाटलें नाहीं. विठ्ठलराव आणि त्यांच्या भोवतीं नाचणारीं भटेभिक्षुकें यांच्यासंबधानें गांवांत कोणाच्याहि मनांत आदरभाव नसल्यामुळें त्यांच्या या उपद्व्यापाकडे कोणी विशेष लक्ष दिलें नाहीं. विठ्ठलरावांनीं जगन्नाथाला बहिष्कृत केलें होतें, असें म्हणण्यापेक्षां त्यांनींच आपणास कांहीं भटभिक्षुकांसह बहिष्कृत करून घेतलें होतें, असें गांवांतल्या एकंदर परिस्थितीवरून म्हणणें बरोबर होय. स्वत जगन्नाथ व त्याच्याचप्रमाणें जे थोर प्रकृतीचे होते, त्यांना विठ्ठलरावांच्या या कृतीबद्दल

कांहीच वाटलें नाहीं. पण जगन्नाथाची आई यमुना हिला मात्र त्याचा फार राग आला. ते अद्यापि पुण्यास गेले नसून आपल्या घरींच आहेत, असें पाहून यमुना मुद्दाम सत्यभामेकडे गेली. वेळ साधारण चार साडेचार वाजण्याची असून पुंडलिकाच्या घरीं जगन्नाथ व पुंडलीक शेतीच्या धंद्यासंबधाचीं कांहीं पुस्तकें वाचीत बसले होते. सत्यभामाहि ओसरीवर एका बाजूला बसून कापसाच्या वाती करीत होती. इतक्यांत रागानें फणफणत व मोठ्यानें गर्जना करीत यमुनेनें घरात प्रवेश केला. "सत्यभामा, पाहिलास का तुझ्या दिराचा प्रताप? स्वतःचें आचरण घाणेरडें असतांना हा दुसऱ्यांना जातीबाहेर टाकायला निघाला आहे म्हणे जगन्नाथ अर्पक्त, पण म्हणावें, मेल्या जगन्नाथाच्या नखाची देखील तुझी योग्यता नाहीं तो आणि हे गांवांतले भामटे भिक्षुक, मेले कुत्र्याच्या मोतानें मरतील! मेल्याना महाराचे देखील हात लागणार नाहींत! महारांनीं देखील याचा विटाळ मानला पाहिजे इतके मेले नीच आहेत! सत्यभामा, तुझा दीर श्रीमत असेल, तर त्याला म्हणावें आपली श्रीमती चुलींत नेऊन घाल, पण हा श्रीमतीचा डौल आम्हाला दाखविण्याचें कारण नाहीं. दारू पिता पिता आणि लांच खाता खाता मेल्याचा सगळा जन्म गेला आणि हा आता दुसऱ्याला प्रायश्चित्ते द्यायला निघाला आहे. जसा शकराचार्यांचा अवतार! मेल्याच्या तोंडावर महार थुकला, तर त्यालादेखील विटाळ व्हावयाचा!"

यमुनेचा हा रागाचा फणफणाट पाहून सगळेच स्तभित झाले! पलीकडच्या घरात विठ्ठलराव बसलें होते, त्याच्याहि कानावर हे शब्द गेले नाहींत असें नाही. त्याना यमुनेचा खरोखरच फार राग आला, परंतु या वेळीं तिच्या समोर जाऊन तिला प्रत्युत्तर देण्याचें मात्र त्यांना धैर्य झालें नाहीं. आईचा हा राग पाहून जगन्नाथाला हंसूच आलें. तो म्हणाला, "आई, उगीच का वेड्यासारखा संताप करून घेतेस? आपण असें समजू कीं, त्यानाच आपण जातीबाहेर टाकलें, म्हणजे झालें!"

यमुनेचा संताप अद्यापि निवाला नसल्यामुळें ती म्हणाली, "मेल्यांना महारानीं देखील आपल्या पक्तीला घेतां कामा नये! यांच्या स्पर्शानें त्यांनादेखील कमीपणा यावयाचा! आणि खरोखर ते यांच्यापेक्षां पुष्कळ बरे! त्यांना न्याय-अन्याय, देवधर्म कांहीं तरी असतो; पण हे नीच मेले मांग, लोकांचे गळे कापायला निघाले आहेत. म्हणे आम्ही ब्राह्मण! ब्राह्मणांच्या पायपोसाची तरी यांना योग्यता आहे?"

सत्यभामा म्हणाली, " यमूताई, तूं उगीच संताप करून घेते आहेस. भाग्रो-जींच्या भोंवतीं चार दोन रुपड्यांसाठीं शेंपूट हलविणाऱ्या लोभी भटांनीं या कांहीं तरी पोरचेष्टा केल्या आहेत. त्याला एवढें महत्त्व कसलें देतेस ? "

यमुना रागानें म्हणाली, " लोकाचीं घरें जाळावयाच्या या चांगल्या पोरचेष्टा ! मेल्याना उद्योगधंदे नसतील, तर हे असले उपद्व्याप करण्यापेक्षां भीक कां मागत हिंडत नाहींत ? तुझ्या त्या दिराला सरकारी अधिकाराची मोठी घमेंड असेल; पण म्हणावें, देव काहीं झोंपीं गेला नाहीं. त्यानें पापपुण्याचा सगळा हिशोब ठेवला आहे. किडे पडतील किडे ! " अशी बडबड करीत यमुना तशीच परतली व आपल्या घरीं गेली. इकडे जगन्नाथ आणि पुंडलीक याना मात्र हंसतां हसतां पुरे झालें. जगन्नाथाला बहिष्कृत करण्याच्या कार्यांत विठ्ठलराव यशस्वी झाले होते हें खरें, परंतु त्याच्या कानांवर यमुनेचे वरील शब्द स्पष्ट पडल्यामुळें त्याचें मन कचरल्यावाचून राहिलें नाही. आता इतकें खरें कीं, ही विषण्णता भावी वैभवाच्या आशेनें लवकरच नाहींशी झाली आणि त्या आशेंत दंग अस-तांनाच त्यानीं जगन्नाथाला गांवांतल्या सगळ्या ब्रह्मवृंदानीं जातिबहिष्कृत केल्याची मोठी रम्य हकीकत नानासाहेबांना कळविली. एकट्या सुंदरपूरचेच काय, पण दुसरे अनेक ठिकाणचे ब्राह्मण या सभेला आले होते, असाहि मजकूर त्या पत्रांत होता. सारांश पांचसहा भटांच्या या प्रचंड सभेचा वृत्तांत विठ्ठलरावांच्या 'रिपोर्टरी' लेखणीनें जेव्हां नानासाहेबांच्या हातांत पडला, तेव्हां त्यांना सहजच मोठा आनंद झाला व आपल्या लीलेचे पंकांत रुतलेले पाय मोकळे होऊन आज ती खऱ्या व पवित्र सोपानश्रेणीच्या पायऱ्या चढण्यास स्वतंत्र झाली, असें त्यांना वाटलें.

---

## प्रकरण बारावें.

माघ महिना बहुतेक संपत आला होता. वाळकेश्वरावरील नानासाहेबांच्या बंगल्याभोंवतालचा बाग आतां मोठा बहारदार दिसत होता. दिवसेंदिवस या बागेवर लीलेचें विलक्षण प्रेम जडत चाललें होतें. एकादें क्षुल्लक रोपडें कोठें आहे, हेंदेखील तिच्या लक्षांत राहिलें होतें. तिच्या मनोभूमीवर एक वेळ असेंच संसा-रोद्यान तयार झालें होतें, आणि हें उद्यान फलपुष्पभारांनीं अलंकृत होईल, अशी तिला मोठी आशा होती; परंतु भवितव्यतेच्या मेघांनीं या उद्यानावर अद्यापि

वर्षाव न केल्यामुळें तें सगळें उपवन जळून जाऊन तिची मनोभूमि रखरखीत वाळवंटाप्रमाणें झाली होती. अशा रीतीनें अंतर्सृष्टि शून्य झाल्यामुळेंच कीं काय कोण जाणे, लीला आतां बाह्य सृष्टींतल्या सौंदर्यावर प्रेम करूं लागली होती. नाहीं तरी नानासाहेबांच्या प्रासादतुल्य बगल्यांत लीलेशीं प्रेमानें वागणारें असें चद्रभागेशिवाय दुसरें कोणीहि नव्हतें. तेव्हां अशा स्थितींत तिनें सृष्टिदेवतेनें निर्माण केलेल्या बधुभगिनींशीं सख्य जोडण्याचा प्रयत्न करावा आणि प्रकृतिदेवीनेंहि तिला जवळ घेऊन गोंजारावें, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. नाहीं तरी मनुष्याचें उदास मन, शांत व स्निग्ध करण्यास सृष्टिदेवताच काहीं अशीं समर्थ आहे. केव्हां शांत तर केव्हां प्रचड लाटांनीं प्रलयस्वरूप भासणारा समुद्र उच, नीच व वेड्या वांकड्या पसरलेल्या पर्वतश्रेणी, पर्वतांवरून वहात येणारे मोठे जलौघ, अरण्यें आणि वृक्षराजी वगैरे सृष्टीचे अलंकार आपण नित्य पहातों, परंतु या नित्यत्वांतहि प्रत्यहीं नवीनपणा दृष्टीस पडतो. त्याच्या दर्शनानें नित्य नवा आनंद अनुभवास येतो आणि कोणीहि दुःखी कष्टी येवो त्याच्याशीं समानभावानें व अकृपणतेनें सृष्टि वागत आहे, असें आपण पहातों लीलेलाहि या बागेसंबंधानें तोच अनुभव आला. बागेंतल्या लहानशा रोपड्यापासून तों मोठाल्या वृक्षापर्यंत सर्व आपणाशीं सहानुभूतीनें व प्रेमानें वागत आहेत, असें तिला वाटत होतें. ते आपल्या शीतल व रम्य हातानीं जणूं आपलें रुक्ष अतःकरण प्रफुल्ल करण्याचा प्रयत्न करीत आहेत, अशी तिची समजूत झाली होती. तेव्हां बागेंतल्या या वृक्षवेलींबरोबर हितगुज करण्यांत लीलेचा पुष्कळसा वेळ जावा, हें अगदीं साहजिक होय.

घरांत चालणाऱ्या एकदर समाजोन्नतीच्या कार्यांचा तिला मनापासून कंटाळा आला होता. त्यांत आणखी जगन्नाथाला एक महिन्याची शिक्षा झाली, हें तिला समजल्यापासून तर तिच्या मुखावरील उदासीनता अधिकच वाढली होती. ज्यानें आपली विटबना टाळली, त्याच्यावर असा प्रसंग यावा, याबद्दल तिच्या मनाला केवढा आघात झाला असेल, याची कल्पनाहि करतां येणार नाहीं. या वेळीं तिच्या सांतवनास चद्रभागा होती, म्हणून बरें, नाहीं तर त्या विचारानें तिची अवस्था वेड्यासारखी झाली असती. जगन्नाथाच्या शिक्षेचे दिवस लीला बरोबर मोजीत होती. तो तुरुंगांतून सुटला, तरी त्याची आपली भेट होणार नाहीं, हें तिला माहीत होतें, तथापि ‘ भागू, ते आणखी आठ दिवसांनीं सुटतील, नाहीं ? भागू, ते सुटले असतील, नाहीं ? ’ असें भागूला लीला मारखी विचारीत होती. जगन्नाथाची शिक्षा संपून कांहीं दिवस गेल्यानतर पुन्हां एकदां घरांत आनंदाचें

साम्राज्य माजलेलें लीलेच्या दृष्टीस आलें. नानासाहेब, वसंत आणि त्यांचे आणखी चार दोन स्नेही असे एकाद्या प्रसगीं विशेष प्रफुल्ल झालेले दिसले म्हणजे लीलेचा चेहरा अधिकच कोमेजून जाई. कांहीं तरी विशेष घडलें आहे, हें खचीत आणि तें आपल्याच सबधाचें असलें पाहिजे हेंहि तितकेंच खरें, अशी लीलेची पक्की भावना झालेली असल्यामुळें लीला साहजिक त्या चार दोन दिवसांत विशेष चिंतामग्न झाली होती.

सायकाळीं चार वाजण्याच्या सुमारास लीला व चद्रभागा रोजच्याप्रमाणें बागेंत जाऊन जिकडे कोणी येणार नाहीं, अशा ठिकाणीं बसल्या. लीलेला बरें वाटावें म्हणून चद्रभागा एक गोड गाणें म्हणत होती. एक तर चंद्रभागेचा आवाज फार गोड आणि शिवाय तें गाणें लीलेच्या परिस्थितीला अनुलक्षून असल्यामुळें तें ऐकण्यांत लीला साहजिक गुग झाली. तें गाणें संपतांच लीला म्हणाली, " भागू, हीं असलीं गाणीं म्हणून तू काय मला वेड लावणार आहेस, होय ? "

चंद्रभागा म्हणाली, " छे ताईसाहेब ! त्या गाण्यांत एवढी जादू नाहीं आणि माझ्या आवाजांतहि एवढी मोहकता नाहीं; पण तुम्हांला वेड लागेल तर बरें होईल, असें मलादेखील आता वाटू लागलें आहे. म्हणजे त्या मानापमानाच्या कल्पनेनें तुम्हीं आपल्या ससारसौख्याला तरी आचवणार नाहीं. "

त्या चिंतामग्न स्थितींत एक दीर्घ श्वास सोडून लीला म्हणाली, " चद्रभागा, स्वतःचा मान सांभाळण्यासाठीं मी अशा रीतीनें वागत्यें, असें तू समजू नकोस. त्यांचा मान सांभाळावा म्हणून मी एवढे कष्ट सोसत्यें. देवासारखे ते थोर ! मी नुसती हाडामांसाची पुतळी ! त्यांच्याशीं अभिमानानें वागावयाची माझी योग्यता तरी कोठें आहे ? "

चद्रभागा हंसत हंसत म्हणाली, " तर ताईसाहेब, मी तुम्हांला एक युक्ति सांगतें. प्राणप्रतिष्ठा केली, म्हणजे काष्टपाषाणाच्या मूर्तींनादेखील देवपणा येतो. तुम्हीं तर चांगल्या हाडामांसाच्या. ते जसे देव, तसें तुम्हांला देवी व्हावयाला किती वेळ लागणार ? तेव्हां प्राणप्रतिष्ठा करावयाला त्या सुंदरपूरच्या पुरोहिताला बोलावूं का ? "

" पण आमच्यासारख्या धर्मकर्मभ्रष्ट सुधारकांच्या घरांत ते तुझे पुरोहित आले, तर त्यांना नाहीं का कमीपणा यावयाचा ? लोक त्यांना नांवें ठेवतील. "

" ठेवलीं तरी त्याची ते पर्वा करणार नाहींत. असल्या पुतळीची प्राणप्रतिष्ठा करण्यासाठीं, ते वाटेल तो अपमान सोसतील आणि वाटेल ते कष्ट सोसतील ! "

" कोणी सांगावें ! कदाचित् सोसतीलहि, पण मी त्याना एवढा त्रास देण्यापेक्षा अशीच हाडामांसाची पुतळी राहिलेली काय वाईट ? "

" त्यांतहि काहीं वाईट नाहीं. या असल्या प्राणप्रतिष्ठाविहीन पुतळीसाठीं देखील कित्येक हाडामांसाचे पुतळे वेडे झाले आहेत. मग आणखी प्राणप्रतिष्ठेचा खटाटोप तो कशाला ? वा ! बिचाऱ्याला शभर वर्षे आयुष्य आहे. नाव घेताच हजर ! ताईसाहेब, तो पहा एक तुमच्याचसारखा हाडामासाचा पुतळा आला. खेळा आता खुशाल त्याच्याबरोबर "

बागेतील बंगल्याच्या दरवाजाकडे पाहून लीला तिरस्कारानें म्हणाली, " उ ! बॅरिस्टर वसंतराव वाटतें ! ही पीडा या वेळीं इकडे कशाला येत आहे, कोणाला माहीत ? "

भागू म्हणाली, " स्वारी मोठी खुशींत दिसते. पोशाकहि पण खूप चापूनचुपून केला आहे. जेव्हा पहावे तेव्हा नवरदेवाप्रमाणें सजून तुमच्याकडे येत असतो. तोंडांत चिरूट पहा किती लांब आहे तो ! "

" त्याला वाटतें मी साहेबाच्याच पोटचा आहें ! मनुष्यत्वाचे सगळे गुण जणू नटण्याथटण्यांतच साठविले आहेत, असें त्याला वाटतें ! "

लीलेचें हें वाक्य सपून एक मिनिट होते न होतें, तोंच ज्या लताकुंजात लीला व चद्रभागा बसल्या होत्या, त्या कुजासमोर बॅरिस्टर वसतरावाची स्वारी येऊन उभी राहिली. काहीं झालें तरी या बगल्यात वसतराव म्हणजे प्रसिद्ध व्यक्ति आणि आपण नौकर, तेव्हा त्याला मान दिला पाहिजे असा विचार करून चद्रभागा लीलेच्या शेजारून उठली व मर्यादेनें उभी राहिली. वसताचा चेहेरा आज नेहमींपेक्षां विशेष प्रफुल्ल दिसत होता. त्याच्या दोन्ही दंतपक्ति मधून मधून स्पष्ट दिसत होत्या. यावरून त्याच्या पोटात त्याचा आनद मावेनासा झाला होता, हें उघड होय. घाईघाईनें हातांत चिरूट घेऊन व धुराचा फवारा सोडून हसत हंसत वसंत म्हणाला, " लीला, मी तुला शोधून शोधून दमलों ! अखेरीस तूं इथें सांपडलीस ! मी मोठ्या आनंदाची गोष्ट सांगण्यासाठीं तुझ्याकडे आलों आहें. मला काय बक्षीस देशील ? "

वसंताचे शब्द ऐकतांच लीलेचें मन कचरलें. वसंताची आनंदाची गोष्ट म्हटली म्हणजे लीलेला ती अत्यंत अशुभ व तापदायक असावयाची, हें तिला माहीत असल्यामुळें लीलेच्या हृदयांत वसंताच्या त्या शब्दांनीं अनेक शंकाकुशंका एकाच

वेळीं डोकावूं लागल्या. कांहींशी व्याकुलतेनेंच ती म्हणाली, " वसंतराव, एवढी कसली आनंदाची बातमी तुम्हीं आणली आहे ? "

जवळच असलेल्या एका आंब्याच्या झाडाच्या बुंध्याभोवतीं लांकडी बैठक तयार केली होती. तीवर मोठ्या ऐटीनें बसून वसंत म्हणाला, " लीला, खरोखरच मोठ्या आनंदाची गोष्ट अत्यंत सुखाची बातमी ! तूं स्वतंत्र झालीस ! तू आता पाहिजे तें करावयास मोकळी झालीस ! हिंदुसमाजांत स्त्रियांना स्वातंत्र्य नसल्यामुळें या समाजाची कोण दुर्दशा होत आहे ! पण लीला, त्या पुराणमतवादी समाजाशीं तुझा आता कोणताच संबंध राहिला नाही ! तू आतां स्वतंत्रपणें वागण्यास मोकळी झालीस ! "

वसंताच्या या वाक्यांनीं एक अगदीं अशुभ कल्पना लीलेच्या मनांत उभी राहिली. त्या कल्पनेनें तिचें मन साहजिकच अस्थिर झालें. तरी स्वतःची मनःस्थिति तशीच झाकून ती म्हणाली, " परदास्याच्या पंकात गुंतलेल्या पुरुषांना म्हणावे, अगोदर तुम्ही स्वतंत्र व्हा, देशाचा नी समाजाचा उद्धार करा आणि मग स्त्रियांच्या गळ्याला बांधलेलीं दावीं तोडण्याच्या उद्योगास लागा ! परदास्यात ज्यांचे पाय रुतले आहेत, त्यानीं आपल्या स्त्रियांना स्वातंत्र्य देण्यात काय फायदा ? शिवाय त्यांच्या या परवशतेत इतरांना स्वातंत्र्य देण्याचा अधिकार तरी त्यांना कितीसा पोहोंचतो ? वसंतराव, ही केवळ स्वातंत्र्य या शब्दाची चेष्टा आहे. हिंदुसमाजातल्या स्त्रिया पारतंत्र्यात आहेत, ही कल्पना तरी तुमच्या चित्ताला कशी शिवते कोणाला माहीत ? हीच का तुमची आनंदाची गोष्ट ? "

लीलेच्या या भाषणानें वसंत कांहींसा हिरमुसला झाला. तरीही तसे न दाखवितां तो म्हणाला, " तसें नाहीं लीला. माझ्या म्हणण्याचा तू विपर्यास केलास. मी खरोखरच तुला आनंदाची गोष्ट सांगणार आहें. लीला, तुला तें तुझें लहानपणचें लग्न—छेः ! लग्न कसलें—तो बाहुलाबाहुलीचा खेळ—आठवत असेलच ! त्याला तू लग्न म्हण, नाहीं तर बाहुलाबाहुलीचा खेळ म्हण, पण ज्यामुळें तुझे हातपाय बांधून टाकले होते आणि तुझ्या सुखावर पाणी पडलें होतें त्या आसुरी विवाहबंधनांतून तूं मुक्त झालीस ! आतां तुला तुझ्या इच्छेप्रमाणें वाटेल त्याच्याबरोबर पुन्हां विवाह करतां येईल ! लीला, आहे कीं नाहीं, आनंदाची बातमी ?"

वसंताच्या या प्रश्नाला लीलेनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. विस्मय आणि संताप या दोहोंमुळें तिची अवस्था चमत्कारिक झाली. वसंताला वाटलें, लीलेला या

बातमीनें विशेष आनंद झाला आणि त्यामुळें तिची अशी अवस्था झाली असावी. तो अधिक हर्षानें म्हणाला, " लीला, तूच काय, पण दुसऱ्या अनेक तरुणी लहानपणीं लग्न झाल्यामुळें नावडणाऱ्या पतींबरोबर दुःखानें दिवस कंठीत आहेत, पण आतां तुझ्या द्वितीय विवाहाची हकीकत जेव्हां त्यांना कळेल, तेव्हां त्यादेखील असल्या आसुरी विवाहाच्या कालपाशातून मुक्त होतील आणि नवे संसार थाटतील! स्वर्गांतले देवदेखील मग आमच्या समाजाचा हेवा करूं लागतील! "

लीला रागानें व कंपितस्वराने म्हणाली, " वसंतराव, तुम्ही हें काय सांगतां आहां? असें होणें केव्हां तरी शक्य आहे का? "

लीलेच्या या प्रश्नानें वसंताला मोठी आशा उत्पन्न झाली. तो म्हणाला, "लीला! असें होणें अगदीं शक्य आहे. आपल्या समाजात सामाजिक प्रगतीसाठीं अहर्निश खटपट करणारे महर्षि यज्ञत्यागेश्वर यांनीं तर मोठ्या आनंदानें या विवाहाला संमति दर्शविली आहे. असा विवाह होण्यास कोणतीहि हरकत नाहीं, असा धर्मशास्त्राचा आधार आहे त्यांचें तें युक्तिसंगत म्हणणें आमच्या समाजाच्या सभासदांनाच काय, पण मोठमोठ्या शास्त्रीपंडितांनाहि पसंत पडलें आहे! 'स्त्रीचा पति परागंदा झाल्यास, संन्यासी झाल्यास, क्लीब असल्यास किंवा त्याच्या ज्ञातीनें त्याला जातीबाहेर ठेवल्यास त्याच्या स्त्रीला दुसऱ्याबरोबर विवाह करतां येतो' असें शास्त्रवचन असल्याचें स्वामी यज्ञत्यागेश्वर यांनीं सर्वांच्या निदर्शनास आणलें आहे! "

लीलेच्या हृदयांत हळू हळू प्रकाश पडूं लागला. ती म्हणाली, " वसंतराव, तुम्ही म्हणतां हें अगदीं खरें आहे? "

" लीला, निदान मी तुझ्याशीं तरी खोटें बोलणार नाहीं! "

इतका वेळ लीला लताकुंजांत ठेवलेल्या बांकावर नीट बसून बोलत होती, पण आतां तिला संतापानें व दुःखानें तसें बसणें अशक्य होऊन बांकाच्या पाठीवर तिनें आपलें अंग टाकून दिलें आणि शून्य दृष्टीनें आकाशाकडे पाहून ती म्हणाली, " वसंतराव, मला आतां थोडा वेळ एकटें बसूं द्याल, तर फार बरें होईल! "

वसंताला हीं सगळीं प्रेमचिन्हें वाटलीं! लीलेच्या हृदयांत आपणाविषयींच्या अनुरागानें यापूर्वीच प्रवेश केला असल्यामुळें आज एकदम ही बातमी ऐकून लीलेची अशी स्थिति झाली असावी. ती आपणांस येथून जाण्यास सांगते, याचा

अर्थहि तें प्रेमच. ही जा म्हणून म्हणते, पण जाणें बरें नव्हे. आनंदातिशयानें क्वचित् प्रसंगीं वाईटही परिणाम होतो, असा दूरवर विचार करून वसंत तेथेंच थांबला; इतकेंच नव्हे, तर लीलेविषयीं आपल्या मनात किती प्रेम वसत आहे, हें व्यक्त करण्यास हीच संधि योग्य आहे असा विचार करून गंभीर पण हास्य-प्रद स्वरानें वसंत म्हणाला, " लीला, या आनंदाच्या बातमीनें तुझी अशी स्थिति होणें साहजिक आहे. सांग पाहू आता आनंदाची बातमी मी तुला सांगितली कीं नाही ? आता याबद्दल तू मला कोणतें बक्षिस देणार ? "

असें म्हणून वसंत लीलेच्या जवळ गेला आणि तिची देहलतिका बांकावरून उचलून सावरावी या उद्देशानें आपले दोन्ही बाहू पसरून तिला म्हणाला, " लीला, मी तुझें हृद्गत समजलों ! माझ्या प्राणाचा प्राण ! माझ्या हृदयाची देवता—"

बाकीचे शब्द वसंताच्या तोंडातल्या तोंडातच राहिले. डवचलेल्या नागिणी-प्रमाणें चवताळून लीला संतप्तस्वराने म्हणाली, " खबरदार ! दूर व्हा वसंतराव ! काय म्हणून तुम्ही माझ्याशीं असें असभ्य बोलता ? माझ्या शरीराला स्पर्श कर-ण्याला तुम्ही कसे धजता ? मी विवाहित स्त्री असून माझे पति जिवंत आहेत, हें तुम्हाला माहीत आहे ना ? तुमच्या आगीं जर थोडे फार मनुष्यत्व असेल, जर काहीं शिष्टाचार तुम्हाला माहीत असेल, कुलीन स्त्रीचा मानमरातब कसा ठेवावा हे जर तुम्हाला कळत असेल, तर मी तुम्हाला बजावून सांगते कीं यापुढें तरी माझा असा अपमान करू नका !"

लीलेचे हे शब्द ऐकून वसंत विस्मयानें व निराशेने दोन हात मागें सरकला ! इतके दिवस ज्या आशेला त्याने हृदयात स्थान दिले होते, ती लीलेच्या या माऱ्यानें वितळून गेली ! या हताश स्थितींत लीलेचा त्याला रागदेखील आला. तिच्या मनांत अजूनहि पूर्वींचे कोते विचार व काहीं भ्रामक कल्पना आहेत आणि त्यामुळें ती आपल्या खऱ्या कल्याणाला मुकत आहे, असेंहि त्याला वाटलें ! लीलेकडे निरखून पाहून तो म्हणाला, " हे काय लीला ? नानासाहेबांनीं दिलेल्या शिक्षणाचा परिणाम हाच का तुझ्या मनावर झाला आहे ? मी खरोखरच सांगतो कीं, तू त्या पूर्वीच्या विवाहबंधनांतून मुक्त झाली आहेस ! कायदा आणि शास्त्र यांनीहि तो विवाह रद्द ठरविला आहे. शिवाय, तुझे वडील तुझ्या अकल्याणाची गोष्ट करतील, असें तुला वाटतें तरी कसें ? "

लीला रागानें फणफणत म्हणाली, " बाबांची मति भ्रष्ट झाली आहे, म्हणूनच ते स्वतःच्या मुलीची अशी विटबना करण्यास तयार झाले आहेत !"

" विटबना ! यात कसली विटबना ? लीला, तू नीट विचार कर. लहानपणीं तू अगदीं अज्ञान असतांना झालेलें लग्न, हें कांहीं खरें लग्न नव्हे ! तो आसुरी विवाह होय ! तो केवळ बाहुलाबाहुलीचा खेळ ! "

" तुम्हांला असेल तो बाहुलाबाहुलीचा खेळ ! पण स्वत ला इतके हेय समजण्यास मी तयार नाहीं ! बाहुलाबाहुलीच्या खेळानें माझें कल्याण झालें कीं अकल्याण झालें, तें मला तुमच्यापेक्षा नी बाबापेक्षा अधिक समजतें. स्वत चे हित स्वत लाच अधिक कळतें ! स्त्रियांचे जीवित म्हणजे या हातांतून त्या हातात खेळावयाचें खेळणें नव्हे ! तुम्हाला तो विवाह आसुरी वाटो, पण त्या विवाहानें मी त्याच्याशीं जन्मजन्मांतरीं पत्नीच्या नात्यानें बद्ध झालेली आहें ! "

लीला सगळयाशींच अगदीं मुग्धपणें वागत असल्यामुळें तिच्या मन स्थितीचा टाव कोणासच लागलेला नव्हता. स्वत वसतहि भ्रमांतच होता, आणि या भ्रमातच त्यानें आपल्या मनोराज्याचा शक्य तितका मनोरम डोलारा उभारला होता. पण आज एकाएकीं त्यावर लीलेनें कुठाराघात केल्यामुळें बिचाऱ्या वसताची अवस्था मोठी चमत्कारिक झाली. निराशा, सताप आणि विस्मय अशा मिश्रविकारयुक्तस्वरानें तो म्हणाला, " तू हें काय म्हणतेस लीला ? खरोखरच तीं विवाहबधनें तुला इतकीं बळकट वाटतात ? असभ्य खेडवळात वावरणाऱ्या त्या अशिक्षित जगन्नाथावर खरोखरच तू एवढें प्रेम करतेस ? मोठे आश्चर्य म्हणावयाचे ! "

लीला म्हणाली, " तुम्हाला आश्चर्य वाटत असेल, पण मला यांत काहींच वाटत नाहीं ! ते अशिक्षित असतील, असभ्य लोकात वावरत असतील, पण ते मनुष्य आहेत. त्यांच्या अगीं मनुष्यत्व ओतप्रोत आहे ! पोषाकानीं नटलेले ते हाडामासाचे पुतळे नाहींत ! स्त्रीच्या दृष्टीनें ही काय कमी गौरवाची गोष्ट आहे ? तुम्हाला ते तिरस्कारार्ह वाटत असतील, परंतु कोणत्याहि स्त्रीला असला पति पूजार्हच वाटेल ! ज्याला पूर्ण मनुष्यत्व लाभलें आहे, असा पति मला मिळाला, हें मी माझें भाग्यच समजतें ! "

वसंत विद्रूपस्वराने म्हणाला, " तो मनुष्य आणि मी हाडामांसाचा पुतळा ! "

" होय ! तुम्ही नुसते नांवाचे मनुष्य आहा असें एकदां काय हजारदां म्हणेन. तुम्ही इतके अधोगामी नसतां, तर सभ्य व कुलीन स्त्रीची अशी कुचेष्टा करण्यास केव्हांहि प्रवृत्त झालां नसतां ! "

लीला कांहीं तरी वेड्यासारखें बडबडत आहे, असें दर्शविण्यासाठीं वसंत मुद्दाम मोठ्यानें हसला. तो म्हणाला, " मी एक हाडामांसाचा पुतळा असेन; पण लीला, तुझें शिक्षण, तुझी वागणूक आणि तुझें सौंदर्य या दृष्टीनें तुझ्यांत आणि त्या खेडवळ जगन्नाथांत किती अंतर आहे, याचा तूं विचार केला आहेस का ? "

" हो. बाबांनी ज्या परिस्थितींत मला ठेवलें आहे, त्या स्थितींत विचार करण्याशिवाय मला दुसरें कामच नाहीं ! विचार करूनच मी सांगते कीं, वसंतराव माझे पति मला नुसते मनुष्य नाहींत, तर देव आहेत ! देवापेक्षाहि एखादें उच्चस्थान असेल, तर तेथेंदेखील मी माझ्या पतीला बसवीन ! हृदयमंदिरांत अत्यंत पवित्र जागीं त्या देवतेची मूर्ति अधिष्ठित झालेली आहे आणि तिची पूजा एकसारखी होत आहे. ती मूर्ति तेथून काढून टाकावयाचें कोणासहि सामर्थ्य नाहीं ! परमेश्वरदेखील त्या बाबतींत असमर्थ आहे, मग तुमच्या प्रयत्नाचा तेथें पाड काय ? तुमचा समाज काय वाटेल तें म्हणो किंवा तुम्ही काय वाटेल ते म्हणा, पण मला माझे पति देवाप्रमाणें पूज्य आहेत. तुम्हाला ते लाब असले तरी मला ते माझ्या हृदयांत आहेत."

वसंत म्हणाला, " सुशिक्षित होण्याचा व सुधारण्याचा या हिंदूनीं कितीहि प्रयत्न केला, तरी तो सफल होणार नाहीं. याच्या शरिरांत पुराण-मतानुयायांचें रक्त खेळत आहे आणि ते नाहींसें झाल्याशिवाय यांना सुधारणेचा लाभ होणार नाहीं आणि तोंपर्यंत पति म्हणजे देव असलीं खुळें कायम राहणार ! " नंतर तो लीलेला म्हणाला, " लीला, तुझे हे विचार नानासाहेबांना समजले, तर त्यांना काय वाटेल ? "

लीला म्हणाली, " त्यांना कदाचित् राग येईल अथवा संतोषहि होईल. त्यांना ही हकीकत तुम्ही सांगा, म्हणजे त्यांना काय वाटतें, तें तुम्हांलाच दिसून येईल !"

असें म्हणून लीला उठली आणि तेथून तशीच आपल्या बंगल्यांत निघून गेली; चंद्रभागाहि तिच्या मागोमाग गेली. मागें वसंत एकटाच राहिला आणि आतां मात्र त्याला आकाशांतल्या शून्य पोकळींतून आपण खालीं वेगानें चाललों आहों, असें वाटूं लागलें. लीला बसली होती, त्या बांकावर तो मटकन बसला आणि कपाळावर हात आपटून घेऊन स्वतःशीं म्हणाला, " हा सगळा त्या जबलपूरच्या स्टेशनावरील मारामारीचा परिणाम ! त्या वेळीं अस्तन्या वर करून जर त्या

साहेबाशीं दोन हात केले असते, तर–पण तितकें धैर्य झालें नाहीं आणि तेवढी ताकदतरी कोणाच्या अगांत आहे ? छे ! अत्यत अशुभ वेळीं जगन्नाथाचें तेथें आगमन झालें, यांत कांहीं शंका नाहीं ! ”

असो. अशा रीतीनें आमचे साहेबबहादूर स्वत·शींच विचार करीत बसले. वसंतराव, विचार करीत बसा, पण त्याच वेळीं अगांतील कपडे मळतील बिळतील, तिकडेही लक्ष ठेवा ! अरेरे ! त्या चिरुटाची तर तुम्हाला आठवणच दिसत नाहीं ! बघा, तो विझला असेल ! जरा ओढा म्हणजे मेंदूला तरतरी येईल !

---

## प्रकरण तेरावें.



वसताला हा निराशेचा तडाखा खरोखरच असह्य झाला निराशेविषयीं अगोदरच काहीं कल्पना असली, म्हणजे ऐन प्रसगीं ती फार जाणवत नाहीं पण वसताची गोष्ट निराळी ! त्यानें प्रथमपासूनच मनात आशा बाळगिली आणि ती इतके दिवस वाढीलाहि लावली. यामुळें त्याच्यावर झालेला हा निराशेचा प्रहार त्याला फारच जाणवला तो आपणा स्वतःस फार हुषार समजत असे त्यामुळें आपल्या सारख्या सर्वगुणालकृत मूर्तीवर लीलेचे प्रेम दिवसेंदिवस जडत चाललेलें आहे, असें त्याला वाटत होते, परंतु ऐन वेळीं लीलेनें जेव्हा आपलें अत करण उघडें केलें, तेव्हा तिनें आपणास चागलेंच फसविलें, असें त्याला वाटलें. या अपमानानें जगात तोंड दाखवू नये असेंहि त्याला क्षणभर वाटले, परतु स्वभावाने तो अत्यत क्षुद्र असल्यामुळें त्याला हा अपमान सहन करणे अशक्य झालें. एक तर वाटेल तो प्रयत्न करून लीलेबरोबर विवाह केला पाहिजे अथवा तसे न झाल्यास जगात तोंड दाखविण्यास लीलेला जागा उरू नये, इतकी तिची अप्रतिष्ठा झाली पाहिजे, असें त्याला वाटूं लागलें. त्यानें आपली ही रडकथा जेव्हां विठ्ठलरावांच्या कानावर घातली, तेव्हा त्या म्हाताऱ्यालाहि मोठें चमत्कारिक झालें. मुलगा प्रेमाच्या आशेने वेडा झाला होता, तर म्हातारा वैभवाच्या आशेनें वेडा झाला होता ! पुण्यासारख्या शहरात नगरशेट म्हणून प्रसिद्धीस येऊन शिवाय कायदेकौन्सिलचे सभासद होण्याचीहि त्यानें उमेद बाळगिली होती; परंतु ‘ मूले कुठार.’ या न्यायानें पायाच ढांसळत आहे, असें पाहून विठ्ठलराव अत्यंत चिंतातुर झाले. इतक्या रंगास आलेला डाव सगळाच फसतो कीं काय, असें त्यांना वाटूं लागलें.

न जाणो, अशा स्थितींत नानासाहेबांचें मत बदलणार नाहीं, असें तरी कशा-वरून ? तेव्हां याच वेळीं आपणहि आपल्या साऱ्या आयुधांचा उपयोग केला पाहिजे असे त्यांना वाटलें व त्याप्रमाणें ते त्याच क्षणीं उद्योगाला लागले.

स्वामी यज्ञत्यागेश्वर आणि त्यांच्याच योग्यतेचे अन्य वक्ते याचीं आता या आसुरी विवाहासबधानें व्याख्यानावर व्याख्यानें होऊं लागलीं. नानासाहेब या प्रत्येक व्याख्यानास हजर असत. शिवाय नानासाहेबाच्या घरींहि अनेक विद्वान् समाजसुधारक जमून यासबधाने चर्चा चालू झाली. सामाजिक कार्यांत नानासा-हेबानीं जो पुढाकार घेतला होता, त्यासबधाने त्याचा सारखा जयजयकार होऊ लागला. स्वत नानासाहेबांचा विचारहि यामुळें अधिकाधिक दृढ होत चालला. स्त्रियाना मुबलक स्वातत्र्य मिळालेंच पाहिजे, असें म्हणणाऱ्या नानासाहेबांना आतां असें देखील वाटू लागलें कीं, जरून पडल्यास या विवाहासाठीं लीलेवर सक्तीदेखील करावयाची. हा विवाह झाला नाही, तर समाजांत आपण जो कांहीं मानसन्मान मिळविला आहे, तो सर्व नाहींसा होईल, अशी त्याना भीति वाटू लागली.

नानासाहेबान्या पुनर्विवाहित पत्नीचा आणि विठ्ठलरावाचा बराच परिचय असल्यामुळें तिच्या मार्फतहि विठ्ठलरावानीं खटपट सुरू केली. अशा रीतीनें सग-ळेंच वातावरण बदलत आहे, असें पाहून बिचारी लीला घाबरून गेली. मागे सांगितलेल्या हकीकतीला सातआठ दिवस लोटल्यावर लीला व चद्रभागा रोजच्या-प्रमाणें आपल्या खोलींत बोलत बसलेल्या असता या पुनर्विवाहित स्त्रीकडून—म्हणजे लीलेच्या सापत्न मातेकडून—लीलेला बोलावणें आलें त्याबरोबर लीलेच्या काळ-जात धस्स झाले ! काहीं झालें तरी बोलावल्याप्रमाणें गेलें हें पाहिजेच, असा विचार करून लीला आईकडे जाण्यासाठीं निघाली तेव्हा चद्रभागा ' ताईसाहेब, प्रसंग तसाच पडला तर अनुकूलताहि दर्शवा, पण उगीच तटा करू नका, मग पुढें काय करावयाचे तें पाहता येईल ' असे लीलेच्या कानाशीं पुटपुटली. भागूच्या या म्हणण्याचा विचार करीत करीत लीला आपल्या आईच्या खोलींत येऊन दाखल झाली. लीलेच्या या सापत्न मातोश्रीचें नांव विमलाबाई असें होतें, हें वाचकाना आठवत असेलच.

विमलाबाई आपल्या खोलींत आरामखुर्चीवर पडून एक पुस्तक वाचीत होत्या. लीलेला पाहतांच त्यांनी हसत हसत जवळच्या टेबलावर पुस्तक ठेवून

एक खुर्ची लीलेकडे सरकाविली आणि तीवर बसण्याविषयीं लीलेला सुचविलें. लीला बसल्यावर विमलाबाई म्हणाल्या, " लीले, तुझ्या विवाहाचा मार्ग आपोआपच मोकळा झाला म्हणावयाचा!"

लीला खिन्न स्वरानें म्हणाली, " तो कसा काय ?"

विमलाबाई म्हणाली, " म्हणजे! तुला माहीत नाहीं का ? जगन्नाथास त्याच्या लोकांनीं जातीबाहेर टाकलें!"

"का ?"

"कां काय ? अगोदरच तो कुणब्याधुणब्यांत मिळून मिसळून वागत असे, त्यांत आणखी त्याला कैदेची शिक्षा झाली! तुरुगातून आल्यावर त्यानें प्रायश्चित्तहि घेतलें नाहीं. तेव्हां गावच्या लोकानीं त्याला साहजिक जातीबाहेर टाकलें!"

"तसें असेल, तर त्यांचा आणि माझा पतिपत्नीसबध अधिक दृढ होईल, पण तुटणार नाहीं. कारण, त्यांच्यावर तुरुगात जाण्याचा प्रसग माझ्यामुळें आला; तेव्हा समाजानें त्याना कितीहि दूर लोटलें, तरी मला ते पूर्वीपेक्षा अधिक पूज्य वाटू लागले आहेत."

"तसें वाटणें साहजिक आहे, पण लीले, तुझ्याइतकेंच जर त्या जगन्नाथाचें अतःकरण थोर असतें, तर आमच्या मागची मोठीच काळजी दूर झाली असती. त्याला येथे आणावें, चागलें शिक्षण द्यावें, सभ्यतेने वागण्यास शिकवावें आणि मग त्याच्या स्वाधीन तुला करावें, अशी आम्हा दोघाची फार फार इच्छा होती, आणि त्याप्रमाणें आम्ही किती तरी प्रयत्न केला, पण त्यानें आमचा व आमच्याच बरोबर तुझा जो अपमान केला, त्याची आठवणहि करवत नाहीं. 'तुम्ही बाटे, ख्रिस्ती आहा आणि ती लीला वसताची * * आहे. माझा आतां प्राणांतींहि लीलेबरोबर सबध होणार नाहीं.' असें त्यानें स्पष्ट उत्तर दिलें. तेव्हापासून त्याचा असा राग आला आहे, की काय सागूं! पण करणार काय ? इतक्यात देवालाच तुझी दया आली आणि त्याच्या गावच्या लोकानीं त्याला जातीबाहेर टाकलें. आता तू शास्त्राने व धर्मानें दुसऱ्याबरोबर विवाह करण्यास मोकळी झाली आहेस!"

विमलाबाईंच्या या भाषणांत सत्यांश कितपत असावा, याचा लीलेला साहजिक सशय आला. तथापि नुसत्या सशयानें देखील तिचा जीव कासावीस

झाला. सणसणीत उत्तर देऊन आईचा खरमरीत समाचार घ्यावा, असेंही एकदां लीलेच्या मनांत आलें, पण तटा न करण्याची भागूनें केलेली सूचना तिला आठवली. ती चिंतायुक्त स्वरानें म्हणाली, " ही सगळी भानगड मला मुळींच माहीत नव्हती."

" तुझ्या मनाला वाईट वाटेल, म्हणून आम्हीं मुद्दामच तुला सांगितलें नाहीं. आतां ते यज्ञत्यागेश्वर स्वामी आले आहेत, त्यांनीं देखील या तुझ्या दुसऱ्या विवाहाला मोठ्या आनदानें परवानगी दिली आहे. मी म्हणतें, आपल्या वसंत-रावाविषयीं तुझा काय विचार आहे ? "

विचारमग्न होऊन लीला म्हणाली, " आई, विवाह म्हणजे जन्माच्या गाठी. बरें, मी आता अज्ञान आहें, असेंहि नाहीं. तेंव्हा चागला विचार केल्यावांचून मी तरी काय सागू ? "

आपल्या उपदेशाचा योग्य परिणाम झाला, असें वाटून सहर्ष अभिमानानें विमलाबाई म्हणाल्या, " आमची तरी कोठे एवढी घाई आहे ? चागला विचार कर आणि मग साग पण वसतराव तुला अयोग्य आहे, असें नाहीं."

उठून जाण्याच्या दरवाजाकडे वळून सचिंत स्वरानें लीला म्हणाली, " आई, मला आता येथे बसवत नाहीं. मी आठपधरा दिवसानीं तुला काय तें सांगेन."

आपण या कामात फत्ते मिळविली, असें विमलाबाईंना वाटलें. तिच्या स्वत:च्या खोलीत येईपर्यंत लीलेचा चेहरा काळजीनें अगदीं कळाहीन दिसू लागला. लीलेला त्या अवस्थेत पाहताच भागूच्या पोटात धस्स झालें ! ती म्हणाली, " काय ताईसाहेब, काहीं तरी विशेष घडलें वाटते ? "

तिच्या प्रश्नाचे उत्तर न देता आपल्या खुर्चीवर धपकन् अग टाकून देऊन लीला म्हणाली, " भागू, अगदीं एकातात कोठे तरी मला घेऊन चल. आता या मानापमानाच्या कल्पनेत एक घटकाहि गमविण्यास फुरसत उरली नाहीं. "

भागू घाबरून म्हणाली, " ताईसाहेब, या बंगल्यात एकात तो कोठला मिळावयाचा ? चला, आपण बागेंत जाऊ. "

दोघीहि तशाच बागेंतल्या अगदीं एका बाजूच्या भागात गेल्या. इकडे तिकडे कोणी नाहीं, याबद्दल पक्की खात्री करून घेऊन दोघीहि मातीवरतीच बसल्या. भागू ही आपली दासी आहे, हा भाव आज लीलेच्या अतःकरणातून दूर झाला

होता. आपल्या सखीप्रमाणें भागूला समजून लीला अगदीं दीनपणें म्हणाली, " भागू, एक वेळ तू माझ्यापुढें पदर पसरला होतास आणि माझ्या शक्तीप्रमाणें मीं तुला भिक्षाहि घातली, पण आज मीं तुझ्यापुढें पदर पसरला आहे माझ्या पदरांत योग्य ती भिक्षा घालशील ? "

असें म्हणतां म्हणताच लीलेचे डोळे अश्रूनीं भरून येऊन तिनें आपलें मस्तक भागूच्या खांद्यावर टेंकलें. आपली मालकीण आपल्या जवळ बसली आहे, हें भागूहि विसरली. जणूं आपल्या जिवाची जिवलग मैत्रीण आपणाजवळ बोलत आहे, असें तिला वाटलें ती म्हणाली, " ताईसाहेब, असें डोळ्यातून पाणी काढू नका. नीट काय तें मागा. तुमच्या सुखासाठीं मी आपले पचप्राणहि ओंवाळून टाकीन ! "

" भागू, तुझी गांठ ज्या वेळीं प्रथम पडली, ती वेळ खरोखर मोठी शुभ असली पाहिजे. तुझा सहवास जर मला झाला नसता, तर आज माझी अवस्था काय झाली असती, तें परमेश्वरालाच माहीत. भागू, प्रसग मोठा कठिण आला आहे. प्रसग पडल्यास दाडगाईनेदेखील वसताबरोबर माझा विवाह करण्यात येईल, अशा प्रकारचे उद्गार माझ्या कानावर आले आहेत. तसेंच सुदरपूरची हकीकतहि त्यानीं काहीं निराळीच सांगितली या स्थितीत काय करावे आणि काय नाही, ते मला अगदीं सुचेनासें झालें आहे. "

शांत व गभीर स्वरानें भागू म्हणाली, " ताईसाहेब, माझे ऐकाल, तर आता एकच उपाय आहे. देवाच्या दयेनें तुम्हाला सामर्थ्यवान् पति मिळाले आहेत. तुमचें सरक्षण करणें त्यांचें कर्तव्य आहे. त्याना जर तुमची ही अवस्था समजली, तर खचित् ते धांवून येतील आणि मोठ्या सन्मानानें तुम्हाला घेऊन जातील. शेंकडो समाजसुधारक आडवे आले, तर त्या सर्वांना बाजूला लोटून तुमचे सरक्षण करण्याचे सामर्थ्य त्याच्या अगीं खचित आहे "

" पण भागू, त्याना हें सर्व जाऊन कोण सागेल ? "

" मी जाऊन सांगेन, ताईसाहेब ! "

" आणि त्यांनीं जर दुसरा विवाह केला असला, तर—"

" तर काय ? एका देवाची पूजा दोन भक्तानीं केली, तर देवाचे महत्व वाढतें, पण कमी होत नाहीं."

" कोणाला माहीत ! कदाचित् मी त्यांच्या सुखांत कंटक होऊन राहीन."

" ताईसाहेब ! उगीच शकाकुशका काढू नका आणि शका काढण्यास आतां वेळहि नाहीं. मी सांगतें तसे करा."

" कसें ? "

" मी स्वत सुदरपुराला जातें आणि तेथें जसा रग दिसेल, तशा रीतीनें त्याच्या कानावर ही हकीकत घालून येतें."

" तुझ्याच्यानें होईल हें ? "

" हो, न होण्यास काय झालें ? गांवोगांव भीक मागत फिरणाऱ्या भिकारणीला यांत कठिण तें काय आहे ? कोणाचा आश्रय नसतां जर माझ्या अंगीं हें सामर्थ्य होतें, मग आता तर मला तुमचा आश्रय आहे. आतां मी त्रिखडांत देखील जाईन."

" भागू, हा आश्रय आहे, म्हणून तू त्रिखडात जाण्यास तयार आहेस; पण याच आश्रयानें माझे हात पाय कसे बाधल्यासारखे झाले आहेत. माझे बाबा जर मला आश्रयविहीन करतील, तर मीदेखील माझा मार्ग शोधण्यास मोकळी होईन."

" तसें झालें असतें, तर तुम्ही होऊन सुदरपुराला गेला असता होय ? पण ! ताईसाहेब, तसें जाण्यांत काय अर्थ ? त्यांनीं येऊन तुम्हांला सन्मानानें नेलें पाहिजे ! मी सुदरपुराला जाऊन युक्तीनें ही सगळी हकीकत त्याच्या कानावर घालते ताईसाहेब, ते जर खरे पुरुष असतील, तर वाटेल तो प्रयत्न करून तुमची अप्रतिष्ठा टाळतील !"

" पण तुला मी पाठविलें आहे, हें त्याना समजतां कामा नये, आणि तूं कोणत्या कामासाठीं जात आहेस, हें येथेंहि कोणाला कळता कामा नये. नाहीं तर आठ पधरा दिवसांची जी मुदत मिळाली आहे, त्याच्या आंतच काहीं तरी व्हावयाचें."

" ताईसाहेब, त्याची तुम्हांला काळजी नको. हें काम किती कुशलतेनें मी पार पाडते, तें तुम्हाला लवकरच दिसून येईल."

यानतर दुसऱ्याच दिवशीं कांहीं कारणावरून बागेतल्या एका माळ्याचें आणि भागूचें मोठें कडाक्याचें भांडण होऊन भागूनें मालकाजवळ रजा मागितली. तिची समजूत करण्याचा नानासाहेबांनीं पुष्कळ प्रयत्न केला, परंतु भागूनें कोणाचेंच म्हणणें न ऐकतां आपला पगार चुकता घेतला, आणि सगळयांचा निरोप घेऊन ती कोणीकडे निघून गेली !

---

## प्रकरण चवदावें.



नानासाहेबानीं भागूला आश्रय दिला होता, हें खरे, पण कांहीं झालें तरी तो विलासलोलुप श्रीमताच्या येथला आश्रय ! आज आहे, उद्यां नाहीं ! अशी भीति वाटत असल्यामुळें भागूने आपली पूर्वीची झोळी आणि भिक्षेचा लोटा जपून ठेवला होता; आणि आज सुदरपूरला जाताना त्याचा उपयोग करण्याचा तिच्यावर प्रसंग आला होता भिकाऱ्याचें सोंग कसें घ्यावयाचें, हें तिला कोणी शिकविण्याचें कारण नसल्यामुळें ती भिकारीण नसावी, असा कोणाला संशयहि आला नाहीं. पहिला दिवस तिचा गांवात खरोखरच भीक मागण्यात गेला. गांवात बैराग्याचा एक मठ होता, त्या मठांत तिनें आपल्या कुलाचें, पंथाचें व गुरूचे नाव सांगितल्यामुळें तिला मुक्काम करण्यास जागा मिळाली. जगन्नाथानें विवाह केला आहे कीं काय, त्याच्या पूर्वीच्या स्त्रीसबधाने गावात काहीं वाईट लोकमत पसरलें आहे कीं काय, वगैरे सगळी माहिती तिला मठातच मिळाली. ही माहिती भागूला अनुकूल अशी मिळाल्यामुळें या कार्यांत आपण खात्रीनें यशस्वी होऊ अशी तिला मोठी आशा वाटू लागली जगन्नाथाची गांठ चटकन् पडेल, असें तिला वाटलें होतें; पण आपल्या शेतकीच्या व्यवसायात गढून गेलेल्या जगन्नाथाची आणि तिची, तिला पाहिजे होती तशी गाठ तीन दिवसांनतर पडली

सकाळीं आठ साडेआठ वाजण्याच्या सुमारास जगन्नाथ मळ्यांतून गांवांत शिरला व तसाच पुडलिकाच्या घरीं गेला पुडलिकाच्या घरीं शेतीच्या विषयाचीं अनेक पुस्तकें व मासिकें याचा संग्रह केलेला होता. सकाळीं वेळ मिळाला, तर जेवणाची वेळ होईपर्यंत दोघेही वाचीत बसत. त्याचप्रमाणें आजसुद्धां दोघेही शेतीच्या धंद्याची अमेरिकेंतलीं वगैरे मासिकें वाचीत बसलेले असतां बाहेरच्या आंगणांत सगीताचे मधुर आलाप ऐकूं येऊ लागले

**पाहुं चला मुकुंद, पाहुं चला मुकुंद, पाहुं चला मुकुंद । गाई धरि आपुला छंद, मुरली वाजवितो मंद, गीत गातो गोविंद ॥ पांवा वाजवितो गोपाळ, गळां शोभे वनमाळ। कोटी तरणी तेजाळ, कृष्ण देवकीचा बाळ, वेगिं दावा घो ॥ करी स्वतांचें काज, न धरि लौकिकाची लाज। देह विडंबिलें आज, पाहुं**

**चला यदुराज ॥ सांडी शरीराचा रंग, चित्त झालेसें भंग। धरा श्रीकृष्णाचा संग, पाहुं चला श्रीरंग ॥ रामदासाची आस, जीव जाहला उदास। धरूं मी कवणाची कास, सहज प्रकाश पसरला हो ॥ १ ॥**

हें रामदासी पद चंद्रभागा फारच चांगल्या रागदारींत म्हणत असे व सकाळची वेळ असल्यामुळें या वेळीं ते सूर सगळ्याच्याच कानाला फार गोड लागले. पुंडलीकाची आई सत्यभामा तर हातातलें काम तसेंच टाकून घाईघाईनें बाहेर आली आणि तें गाणें ऐकूं लागली. एक तरुण, काळी सावळीच पण रूपवान् बैरागीण भिक्षेसाठीं गाणें म्हणत आहे, हें पाहून सत्यभामेला तिची दया आली. इतक्यात बैरागिणीचे गाणें ऐकण्यासाठी जगन्नाथ व पुंडलीकहि बाहेर आले. सत्यभामा आपल्या वत्सल व गोड स्वराने म्हणाली, " बिचारी अगदीं तरुण आहे. कोठून ग आलीस तू? या प्रांतातली काहीं तू दिसत नाहींस!"

चंद्रभागा म्हणाली, " नाहीं बाई. मी खानदेशातली आहे. "

" खानदेशातली! आणि इतक्या लांब एकटीच भीक मागत आलीस?"

" एकटी नाहीं तर कोणाला बरोबर आणू? मला बाप, भाऊ, बहीण कोणी नाहीं. "

सत्यभामा स्वभावत च दयाळु होती त्यांत आणखी भिकारणीचे ते शब्द ऐकून तिला तिची फार करुणा आली. पण त्याचबरोबर या भिकारणीचा तिला थोडा रागहि आला जगन्नाथ व पुंडलीक दोघेहि तिच्याकडे टकमक पहात आहेत आणि तीहि मधून मधून त्याच्याकडे पहात आहे, हा प्रकार सत्यभामेच्या डोळ्यांना सहन झाला नाहीं. काहीं तरी भिक्षा घालून या गोड चेहेऱ्याच्या बैरागिणीला येथून घालवून दिलें पाहिजे, असा सत्यभामेनें विचार केला आणि ती घरात गेली.

जगन्नाथ पुंडलिकाला म्हणाला, " या बैरागिणीला पूर्वी कोठे तरी पाहिल्यासारखे वाटतें. "

पुंडलीक म्हणाला, " मलाहि तसाच संशय येतो. "

जगन्नाथ त्या बैरागिणीला म्हणाला, " तूं दोन अडीच महिन्यापूर्वी कोणत्या भागांत भीक मागत हिंडत होतीस? "

बैरागीण हंसत हसत म्हणाली, " कां? "

" तुला कोठें तरी पाहिल्यासारखे वाटतें. "

इतक्यांत सत्यभामा ओंजळ भरून तांदूळ घेऊन बाहेर आली. आपल्या लोट्यांत ते तांदूळ घेत असतां बैरागीण म्हणाली, “तुम्हालाहि दादा मीं कोठें तरी पाहिल्यासारखें वाटतें—हो, हो! त्या जबलपूरच्या स्टेशनावर! तुम्हीं त्या स्टेशनावर एका साहेबाला मारलें होतें, नाहीं? एका दक्षिणी मेम-साहेबाला तो साहेब धरीत होता, आणि तितक्यांत तुम्हीं तेथे येऊन त्याला लाथ मारून पाडलेंत! तेच ना तुम्हीं दादा?”

“हो, हो! तेथेंच तुला पाहिलें. बरोबर, त्या मेमसाहेबाजवळच तू तेथें बसलेली होतीस.”

“होय दादा. मी त्या वेळीं त्यांच्या नोकरींत होतें.”

सत्यभामेला त्या बैरागिणीप्रमाणें या दोघा तरुणाचाहि राग आला होता. त्या बैरागिणीकडे दोघेहि टक लावून पहात आहेत, हे तिला सहन झालें नाहीं, पण तिच्याकडे ते का पहात होते, हे आता सत्यभामेच्या लक्षात आल्यामुळें तिचा राग पार नाहींसा झाला व सर्वांविषयीं तिच्या अंतःकरणात अधिक वात्सल्य उत्पन्न झालें. तिचें लक्षहि या एकदर प्रकाराकडे साहजिकच वेधलें गेलें.

पुंडलीक म्हणाला, “मग ती नोकरी मोडून पुन्हा का भीक मागावयाला लागलीस? नोकरीपेक्षा भिकेचा उद्योग सोपा, नाहीं का?”

बैरागीण म्हणाली, “सोपा कसला महाराज! लोकाच्या दारोदार जाऊन उभें रहावयाचें, हेंच मुळीं वाईट. त्यात कोणी मूठभर दाणे देतात, तर कोणी नुसती हेटाळणी करतात. कोठें कोठें तर इतकी अप्रतिष्ठा होते कीं मरण बरें पण भीक नको, असें होतें.”

जगन्नाथ म्हणाला, “तुला इतकें समजत असून मग ती नोकरी का सोडलीस?”

“माझें नशीब! दुसरें काय? पहिल्यानेंहि भीक मागतच हिंडत होतें, तेव्हां नोकरी सुटल्याचें एवढें मला वाईटहि वाटतें नाहीं. पण माझी धनीण माझ्यावर फार प्रेम करीत होती, याचेंच मला वाईट वाटतें.”

“कोणती तुझी धनीण?—ती—”

“ज्यांना तुम्हीं साहेबाच्या हातून सोडविलें, ती.”

“तुला त्यांनीं कां घालवून दिलें?”

“त्यांनीं घालवून नाहीं दिलें, मींच नोकरी सोडली!”

“कां?”

" मी बैरागीण, त्यांतून वैष्णवपथी. त्यांच्या घरांतला एकदर भ्रष्टाकार पाहून तेथें रहाण्यास माझें मन घेईना, म्हणून नोकरी सोडली ! "

" आणि इतके दिवस तो भ्रष्टाकार बरा सहन केलास ? "

" जेवढें सहन होण्यासारखे होतें, तेवढें सहन केलें, पण त्यांनीं मर्यादा सोडल्यावर माझा जीव फार भ्यायला लागला. "

जगन्नाथ म्हणाला, " त्यांनीं मर्यादा सोडली ? पण—जाऊ दे. त्यांनीं काय केलें ? "

बैरागीण म्हणाली, " दादा, ते सांगण्यात काय अर्थ ? त्यांची इतके दिवस भाकरी खाल्ली, आता अशी निमकहरामी करण्यात काय फायदा ? "

पुडलीक म्हणाला, " नको सांगू पण तू सांगत नाहींस, यावरून ते मोठे दुष्ट लोक असावेत असें वाटतें त्याची गुप्त गोष्ट जर तू फोडलीस, तर त्याच्यावर मोठा प्रसग येईल, नाहीं ? "

बैरागीण म्हणाली, " नाहीं दादा ते मोठे लोक. त्यांना असा कोणाचा घात-पात करून काय करावयाचें आहे ? "

जगन्नाथ म्हणाला, " बाई, सागण्यासारखें असेल, तर सांग. त्यांनी कांहीं घातपात केला नाहीं म्हणतेस, मग सागायला एवढी भितेस कां ? "

पुडलीक म्हणाला, " आणि आतां नोकरीहि सोडली म्हणतेस. चाकरी असे-पर्यंत भाकरीची किंमत. बाई, सांग, तुला चांगलें बक्षीस देऊ "

बैरागीण हळूच हसून म्हणाली, " काय बक्षीस द्याल महाराज ? "

पुडलीक म्हणाला, " तुला काय पाहिजे ? "

" मला एक धड लुगडें आणि एक चोळी द्याल, तर मजवर फार उपकार होतील. या फाटक्या चिंध्यांनीं थडी निभत नाहीं "

" बरें देऊ. त्यांची सगळी हकीकत सांग पाहू. बाई, आम्हांला त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं; पण त्या मारामारीमुळें ती हकीकत ऐकावीशी वाटते. "

बैरागीण जगन्नाथाला लक्षून म्हणाली, " तुम्हांला त्या मारामारीबद्दल एक महिन्याची शिक्षा झाली होती, नाहीं ? आमच्या बाईसाहेबांना त्याबद्दल फार वाईट वाटलें ! त्या मुलीचा स्वभाव खरोखर फार चांगला आहे. पण काय कर-णार बिचारी ! "

जगन्नाथ म्हणाला, " तें राहूं दे. तूं तेथून कां निघालीस तें सांग अगोदर."

बैरागीण म्हणाली, " काय सांगू दादा! त्या मुलीसाठीं—ताईसाहेबांसाठीं माझा जीव कळवळून येतो; पण काय करणार? दादा, ते सागतात आपण हिंदु म्हणून; पण मला नाहीं वाटत ते हिंदु असतील असें. मला काय करायचें आहे, मी आपली माझी भाजीभाकर वेगळी करून खात होते! त्या ताईसाहेबावर माझा फार लोभ आणि त्याचाहि माझ्यावर फार लोभ! त्यांचें म्हणे लहानपणीच लग्न झालें आहे. नवराहि आहे; पण तो म्हणे खेड्यांतला खेडवळ आहे! तो त्या नानासाहेबांना मुळींच आवडत नाही! एकटी मुलगी, जवळ पैसाहि पुष्कळ, तेव्हा त्या ताईसाहेबाचे दुसऱ्या कोणाबरोबर लग्न लावण्याचा विचार नानासाहेबांनीं चालविला आहे!"

जगन्नाथ इतका वेळ साधारण शांतपणे ही हकीकत ऐकत होता; पण बैरागिणीचे ते अखेरचे शब्द ऐकून मस्तकावर जणू वज्रपात होत आहे, इतका तो हताश झाला! इतक्यांत त्याचा सतापहि जागृत झाला वज्रगभीर स्वरानें तो म्हणाला, " काय ?"

त्या नुसत्या ' काय' शब्दानेच बैरागिणीच्या पोटात धस्स झालें! पुडलिकाच्या अंतःकरणांतहि प्रथम आश्चर्य आणि नतर उद्वेग उत्पन्न झाला. तो बैरागिणीवर डोळे वटारून म्हणाला, " ते तिचें पुन्हा लग्न करणार आहेत ? तुला काय माहीत ?"

सत्यभामा म्हणाली, " बाहेर कामकाज करणारीण मोलकरीण ती! तिला काय त्यांच्या घरातलें माहीत असणार ? कांहीं तरी ती सांगते आहे झालें!"

आपला डाव बराच साधला आहे, असें पाहून बैरागीण म्हणाली, " आजीबाई, खऱ्याखोट्याशीं तुम्हाला काय करावयाचे आणि मला काय करावयाचें ?" असें म्हणून बैरागिणीनें तेथून जाण्यासाठीं पाऊल उचललें. तेव्हा पुडलीक म्हणाला, " थांब बाई, खरेंच त्या मुलीचें पुन्हा लग्न करणार आहेत ?"

बैरागीण म्हणाली, " खरेंच दादा, मी खोटें कशाला सांगू ? ताईसाहेबांचें लग्न झालें आहे, त्याचा नवराहि म्हणे कोणत्याशा गावीं आहे. असें असून त्यांचें पुन्हां लग्न करीत असल्याचें जेव्हा मला समजलें, तेव्हा मला त्यांच्या घरीं रहायला फार भीति वाटूं लागली. मी बैरागीण असलें, तरी हिंदूच आहें. असला अधर्म मी कोठें ऐकला नाहीं आणि पाहिलाहि नाहीं. अशा ठिकाणीं नोकरी करण्यांतहि पाप आहे, असें वाटलें आणि नोकरी सोडून पुन्हां पहिल्या उद्योगाला लागलें."

पुंडलीक म्हणाला, " ते त्या मुलीचें पुन्हां लग्न करणार आहेत, हें तुला कसें समजलें ? दुसऱ्या लग्नाचें बोलणें काय तुझ्या समक्ष झालें ? "

" नाहीं दादा. माझ्या समक्ष काहीं झालें नाहीं. मी आपलें ऐकलें तें सांगितलें. पण त्याच्या घरीं पुष्कळ मोठाले लोक येतात आणि या लग्नासबंधानें बोलतात तेव्हा चारदोन गोष्टी मी ऐकल्याहि आहेत ते म्हणतात कीं, पहिल्या नवऱ्याला त्याच्या गांवच्या लोकानीं जातीबाहेर टाकल्यामुळें आता ताईसाहेबाचा पुन्हां विवाह करावयाला काहीं हरकत नाहीं !"

सत्यभामा म्हणाली, " बाई, तू काही तरी सांगतेस झालें ! त्याच्या घरांत तू चागली वागली नसशील म्हणून त्यानीं तुला घालवून दिलें असेल, तेव्हा आता त्याची उगीच निंदा करीत हिंडतेस ! "

बैरागीण म्हणाली, " नाहीं आजीबाई. मी कशाला त्याची निंदा करू ? ते साहेब लोक त्यांना यांत निंदा वाटत नाहीं. आपण काहीं तरी चागली गोष्ट करणार आहों, असेंच त्यांना वाटतें खरोखरच त्यानी ताईसाहेबाचा पुन्हा विवाह करण्याचा विचार केला आहे ते कोणी वसतराव आहेत, त्याच्याबरोबर म्हणे विवाह होणार आहे ! "

पुडलीक व जगन्नाथ दोघेहि एकाच वेळीं म्हणाले, " वसतराव ! कोण वसंतराव ? "

" दादा, मला काय त्याची एवढी माहिती पण त्याच्या बापाचें नाव विठ्ठलराव एवढें मात्र मला माहीत आहे ते म्हणे फार मोठे लोक आहेत. स्वतः वसंतरावहि बॅरिस्टर आहेत ! "

जगन्नाथ विस्मयानें व सतापानें म्हणाला, " कोण ? विठ्ठलराव ! "

" होय दादा, त्यांचें नाव विठ्ठलरावच वाटते नेहमीं नानासाहेबाकडे येतात. मोठे गोडबोले आहेत मला तर त्याचा फार राग येतो. त्यानींच नानासाहेबाना कांहीं तरी सांगून या दुसऱ्या लग्नाची तयारी केली आहे नानासाहेबाची सगळी सपत्ति आपल्या घरात यावी, अशी त्यांची इच्छा आहे. "

क्रोधकपितस्वरानें जगन्नाथ पुंडलिकाला म्हणाला, " पुंडलीक, जगन्नाथाला बहिष्कृत करण्यासाठीं तुझ्या चुलत्यानें एवढी खटपट का केली, तें आलें का आतां तुझ्या लक्षांत ? "

घाबरल्यासारखें करून बैरागीण म्हणाली, " अरे देवा ! तुमचा नी त्यांचा कांहीं तरी संबंध दिसतो ! दादा, मला माफ करा. माझ्या हातून मोठाच अन्याय झाला ! "

जगन्नाथ म्हणाला, " नाहीं बाई, तुझा कांहीं अन्याय नाहीं. तूं सांगितलेंस हें फार चांगलें केलेंस! ती तुझी ताईसाहेब काय या विवाहाला कबूल झाली आहे? बाई, खरें सांग, तुला खरोखरच चांगलें बक्षिस देईन."

चंद्रभागा म्हणाली, " दादा, तें मी कसें सांगू? त्या बाईसाहेब, मी दासी. त्यांचें माझें कधीं बोलणें देखील होत नसे. "

" बोलणें चालणें नसलें म्हणून काय झालें? तुला त्यांच्या घरांतल्या इतक्या भानगडी समजल्या, आणि तेवढें मात्र समजलें नाहीं? "

" नाहीं दादा. मला मोलकरणीला कोण एवढें कळू देतो. पण इतकें खरें कीं, या विवाहाच्या भानगडीपासून ताईसाहेब कोणाशींच बोलत चालत नाहींत. त्यांच्या मनांत काय आहे आणि काय नाहीं, तें भगवताला माहीत! कदाचित् त्यांच्या मनांत हा विवाह करावयाचाहि नसेल, पण त्याची दाद घेणारा कोण आहे? ती त्यांची सावत्र आई आहे ना? ती महापाताळयंत्री आहे ती सांगत होती कीं, ' लीलेच्या पहिल्या नवऱ्यानें दुसरें लग्न केलें. एकदा म्हणे नानासाहेबानीं पहिल्या जावईबोवाना बोलावलेंहि होतें, पण त्यानें निरोप पाठविला कीं, ' त्या बाव्या वसतरावाबरोबर हिंडणाऱ्या मुलीला आपण नेत नाहीं.' खरें खोटें कोणाला माहीत! ही सगळी ऐकींव माहिती. दादा, जाऊ द्या. तुम्हाला काय करावयाचें नी मला काय करावयाचें! द्या दादा, माझें बक्षीस! मला एक धड लुगडें नी एक चांगली चोळी द्या ह्या चिंध्यानी थंडी निभत नाहीं आणि नेसायचीहि लाज वाटते. "

जगन्नाथानें खिशांतून दहा रुपयाची नोट काढून पुंडलिकाच्या हातीं दिली आणि तेवढयात लुगडें व खण आणण्यास त्याला सांगितलें. लुगडें व खण आणी तोंपर्यंत बैरागीण तेथेंच बसली होती. ' तिला एवढें नवे लुगडें कशाला? मी माझ्या घरातून एकादे जुनें दिलें असते ' असें म्हणण्याचें सत्यभामेच्या अगदीं जिभेवर आलें होते, पण स्वतःच्या स्त्रीची हकीकत समजल्यामुळें या वेळीं जगन्नाथाच्या मनोव्यापाराच्या वाहत्या झऱ्यास अशा रीतीनें बांध घालणें तिला बरें वाटलें नाहीं. पुंडलीक परत येईपर्यंत भिकारीण तेथेच बसली होती व तिला मधून मधून जगन्नाथ कांहीं सूचक प्रश्न विचारीत होता, परंतु चंद्रभागेनें आपल्या मालकिणीचा मानभंग न होईल अशा बेतानेंच सगळया प्रश्नाचीं उत्तरें दिलीं. थोडक्याच वेळांत पुंडलीकहि परत आला. वास्तविक त्यानें दहा रुपयांच्या आंत सगळा कारभार आटोपावयास पाहिजे होता; परंतु एक वेळ भपकेबाज पोषाकांत

पाहिलेल्या बैरागिणीला आतां फाटकीं वस्त्रें वापरण्याचा प्रसंग आलेला पाहून त्याला तिची दया आली आणि आपल्या स्नेह्याच्या पत्नीची बरीच हकीकत कळून थोडी आशाहि उत्पन्न झाली असल्यामुळें पुडलीकानें जवळचे पांच रुपये घालून तेरा रुपयांचें लुगडें व दोन रुपयांचा खण आणला होता. तें लुगडें पाहिल्यावर सत्यभामेलाहि चमत्कारिक वाटलें, तथापि कांहीं न बोलतां तिनें तें लुगडें व खण उचलून बैरागिणीस दिलें. लुगड्याकडे मोठ्या आनदानें पहात पहात चद्रभागा म्हणाली, " दादा, मी भिकारीण, मला एवढे मोठें लुगडें कशाला ? नेसलें तर लोक नावें ठेवतील ! कोणी भीकदेखील घालणार नाही ! माझ्यासारखीला बक्षीस द्यावयाचें, तेदेखील विचार करून दिलें पाहिजे ! मला नको हें लुगडें ! "

जगन्नाथ म्हणाला, " आता तुला दिलें तें दिलें ! तू नेस अथवा त्याचें वाटेल तें कर ! "

" मर्जी दादा आपली ! " असें म्हणून चद्रभागेनें ते लुगडें व खण घेऊन तेथून मठात प्रयाण केले ती गेल्यावर सत्यभामा घरात गेली पण जगन्नाथ व पुडलीक तसेच ओटीवर उभे होते. जगन्नाथ आपल्याच विचारात मग्न असून त्याचा चेहेरा बराच निश्चयी व थोडा सतप्त दिसत होता पुडलीक म्हणाला, " जगन्नाथ, या एकदर हकीकतीवरून तुला काय वाटते ? "

जगन्नाथ म्हणाला, " माझ्या स्त्रीची इतके दिवस मी अवहेलना केली असेच मला वाटते "

" मग पुढें ? "

" पुढें काय ? मी उद्याच मुंबईस जाणार आणि तिला घेऊन येणार ! "

" पण—"

" पण बीण काहीं नाहीं. जगन्नाथाच्या शरीरात जोपर्यत रक्त खेळत आहे, तोपर्यंत जगन्नाथाच्या स्त्रीनें जगन्नाथाचीच स्त्री राहिलें पाहिजे ! आपल्या स्त्रीचा मान साभाळण्याचे सामर्थ्य देवानें जगन्नाथाला भरपूर दिले आहे, आणि जरूर पडल्यास त्या सगळ्या सामर्थ्याचा जगन्नाथ या वेळी उपयोग करणार ! नाना-साहेब, विठ्ठलराव, वसंतराव आणि दुसरे कोणी मोराची पिसें लावून नटलेले कावळे कितीहि आडवे आले, तरी आपला मार्ग निष्कटक करण्यास जगन्नाथ समर्थ आहे ! खरेंच पुडलीक, माझी मोठी चूक झाली ! मानापमानाच्या कल्पनेनें स्वतःच्या स्त्रीच्या अशा अप्रतिष्ठेस मीच कारण झालो ! तिच्या मूर्ख व दुबळ्या

बापाच्या भलत्याच मतासाठीं मी तिलाच जबाबदार मानीत होतों, पण यांत तिचा काय अपराध ? तें काहीं नाहीं, मी उद्याच मुबईला जाणार!"

पुडलीक म्हणाला, " हा सल्ला मी तुला जबलपूरला असतानाच दिला होता! जाऊ दे, आतां काय त्याचें ? मीहि उद्या तुझ्याबरोबर येतों! बरोबर एखादा इसम असणें बरें."

"तू आलास तर फार चागलें. बरें, जातों मी. नारायणकाकाना भेटून त्यांची सल्ला मला घेतली पाहिजे. आपणा दोघाना लागणाऱ्या सामानासुमानाची तयारी तू कर. मला मळ्यांत जाऊन तेथलीहि व्यवस्था केली पाहिजे."

जगन्नाथ तसाच निघाला तो आपल्या आजोबाकडे म्हणजे नारायणकाकाकडे गेला.

---

## प्रकरण पधरावे.



आपली संध्या व पूजा आटोपून नारायणकाका बैठकीवर काहीं कागदपत्र पहात बसले होते ओसरीवर असलेल्या झोपाळ्यावर रगनाथ एक पुस्तक वाचीत होता व कृष्णी आपल्या नव्या चोळीवर कशिदा काढीत होती. नारायणकाका जे कागदपत्र पहात होते, त्यापासून काही विशेष निष्पन्न होईल, असें त्याना इतके दिवस वाटत नव्हते, परंतु सातआठ दिवसापूर्वी त्याच्या हातीं मुबईहून एक पत्र पडल्यामुळें त्याना बरीच आशा उत्पन्न झाली होती त्यात आणखी आज एक पत्र नुकतेच त्याना मिळालें होते व त्याचाच ते विचार करीत होते. हे पत्र त्यांना मुबईहून डॉक्टर चिंतामणराव याच्याकडे आलें होते. या पत्रानें नारायण काकाना पुष्कळच आशा उत्पन्न झाली होती आणि त्यामुळें त्याचा चेहरा केव्हां उल्हसित होत होता, तर केव्हा त्याच्या चेहऱ्यावर उद्विग्नताहि पसरत होती

जगन्नाथाचे वडील विनायकराव व डॉ. चिंतामणराव हे समवयस्क असून त्या दोघांचा स्नेहहि फार होता. त्याचा थोडासा नात्याचा सबध असून ते राहाणारेहि सुदरपूरचेच होते. विनायकराव वारले तरी त्याच्या मडळीवर चिंताम-णरावाचा पूर्वीप्रमाणेंच लोभ होता. चिंतामणराव विलायतेस जाऊन एम. डी. होऊन आले होते व आपल्या वैद्यकीच्या धद्याला त्यानीं मुबईसच आरंभ केला होता. थोडक्याच दिवसात त्याचा धदा चांगला जमल्यामुळें ते मुबईसच स्थाइक झाले होते. ते :अगदी जुन्या पद्धतीनें राहणारे होते, परंतु धद्याच्या

दृष्टीनें त्यांना नानासाहेबांसारख्या पहिल्या प्रतीच्या सुधारकाकडेहि हरहमेश जाण्याचा प्रसंग येई. विनायकरावामुळें जगन्नाथावर त्याचें फार प्रेम होतें. शिवाय जगन्नाथानें एका स्वतंत्र उद्योगास आरंभ करून त्यात बरेंच यश मिळविलें असल्यामुळें त्याच्याबद्दल चिंतामणरावाना विशेष अभिमानहि वाटत होता. अशा रीतीनें जगन्नाथाच्या एकदर चरित्रक्रमाकडे त्यांचें लक्ष प्रथमपासून वेधल्यामुळें नानासाहेबांच्या आसुरी सुधारणेवर त्यांची बारीक नजर होती. हळू हळू त्यांना वसंताच्या एका रहस्याची थोडी गुणगुण समजली. त्यांनीं नारायणशास्त्र्यांशीं व त्याबरोबरच विलायतच्या एकदोघा स्नेह्यांशीं पत्रव्यवहार सुरू केला होता व या एकदर पत्रव्यवहाराच्या जणू उपसहारार्चेच त्यांचें पत्र आज नारायणकाकाच्या हातीं पडलें होतें. या पत्रामुळें नारायणकाकाना थोडें समाधान वाटत होते, हें खरें, पण सुशिक्षित म्हणविणाऱ्या सुधारणावादी तरुणाचा अधोगामीपणा त्यांच्या लक्षात आल्यामुळें त्यांचें मन थोडें उद्विग्नहि झालें होतें.

नारायणकाकाची मन स्थिति अशी गुतागुतीची झाली असताना तेथें जगन्नाथ आला एका भिकारणीकडून कळलेली हकीकत त्याना थोडक्यात सागून तो म्हणाला, " मी मग उद्या मुबईस जाऊ का ? "

नारायणकाका म्हणाले, " हो, अवश्य जा मीहि चार दोन दिवसांत सगळ्या मडळीसह मुबईस येणार आहे. तू चिंतामणरावांकडेच उतर. त्याना मी आजच पत्र लिहीत आहे "

आजोबा सगळ्या मडळीसह मुबईस जात आहेत, हें ऐकून जगन्नाथाला साहाजिक आश्चर्य वाटले 'तेथे कशासाठीं जाणार' असे विचारण्याचें जगन्नाथाच्या अगदीं ओठाशीं आले होते, परतु तसें विचारण्यास त्यास धैर्य झालें नाहीं. आपणांस त्यानीं जाण्याला परवानगी दिली, यातच त्यानें समाधान मानलें आणि तो तसाच मळ्यात गेला सगळ्या कामकाजाची व्यवस्था लावल्यावर दुसऱ्या दिवशीं तो व पुडलीक असे दोघेहि मुबईस निघून गेले मुबईस पहिला दिवस दोघाचाहि इकडे तिकडे भटकण्यांत व नानासाहेबांच्या बगल्याचा शोध लावण्यांत निघून गेला दुसऱ्या दिवशीं दुपारीं तीनचार वाजण्याच्या सुमारास जगन्नाथ एकटाच श्वशुरगृहाकडे निघाला.

पायात तांबडा लाल पुणेरी जोडा, रुईफूलकाठी पाढरें स्वच्छ धोतर, अगांत स्वच्छ सदरा, त्यावर पाढरा परीट घडीचा कोट आणि डोक्याला काश्मिरी टोपी, अशा थाटानें जगन्नाथाची स्वारी श्वशूरगृहाकडे चालली होती. त्याच्या मुखावरील

टवटवी, गोरा वर्ण आणि सामर्थ्याचें तेज यामुळें या साध्या पोशाकांत जगन्नाथ खरोखरच फार रुबाबदार दिसत होता. रस्त्यांत भटकणारे कांहीं साहेबी थाटाचे तरुण जगन्नाच्या त्या भव्य व दर्शनीय आकृतीचा हेवा करताना आढळले. जगन्नाथ बागेच्या प्रवेशदरवाजाजवळ जातो, तोंच आमच्या वाचकांच्या परिचयाच्या भजहरी भैयानें जगन्नाथास लांबलचक सलाम केला. या सलामास किंचित् मान हलवून जगन्नाथानें प्रति सलाम केला. तो म्हणाला,

" नानासाहेब आहेत ? "

" नहीं. बाहर गये है ! "

" परत केव्हा येतील ? "

" वह तो मैं नहीं कह सकता. एक बडे अदमीको मिलनेके लिये ताजमहाल होटलमें गये हैं. आज लौटेंगे, नहीं तो कल. "

" बाईसाहेब आहेत आत ? "

" नहीं, वेभी उनके साथहि है "

" तर मग घरात कोण आहे ? "

" खाली उनकी लडकी लीलाबाईसाहब है. "

" मला त्यांना भेटावयाचें आहे "

" अच्छा, तो आपके नामका कार्ड लाइये. "

' एटीकेट ' माहीत नसलेल्या जगन्नाथाला कार्डाचे नाव ऐकून साहजिक चमत्कारिक वाटले. पाश्चात्याच्या काहीं अनावश्यक चालीरीतीनी आपणास निष्कारण बांधून घेऊन मनुष्याच्या साहजिक सहृदयतेस यामुळे कसा फाटा मिळतो, याचा जगन्नाथास यापूर्वींच अनेकवार अनुभव आला होता, आणि त्या त्या वेळी अशा खोट्या सभ्यतेचे डोलारेहि त्याने जमीनदोस्त केले होते, परंतु येथे जयविजयाप्रमाणे दाराशी बसणाऱ्या भय्याना तें शहाणपण शिकविण्याचा आपणांस कांहीं अधिकार नाहीं, असा विचार करून जगन्नाथानें खिशातून पेन्सिल काढून कागदाच्या तुकड्यावर नांव लिहिलें आणि तो कागद भैय्याच्या स्वाधीन केला. दुसऱ्या कोणी असला कागदाचा तुकडा भैय्याच्या हातीं दिला असता, तर तो त्यानें वाहत्या वाऱ्याच्या स्वाधीन करून, देणाराची चेष्टाहि केली असती; परंतु जगन्नाथाच्या चेहऱ्यावरील तें तेज पाहून भैय्या निमूटपणें तो कागद घेऊन आंत गेला. लीला व चंद्रभागा या वेळीं त्यांच्या नेहमींच्या खोलींत बसून सचिंतपणें स्वामी यज्ञत्यागेश्वर यांच्या नवीन आसुरी विवाहाच्या वार्तिकाचा विचार

करीत होत्या. इतक्यात तें लहानसे चिटोरें भैय्यानें लीलेच्या हातीं दिलें ! ‘ जगन्नाथ विनायक सुदरपूरकर ’ हीं त्या चिठ्ठीवरील अक्षरे पाहताच लीलेच्या अत -करणात हर्ष मावेनासा झाला इतक्यात तिचे डोळेहि अश्रूनीं भरून आले. भैय्याला काय जबाब द्यावा हेंहि तिला सुचेना चद्रभागेनें हीं सर्व लक्षणें ओळखून भैय्याला म्हटलें, “ भैय्या, जा, त्याना पुढच्या दिवाणखान्यात आणून बसव ! ”

“ भैय्याने त्याप्रमाणें जगन्नाथाला दिवाणखान्यात नेऊन बसविलें व तो पुन्हा द्वारपालाचे काम करण्यास गेला. एका सुदर खुर्चीवर बसून पूर्ण पाश्चात्य पद्धतीनें शृगारलेला तो दिवाणखाना जगन्नाथ मोठ्या चौकस बुद्धीनें पहात होता. काहीं सृष्टिसौदर्याच्या तसबिरी होत्या, तर मधून मधून पूर्ण अर्धनग्न स्त्रियाचीं चित्रेंहि टागलेलीं होती काही लाकडी बैठकावरून दगडाचे अर्धनग्न पुतळेहि उभे करून ठेवले होते दिवाणखानाभर सुदर गालीचा पसरलेला असून त्यावर ठिकठिकाणीं खुर्च्या, कोचें, आरामखुर्च्या व मेजें ठेविलेली होतीं हे सर्व सामान फार उची असून ते अत्यत व्यवस्थेन ठेवलेलें होते मधून मधून काचेच्या तावदानाची कपाटे ठेवलेलीं असून त्यात अपूर्व वस्तू ठेवलेल्या होत्या एकदरीत पाश्चात्य विलासप्रियतेची छाया या दिवाणखान्यात सर्वत्र उमटलेली दिसत होती. त्या दिवाणखान्यात असता आपण एका हिदु गृहस्थाच्या घरात आहो, याची स्मृति जगन्नाथाला जणू जागृत ठेवावी लागत होती तो देखावा नवीन असल्यामुळे जगन्नाथाला प्रथम नवल वाटले, पण त्याबरोबरच साधेपणाने खऱ्या गृहस्थधर्माला शोभेल, असा देखावा त्याला न दिसल्यामुळे त्याचे मन थोडे खिन्नहि झाले आता इतके खरे कीं, ‘ पुढे काय होते ’ इकडे त्याचे सगळे चित्त वेधून गेल्यामुळे या असल्या गोष्टींचा विशेष विचार करण्यास त्यास अवसरच मिळाला नाहीं नानासाहेब बगल्यात नाहीत त्याच्या पश्चात् आपण येथे प्रवेश केला आहे, हे चागले केले की वाईट केले, असाहि एक प्रश्न त्याचे मन त्याला करीत होतें स्त्री म्हणून जिला आपण नेण्यास आलो आहो, तिचे ऐश्वर्य, तिचा तो पाश्चात्य थाटमाट आणि ते नवे शिक्षण व स्वत चा साधेपणा याचा जेव्हा जगन्नाथ मेळ घालू लागला, तेव्हा लीला जणू आपला उपहासच करीत आहे, असेहि त्याला एक पुसट कल्पनाचित्र दिसू लागले तो याप्रमाणे विचारात मग्न असता त्याच्या मागच्या भिंतीत असलेले एक दार उघडले गेले आणि त्याबरोबर अत्यत मार्दवानें ‘ एवढा विचार कसला चालला आहे ? ’ असे गोड शब्द उच्चारले गेले !

जगन्नाथाची दृष्टि आपोआपच मागें वळली ! पहातो तों सगळेंच त्याच्या कल्पनेच्या बाहेरचें दृष्टीस पडलें ! तो उठून उभा राहिला आणि त्याच्या समोर जी एक रम्य मूर्ति उभी होती, त्या मूर्तीकडे वेड्यासारखा टक लावून पाहू लागला ! लीला लीलेच्याच पोशाकात आपल्या दृष्टीस पडेल, अशी त्याची समजूत होती, परंतु समोर एकाएकीं सुदरपूरच्या गृहस्थाच्या घरातल्या रुक्मिणीला पाहून जगन्नाथाच्या विस्मयास सीमा राहिली नाहीं !

अगात पाढरा स्वच्छ झगा, त्यावर पारशी पद्धतीची कच्छमुक्त रंगीत रेशमी साडी, त्या साडीचा पदर खाद्यावरून सरकू नये म्हणून त्याला लावलेली सोन्याची चपटी टाचणी, अगात सुदर पोलकें, पायात मोजे व बूट, केंस आग्लतरुणीप्रमाणें मुद्दाम विखरून बाधलेले, हातात सोन्याची एकादी बागडी व त्यावर सोन्याचे घड्याळ, दिसते न दिसतें इतकें बारीक कुकू, अशा पोशाकात लीला आपणापुढे येऊन उभी राहील, असे जगन्नाथाला वाटत होते परतु एक बालबोध वळणाची गृहस्थाची मुलगी आपणापुढे उभी आहे, हे पाहून त्याच्या चित्तवृत्तींत विलक्षण घडामोड सुरू झाली रेशीमकाठीं लुगडे, अगात चोळी, हातांत गोटपाटल्या, नाकात नथ, गळ्यात सरी वगैरे दागिने, केस व्यवस्थेनें बाधलेले, स्पष्ट दिसण्यासारखे कुकू, असा तो लीलेचा थाट पाहून जगन्नाथाचें हृदय साहजिक गहिंवरून आलें. तो अनिमिषतेनें लीलेकडे पाहू लागला, परतु लीलेची दृष्टि भूमिगत होती मध्येच ती आपले डोळे थोडे वर करण्याचा प्रयत्न करी, पण तितक्यात लज्जेनें तिची मान खाली जाई अशा वेळीं लीलेच्या मिटलेल्या ओठावर जे एक हास्य दिसून आलें, ते पाहून जगन्नाथास धन्यसें वाटलें पण त्याबरोबरच आपण मोठे अपराधी आहो आणि या अपराधाची कबुली देण्यासाठीच जणू आज आपण येथे आलों आहों, अशीहि एक कल्पना त्याच्या चित्तावर उमटली !

लीला मूकवृत्तीनें उभी होती, जगन्नाथहि स्तब्धच होता, परतु तेवढ्या थोड्या वेळात दोघाच्या मूककाय मनोव्यापाराचे जें युद्ध झालें, तें त्रिखंड व्यापण्याइतके विस्तृत होतें ! जणू काय त्या दोघानी प्रथम एकमेकाच्या अत करणावर उमटलेली स्वत चीं प्रतिबिंबें पहाण्यासाठीच ही मुग्धता स्वीकारली होती. पण हें मूकविद्यालय लवकरच बोलक्या विद्यार्थ्यांनीं गजबजून गेलें प्रथम बोलण्याचें धैर्य लीलेनेंच केले ती म्हणाली, " मजकडे तुही असे टक लावून काय पहाता ? "

या प्रश्नाचे काय उत्तर द्यावें ते जगन्नाथाला सुचेना ! तिच्याकडे आपण असे टक लावून का पहात आहों, हे स्वत जगन्नाथाला तरी कोठे माहित होतें. तो

स्तब्ध आहे, असें पाहून लीला पुन्हा म्हणाली, "बोलत कां नाहीं ? इतकी टक लावण्यासारखें माझ्यात काय आहे ?"

जगन्नाथास अजूनहि बोलण्यास धैर्य होईना! तो अस्पष्टपणें म्हणाला, "अशा या कुलवधूच्या पोशाकात तुला पाहीन, अशी माझी कल्पनाही नव्हती."

"तर तुमची काय कल्पना होती ?"

"त्या जबलपूरच्या स्टेशनावर तुला ज्या पोशाकात पाहिलें, त्याच पोशाकात आताहि पाहीन, असें मला वाटत होते."

"या अशा पोशाकात मी दिसणार नाही, अशी तुमची कल्पना का झाली ?" लीलेचा प्रश्न अगदी लहानसा होता, पण त्याचें उत्तर काय द्यावे, हेच जगन्नाथाला सुचेना पुन्हा एकवार त्याने आपादमस्तक लीलेचे निरीक्षण केलें आणि लीलेला काय उत्तर द्यावें, याचा तो विचार करू लागला. लीला म्हणाली, "एवढा विचार कसला करता ?"

जगन्नाथ म्हणाला, "कसला विचार करतो, तेंदेखील मला सागता येत नाहीं."

"का सागता येत नाही ?"

"मला वाटते तुझ्या पोशाकात व विचारात जो बदल झाला, त्यामुळे!"

"माझ्या विचाराची तुम्हाला काय माहिती ? माझ्या पोशाकात बदल होईल का नाही, हे पहावयाला तुम्ही पूर्वी किती वेळा आला होता ?"

"मी पूर्वी आलो नाही हा आजच प्रथम आलो"

"यापूर्वीच का नाहीं आला ?"

"धैर्य झालें नाही"

"तुम्हीं पुरुष आणि तुम्हाला धैर्य झाले नाही ?"

"होय पुरुष तर खराच, भीति कशाला म्हणतात, तेहि मला माहीत नाहीं; पण येथे यावयाला मन कचरत होते हेही खरे येण्यालाच काय, पण तुला पत्नी म्हणून म्हणण्याची देखील मला भीति वाटते!"

जगन्नाथाच्या म्हणण्याचा अर्थ लक्षात येऊनहि लीला मुद्दाम म्हणाली, "स्त्री नाहीं तर काय मी पुरुष आहे ? स्वत च्या पत्नीची तुम्हाला एवढी भीति वाटते ?"

"भीति वाटणे साहाजिकच आहे. मी खेड्यांत रहाणारा अशिक्षित आणि-"

" आणि मी शहरातल्या दांभिक, निर्घृण व विलासी वातावरणात वाढलेली पुस्तकी ज्ञानसंपन्न तरुणी ! पाहिजे तर त्याला शिक्षण म्हणा व मलाहि सुशिक्षित म्हणा, पण या शिक्षणाचा जगातल्या व्यवहाराला काहीहि उपयोग नाहीं. "

" का? त्याच्याचमुळें जगातले सारे व्यवहार अधिक जुलमी व अन्यायी होऊ लागले आहेत. हा या शिक्षणाचा व सुशिक्षिताचा काय जगाला थोडा उपयोग आहे? गरिबावर जुलूम करणें हाच जसा श्रीमंताना आपल्या संपत्तीचा सद्व्यय वाटतो, तसेंच अशिक्षिताचा उपहास करणें व त्याना फसवणे हे सुशिक्षिताना भूषण व कर्तव्य वाटते "

" या उपहासाच्या भीतीनें आला नाही, एवढेच ना? "

" नाही याशिवायहि आणखी एक दोन कारणे आहेत शिक्षणाप्रमाणेच तुझ्या सौंदर्यामुळेंहि मन कचरत होते ! "

हसत हसत लीला म्हणाली, " मी सुंदर आणि तुम्ही कुरूप ! तो पहा, भिंतीला टांगलेला एक मोठा आरसा आहे कोण सुंदर नी कोण कुरूप, ते तुम्हींच त्यात पाहून ठरवा ! "

" ते काही असले, तरी मी तुझ्याकडे येण्याला भीत होतो, हे मात्र खरे तुझे शिक्षण, तुझे सौंदर्य, तुझा पोषाख, तुझी ती नव्या पद्धतीची वागणूक आणि तुझे एकंदर वैभव याचा विचार मनात आला म्हणजे आपणा दोघात जमीन अस्मानाइतके अंतर आहे, असे मला वाटे मी खेड्यात रहाणारा, अशिक्षित आणि गावढळ, आणि तू शहरात राहणारी व सुशिक्षित, तेव्हा तुझ्याकडे येण्यास धैर्य तरी कसे होणार ?

जगन्नाथाच्या या शब्दात कोणावर कटाक्ष आहे, हे लीलेच्या तेव्हाच लक्षात आले ती म्हणाली, " समजले, तुम्ही काय म्हणता ते मुलगी जोपर्यंत लहान आहे, तोपर्यंत फार तर ती बापाच्या वैभवावर विसंबू शकेल पण तिचा विवाह झाल्यावर पतीची जी स्थिति असेल, तिचाच तिला अभिमान वाटतो व तीतच तिला सुखहि वाटते तात्पर्य स्त्री आपलें भाग्य बापाच्या वैभवाच्या मापानें केव्हाहि मोजीत नाहीं केवळ बाबाच्या वैभवाला भिऊन जर इतके दिवस येण्याला आपण भीत होता, तर तुमच्या अंगी असलेल्या धैर्यात सहिष्णुता नाहीं, असेच म्हणावे लागेल, पण तसे मी म्हणू इच्छित नाही कारण तुम्ही न येण्याचे खरे कारण मला माहीत आहे. बाबाजवळ विपुल पैसा असेल, पण मला त्याच्या श्रीमंतीपेक्षा तुमच्याच गरिबीचा अधिक अभिमान आहे ! नाहीं तरी संपत्तीचा जे सद्व्यय करतात,

तेच खरोखर श्रीमान् होत ! तुमची संपत्ति थोडी असेल; पण तिचा जो सदुपयोग तुम्हीं करीत आहां, तेंच औदार्याचें खरें लक्षण होय. मी सुंदर असेन, कदाचित् तुमच्यापेक्षांहि अधिक सुंदर असेन, पण त्यांत विशेष तें काय ? पुष्कळांना सुंदर स्त्रियांचा लाभ होतो. यावरून सुंदर स्त्रियांना वागविणें कठिण आहे, असें कांही नाहीं. थोडें फार शिकल्यें आहें, हेंहि खरें, पण तें शिक्षण कांहीं तुमच्या शिक्षणाहून अधिक योग्यतेचें नाही. शिक्षण, सौंदर्य आणि वैभव हीं कांहीं मनुष्यांच्या मोठेपणाचीं लक्षणें नव्हत. ज्याचें मन मोठें, ज्याचें अंतःकरण उदार, ज्याची बुद्धि निर्दोष, ज्यांना मनुष्यत्व हीच आपली संपत्ति वाटते, तेच खरोखर मोठे होत. आतां सांगा, तुम्ही मोठे की मी मोठी ? तुमची सदुद्यमशीलता, तुमचें कर्तृत्व, तुमची बाणेदार वृत्ति, तुमचा सतेज स्वभाव, तुमचें दयादाक्षिण्य यांचा कोणाला अभिमान वाटणार नाही ? मग मी तर तुमची स्त्रीच आहे ! परक्याकडून उसनी घेतलेली चालचलणूक आणि पोशाक हीं तुम्हांला आवडली नसतील, पण त्याला मी तरी काय करणार ? तुम्ही कधीं येऊन माझी चौकशी देखील केली नाही. तेव्हां ज्याच्या आश्रयानें रहावयाचें, त्याच्या मताप्रमाणें मी वागू नये तर काय करावें ? ”

या वेळीं अंतःकरणांत दाटलेलें दुःख उचंबळून आल्यामुळें लीलेचा कंठ दाटून आला होता आणि डोळेहि पाण्यानें भरून आले होते. लीलेशीं बोलण्याचा जगन्नाथाला आजवर केव्हांच प्रसंग न आल्यामुळें तिच्या स्वभावाची त्याला कांहींच कल्पना नव्हती. आज तिची भेट जगन्नाथाला कांहीं अशी प्रथम अशीच होती आणि तिचे शब्द तर त्याला अगदींच नवे होते. नानासाहेबांचा आणि आपला आज चांगलाच खटका उडेल आणि कदाचित् लीलेला दोन गोष्टी सांगाव्या लागतील, अशी त्याची समजूत होती. परंतु अनुभव मात्र अगदीं वेगळाच आला. आपण लीलेची आजवर जी अवहेलना केली, त्याचें माप लीलेनें आपल्याच पदरांत घातल्यामुळें त्याचेंहि हृदय गहिंवरून आल्यावाचून राहिलें नाही. हृदयांत दाटून राहिलेलें पत्नीप्रेम उसळून येऊं लागलें आणि त्यामुळें लीलेला पोटाशीं धरून तिचे अश्रु पुसावेत असें त्याला वाटूं लागलें, परंतु पहिलीच भेट असल्यामुळें तसें करण्यासहि त्याला धैर्य झालें नाही. दाटून आलेल्या कंठानें तो म्हणाला, “ ही खरोखरच माझ्या हातून मोठी चूक झाली ! पण ती कां झाली, तें मी तुला सांगितलेंच आहे ! तर आतां तूं माझ्याबरोबर सुंदरपुराला येणार म्हणावयाची ? ”

“ हो, नेलें तरी येणार, नाहीं नेलें तरी येणार ! माझा काय हक्क नाहीं ? ”

" मग हा हक्क यापूर्वीच कां नाहीं तुझ्या लक्षांत आला ? "

" माझा हक्क मी विसरलें नव्हतें, पण.तुम्हीं जर एकदासुद्धां येऊन चौकशीहि केली नाहीं, तर मी तरी काय करणार ?"

" केली नाहीं खरी, पण—"

" पण काय ? "

" आता तर तुला न्यावयाला आलो आहें ना ? "

" मीही तयारच आहें ! चला ! "

लीलेनें अशा रीतीनें पूर्ण समति दर्शविली खरी. परंतु त्यामुळे जगन्नाथाचा जीव मात्र साहजिक गोधळून गेला आपल्या सामर्थ्याच्या बाहेर असलेली जबाबदारी आपल्या शिरावर येऊन पडत आहे, असें त्याला वाटलें. किंचित् स्तब्ध राहून तो ह्मणाला, " पण तो सुदरपूरचा गरिबीचा ससार नानासाहेबांच्या इतका सुखसोयींनी अलकृत नाहीं. तेथे नौकर नाहींत आणि चाकरहि नाहींत. खेड्यातला गरिबीचा ससार चालवावयाचा म्हणजे त्याला चागलीच श्रमसहिष्णुता लागते ती तुझ्यानें होईल कीं नाहीं, याची मला भीति वाटते दळावे लागेल, काडावे लागेल, पाणी काढावे लागेल आणखी दुसरी अनेक कामे करावीं लागतील ! "

" त्यात काय मोठेसें ! हीं कामे जर माणसेंच करीत असतील, तर मीहि तीं करीन. इतर मनुष्यापेक्षा मी भिन्न आहें, असे समजण्याचे काहीच कारण नाही."

आतां मात्र जगन्नाथाचे हृदय फारच गहिवरून आलें खुर्चीवरून उठून तो लीलेजवळ गेला आणि गहिवरून म्हणाला, " लीला ! "

लीला हसत हसत विस्मय दर्शवून म्हणाली, " लीला ! लीला ती कोण ? मी तर आपली रुक्मिणी आहें ! "

" खरेंच तू रुक्मिणी ! " असे म्हणून जगन्नाथ जवळ गेला आणि त्यानें लीलेला हृदयाशीं कुरवाळून धरलें. लीलेनेंहि मोठ्या आनंदानें आपल्या देहलतिकेचा भार पतीच्या अगावर टाकला ! मधुर व प्रेममय दृष्टीनें पतीकडे पाहून ती म्हणाली, " तर इतके दिवस मी आपली खोटीच रुक्मिणी होते ना ? "

लीलेला सोडून व थोडा दूर होऊन जगन्नाथ म्हणाला, " नाहीं तू खोटी नव्हतीस; हा जगन्नाथच खोटा होता ! खोट्या कल्पनेनें तो भलत्याच दिशेनें चालला होता ! त्यामुळें मी तर कष्ट भोगलेच, पण तुझा अपराध नसतां तुलाही कष्ट दिले ! तुला मी कांहींसा विसरलों होतो हेंदेखील खरें, पण जबलपूरच्या

स्टेशनावर तुझी ती चिंताक्रांत मूर्ति जेव्हां माझ्या दृष्टीस पडली, तेव्हां मात्र अतःकरणास फार वेदना झाल्या ! त्यांत त्या पशूनें तुझा अपमान केल्यामुळें तर तुझी मूर्ति दृष्टीसमोरून हलेनाशी झाली ! ते हृदयशल्य अत करणातल्या फारच खोल जागीं रुतलें ! पण काय करणार ! तुझ्याकडे येण्याचें कांहीं धैर्य झालें नाहीं ! मी स्वत-चाच धिक्कार केला आणि स्वस्थ राहिलो ! ''

लीला कांहींशी खिन्न होऊन म्हणाली, '' पुरुषाचें निराळें आणि स्त्रियाचें निराळें. विवाह झाला त्या दिवसापासून एक क्षणभरहि मी आपणास विसरलें नाहीं ! पति म्हणून मी आपली सारखी मनात पूजा करीत होते ! जबलपूरच्या स्टेशनावर आपण माझी विटबना टाळल्यामुळे तर इतरापेक्षा आपला पतिपत्नी-सबध अधिक बळकट आहे, असे मला वाटू लागलें ! त्यात आणखी तुम्हांला शिक्षा झाल्याचे जेव्हा समजले, तेव्हा हा जीव तुमच्यावरून ओंवाळून टाकावा, असेही वाटू लागलें. बाबाचा निरोप घ्यावा आणि तिकडे यावे, असें किती तरी वेळा मनांत आलें, पण बाबाच्या या अशा वर्तणुकीमुळें लोकात अनेक गोष्टी पसरल्या आहेत. आम्हाला ना जात ना धर्म असेंदेखील लोक म्हणतात व लोकाच्या या म्हणण्यात काहीं अर्थ नाही, असेंहि नाही. म्हणून मलाहि तुमच्याकडे येण्याला धैर्य झाले नाहीं. ''

'' पण अशा लोकनिंदेच्या भीतीने तुझ्यासारख्या साध्वी स्त्रीला दूर लोटण्या-इतका जगन्नाथ भित्रा नाही आणि मूर्खहि नाही ''

लीला म्हणाली, '' छे छे ! ते माझ्या मनात देखील आले नाही. मी आल्यावर माझा मोठ्या सतोषानें स्वीकार होईल, हे मला माहीत होते, पण माझ्यामुळें तुमचा समाजांतला मानमरातब कमी होईल, अशी मला भीति वाटू लागली. केवळ तुमचा लौकिक साभाळण्यासाठीं मी अशी दिवस कठित राहिलें. ''

'' तसें असेल, तर या मानापमानाच्या कल्पनेने आपणा दोघासहि चागलेच चकविलें म्हणावयाचें ! तू जसा माझा लौकिक साभाळलास, तसें मात्र मीं केलें नाहीं. मी तुला सन्मानाने नेण्यासाठी आलो आहे ! ''

लीला हसत हसत म्हणाली, '' होय, ते मला अगोदरच समजलें. मी रुक्मिणीच्या पोशाकात तुमच्यापुढे उभी आहे, याचे कारणहि तेंच. ''

'' तुझ्या म्हणण्याचा अर्थ माझ्या लक्षात आला नाही ! ''

रुक्मिणीनें दरवाजाकडे वळून ' चद्रभागा ' म्हणून हांक मारली. त्या बरोबर भागू नम्रपणें बाहेर येऊन लीलेजवळ उभी राहिली. तिला जगन्नाथानें तेव्हाच

ओळखलें. तो आश्चर्यानें म्हणाला, " ही बैरागीण ! हिनें तुमची नौकरी सोडली होती ना ? "

बैरागीण हसत हसत म्हणाली, " होय दादासाहेब. नौकरी सोडली होती, पण पुन्हां येऊन धरली ! पुन्हा आतां ही नौकरी सोडणार नाहीं व त्याच्या जामीन-कीबद्दल तुम्ही दिलेलें लुगडें आणि खण हीं ताईसाहेबानीं घेतलीं. त्या आतां नेसल्या आहेत, तें तेंच लुगडें !"

भागूचे हे शब्द ऐकून जगन्नाथानें आपली प्रेमपूर्ण दृष्टि रुक्मिणीवर वळविली. रुक्मिणीविषयीं त्याच्या अंतःकरणात प्रेमभाव व पूज्यभाव हे दोन्हीहि दाटून आले ! तो लीलेला म्हणाला, " मला असें माहीत असतें, तर मी यापेक्षा अधिक चांगलें लुगडें हिच्याबरोबर पाठविलें असते ! "

" पण तें सभ्य गृहस्थाच्या बायकोला शोभले नसते ! "

आपली स्त्री किती सरळ व उदार वृत्तीची आहे व स्वाभाविक साधेपणानें राहणें तिला किती आवडते, हे लक्षात आल्यामुळे जगन्नाथाच्या चित्तात साह-जिक समाधान उत्पन्न झालें तो म्हणाला, " तिला तू पाठविले होतेस, हे तिनें मला मुळींच कळू दिलें नाहीं ! "

लीला म्हणाली, " मींच तिला तसें सांगितलें होते !"

" कां ? "

लीला हसून म्हणाली, " तुमचें मानधन म्हणजे तुमची स्त्री ! हें मानधन सांभाळण्यास तुमचे तुम्हीच समर्थ आहां, हें जगाला कळावे म्हणून ! "

लीलेचे हे शब्द ऐकून वसंतावरोबर होणाऱ्या लीलेच्या द्वितीय लग्नाची गोष्ट जगन्नाथाच्या लक्षात आली आणि त्यामुळें त्याचा चेहरा लाल झाला, पण हा संताप तत्क्षणीं शांत झाला. आपले मानधन आपण वेळींच सांभाळलें, यातच त्याला परमानंद झाला आणि लीला अशा रीतीनें जगन्नाथाच्या अंतःकरणातील अत्यंत उच्च व पवित्र सिंहासनावर अधिष्ठित झाली ! लीलेला पुन्हां एकवार कडकडून भेटावे असें त्याला वाटलें, पण चंद्रभागा जवळ असल्यामुळें तसें कर-ण्यास त्याचें मन धजेना. तो लीलेला म्हणाला, " तुझें हें माझ्यावरील सात्विक प्रेम पाहून आणि तुझें बुद्धिचातुर्य पाहून तुला कोठे ठेवावे असें मला झालें आहे ! "

गालांतल्या गालात हसून लीला म्हणाली, " दासी म्हणून पायांजवळ ठेवा म्हणजे झालें !"

" छे ! अशा रत्नाला कोणी पायाजवळ ठेवतात ? त्याला मस्तकावर धारण केलें पाहिजे ! "

" आपण असें म्हणून मला हिणवू नये आपल्या पायांची सेवा करणें हाच माझा अधिकार आणि तेंच माझें खरें वैभव व सुख ! "

" तर सद्गृहस्थाचें खरें वैभव आजपासून मलाहि लाभलें, असें म्हटलें पाहिजे. चल तर मग तुझ्या स्वत च्या घरीं ! पण—"

" पण काय ? "

" तुझे वडील घरांत नसता तुला कसें न्यावे ?"

" हो, तेहि खरेंच इतके दिवस वाट पाहून शेवटीं बायकोला पळवून नेलें, असे कोणी म्हणावयाला नको !" असें म्हणून लीला हंसू लागली.

जगन्नाथ म्हणाला, " होय, यातच दोघाचाहि मान आहे ! नानासाहेब आल्यावर मी तुला नेईन त्यानीं कितीहि अडचणी उपस्थित केल्या, तरी त्याच्या समक्ष तुला नेण्याचे सामर्थ्य माझ्या अगीं आहे ते केव्हा येतील ? "

" उद्या सकाळी किंवा आज रात्रींहि येतील "

" तर मी जातो आता उद्या असा याच वेळी येईन "

जगन्नाथ लागलाच उठला, पण त्याची पावलें फार जड पडू लागली ! लीला त्याला पोहोचविण्यासाठी दिवाणखान्याच्या दरवाजापर्यंत गेली इतका वेळ टवटवीत दिसणारा तिचा चेहरा पुन्हा कोमेजू लागला. तिचे डोळेहि पाण्याने भरून आले. हे पाहून तिचे सातवन कसे करावे, ते जगन्नाथाला सुचेना. त्याने तिला कुरवाळून तिच्या आरक्त व गोडस गालाचे एक गोड चुबन घेतले आणि तो तिला सोडून तसाच निघून गेला ! भागू या आधीच आत गेली होती लीला तिच्या खोलीत येताच ती म्हणाली, " ताईसाहेब, हातची शिकार सोडलीत ! "

डोळे पुशीत पुशीत लीला म्हणाली, " चद्रभागा, परक्याच्या घरात त्याना ' आजचा दिवस रहा ' म्हणून म्हणण्याचा मला काय अधिकार ? आणि ते तरी एकाद्या आगातुकाप्रमाणे येथे काय म्हणून राहतील ? "

— — —

## प्रकरण सोळावे.

—०·.—

गेल्या पांचसहा दिवसांपासून नानासाहेबांच्या स्वभावात विलक्षण पालट झालेला दृष्टीस पडत होता. त्यांच्या प्रत्येक कृतीत अस्थिरता आढळून येत होती. कारण नसतां मध्येच केंव्हा तरी आपल्या नोकरचाकरावर ते रागावत होते. तसेंच केंव्हा तरी ते नोकराची थट्टा मस्करीही करीत होते. कारण नसता उगीच गाडी जोडावयाला सागून बाहेर भटकावयाला जात व लगेच परतहि येत. या दिवाणखान्यातून त्या दिवाणखान्यात उगीच हिंडत. जरा त्रासल्यासारखे वाटले म्हणजे, चहा नाही तर व्हिस्की घेत. त्याच्या स्वभावात हा असा बदल का झाला होता, हे निश्चितपणें जरी कोणास सागता येण्यासारखे नव्हते, तरी साधारणपणें याच सुमारास विठ्ठलराव आणि वसतराव हे कोठे बाहेरगावी निघून गेल्यामुळें नानासाहेबाच्या स्वभावात कदाचित् असा पालट झाला असेल, असेही पुष्कळाना वाटत होते.

नानासाहेबाची मन स्थिति अशी चमत्कारिक होण्याचे वास्तविक कारण निराळेंच होतें. विठ्ठलराव व वसतराव हे दोघेही नसल्यामुळें त्याना करमेनागें होणें साहजिक होय, पण त्याबरोबर त्याचे मोकळे झालेलें मन त्याच्याजवळ जेंव्हा त्यांच्या इतक्या दिवसांच्या सुधारणेचा हिशोब मागू लागलें, तेंव्हा आपण काय कमाई केली, हें स्वत· नानासाहेबांनाहि सागता येईना. चार लोक ‘ भले नानासाहेब ! ’ म्हणून म्हणतात, पण आपल्या या सुधारणेच्या व्यवहारात खरोखरच भलाईकीचा किती अश आहे, हें जेंव्हां नानासाहेब शोधू लागले, तेंव्हा त्यांना खऱ्या खोट्याचा कांहींच उमज पडेना

कीर्तिलोलुपता हेंदेखील एक व्यसन आहे. मद्य अथवा अन्य दुष्ट व्यसनासारखे ते घातकी नसेल, पण थोडा सूक्ष्म विचार करून पाहिल्यास आणि इतिहासाचेंहि थोडें सूक्ष्म आलोचन केल्यास या कीर्तीच्या व्यसनानें राष्ट्रे आणि मोठाल्या व्यक्तीहि करू नये तशा कृत्याला बळी पडलेल्या दिसतात. एखादा दरवडेखोर त्याच धद्यात यशस्वी होत होत राजा झाल्यास, त्याचे सगळे दरवडे त्याच्या कीर्तीत भर घालतात आणि तोच अपयशी झाल्यास त्याच्या अपकीर्तीसहि तेच दरवडे कारण होतात ! ही जी राजकीय घडामोड, तीच सामाजिक कीर्तीच्या

लालसेतहि आढळून येते समाजाचें कल्याण हा उगीच बुरखा असतो, या बुर-ख्याच्या आत निराळेंच असतें. ' स्वत च्या कीर्तीचे गाठोडें बाजूला ठेवून आपण थोडें लोककल्याण साधू या ' असा निश्चय करून केवळ कर्तव्यासाठीं सदुद्योग करणारे काहीं महात्मे आहेत हें खरें, पण ते सदुद्योग करीत गेल्यामुळें कीर्ति मात्र त्यांच्या मागे राहिली, हें लक्षात ठेवण्यासारखें आहे. या पळण्याच्या शर्यतीत ते महात्मे सदुद्योगाच्या मागें लागल्यामुळें पुढें गेले आणि कीर्ति बिचारी तशीच मागें राहिली ! याला त्या महात्म्यांनीं तरी काय करावें ? उलटपक्षी जे कीर्तीच्या मागें लागतात, त्याची कीर्ति पुढें निघून जाते आणि ते स्वत —जड—मागें राहतात ! त्याच्या कार्याची ओळखहि कोणास रहात नाहीं जगाच्या आरंभापा-सूनचा इतिहास हेंच शिकवीत आला आहे, तथापि या कीर्तीचे व्यसन इतके विल क्षण आहे कीं, ' आमच्या समाजाच्या कल्याणासाठी मी अमुक केलें, व अमुक करणार आणि मी म्हणतो त्याप्रमाणे सगळ्यानी आचरण केलें पाहिजे, ' असे म्हणणारे साधुसत आजहि रस्तोरस्ती आढळतात !

नानासाहेबाची स्थितीहि अशीच झाली होती त्याच्या भोवती गोळा झालेली मडळी 'वा ! नानासाहेब !' म्हणून म्हणत होती आणि या 'वा ! नानासाहेब' या व्यसनामुळें त्याना आपलें कार्य अत्यत महत्त्वाचे वाटत होते. काडी मोडण्याचा हक्क आणि जिवत पतीच्या स्त्रीला पहिल्या नवऱ्यास टाकून दुसरा नवरा करण्याचा हक्क हे दोन हक्क आपल्या समाजाला सपादन करून देण्याचे कार्य जणू काय परमेश्वरानेंच आपल्या शिरावर टाकले आहे, असें त्याना वाटत होते आणि या कार्यात आपण यशस्वी झाल्यास पडित विद्यासागराप्रमाणे आपलाहि यशोदुन्दुभि वाजत राहील, असें त्याना वाटत होतें या एका व्यसनाला बळी पडल्यामुळे लीला व वसत यांचे लग्न, ही एकच गोष्ट त्यास सदोदित दिसे आणि त्यामुळे भोंवतालचे बरें वाईट त्याना काहीं दिसेनासे झाले होते शिकारी एक डोळा मिटून निशाणाकडे पाहू लागला म्हणजे त्याला त्याशिवाय जसे काही दिसत नाही, तीच स्थिति नानासाहेबाची झाली होती. बालविवाह हा वाईट असें एकदा डोक्यांत शिरल्यावर जगन्नाथ त्याना सर्वथैव अयोग्य वाटू लागला होता. जग-न्नाथाच्या शेंकडों सद्गुणांकडे त्यांचे लक्षच जात नव्हते. उलटपक्षी प्रौढविवाह हाच योग्य आणि श्रेयस्कर होय, असें ठरल्यावर वसतासारख्या चारित्र्यहीन भीरु तरु-णाचे शेकडो दोष त्यांना दिसेनासे झाले होते. लीलेचा द्वितीय विवाह हेंच त्याना त्यांचें मुख्य कर्तव्य वाटत होतें.

आपले भावी श्वशुर इतके कर्तव्यरत झाले आहेत व विवाहाचा दिवस जवळ जवळ येत चालला आहे, असें पाहून नवे जामात वसंतराव यांनीं काहीं करारमदार करण्याचें नानासाहेबांकडे बोलणें लावलें आणि हें बोलणें लवकर फलद्रूप व्हावें म्हणून वसंतासह विठ्ठलराव चार दिवस बाहेरगावीं गेले होते नानासाहेबांचीहि त्याचमुळें मोठी गडबड उडाली होती. त्याच्या कार्याची परिणतावस्था अगदीं जवळ आल्यामुळेंच त्यांचें मन त्याच्याजवळ त्याच्या कर्तृत्वाचा हिशेब मागत होतें अनेक दिवसाच्या प्रचड कार्यांच्या फलप्राप्तीच्या वेळीं मन किती भयशकित होते, याचा अनुभव प्रत्येकास आहेच तेंव्हा अशा स्थितींत नानासाहेबाची अस्थिरता सर्वांच्या निदर्शनास यावी, यात काही मोठेंसे नवल नाहीं

नानासाहेबाचे हे मानसिक अस्वास्थ्य एकसारखे वाढतच चाललें होतें याच सुमारास त्याच्या मित्रमडळीचे त्याच्याकडे येणें जाणें बरेंच कमी झालें आहे, असेहि त्याना आढळून आलें विठ्ठलराव आणि वसत हे येण्याची मुदत टळून दोनतीन दिवस अधिक झाले, तरी अद्यापि आले नाहीत, हे पाहून त्याच्या मनात अनेक शका कुशका उत्पन्न होऊ लागल्या इतक्यात वसत मुबईसच आहे, अशी गुणगुण त्याच्या कानावर आल्यामुळें तर त्याना साहजिकच चमत्कारिक वाटू लागले

आजहि दुपारीं ते कोणा मित्राला भेटण्यासाठीं किंवा अन्य कांही कारणासाठीं एका हॉटेलमध्ये गेले होते थोड्या वेळानें परत फिरून ते दिवाणखान्यात येतात, तोंच एका खुर्चीवर जगन्नाथ बसलेला त्याना दिसला ! त्याला पाहिल्याबरोबर नानासाहेबाना विलक्षण सताप आला व तेथून त्याला घालवून द्यावें, असेंहि त्याना वाटूं लागलें, पण तसे करणें बरे नाही, असे त्यानाच पुन्हा वाटलें. जणू काय त्याची व आपली काहीं ओळखच नाही, अशा दृष्टीने ते त्याच्याकडे प्रथम पाहू लागले नानासाहेबाना पाहताच जगन्नाथ मात्र खुर्चीवरून उठला आणि श्वशुराना नमस्कार करून पुन्हा तो खुर्चीवर बसला. आपली साहेबी टोपी टेबलावर ठेवून व तिच्याजवळच हातात धरावयाची काठी आडवी टाकून, प्रथम त्यानीं विजेचा पखा चालू केला. नतर एक चिरूट घेऊन तो पेटविला आणि जगन्नाथासमोरच एका खुर्चीवर ते बसले. प्रथम नानासाहेब काहींसे सचिंतच होते. जगन्नाथाविषयीं शक्य तितका तिरस्कार दर्शवावा, असेंहि त्यांना वाटलें, परतु जगन्नाथाची ती शात, भव्य व सतेज मूर्ति पाहून तसें करण्याचें त्याना धैर्य झालें नाहीं ! या वेळी नानासाहेबांना जर कोणी जगन्नाथात कोणते दोष आहेत,

असा प्रश्न केला असता, तर या प्रश्नाचें स्पष्टीकरण करताना त्याचे मोठे हाल झाले असते ! परंतु पूर्वीपासून त्यांचे मनात जगन्नाथाविषयी तिरस्कार असल्यामुळें आतांहि त्याच्याविषयीं त्यास तिरस्कारच उत्पन्न झाला. आता जगन्नाथाची ती तेजस्विता पाहून तो व्यक्त करण्याचें धैर्य मात्र त्याना झाले नाही. आपल्या विद्वत्तेनें, वैभवाच्या दर्पानें आणि आपल्या नवीन मताची जगन्नाथावर छाप बसवून, मोठ्या कुशलतेनें ही पीडा येथून आली तशी परत घालविली पाहिजे, असा विचार करून आणि मनातल्या मनात तशी योजना करून त्यानीं बोलण्यास आरभ केला.

श्रीमतानीं गरिबाशी कसे वागावे, हे नानासाहेबाना माहीत असल्यामुळे ते तुसडेपणानें म्हणाले, " तुमचें नांव काय ? "

श्रीमताचा हा शिष्टाचार पाहून जगन्नाथ मात्र मनातल्या मनात हसला तो शातपणे म्हणाला, " माझे नाव जगन्नाथ मी सुदरपुराहून आलो आहे "

एकदम आठवल्यासारखे करून नानासाहेब म्हणाले, " ओहो ! आले लक्षात ! विनायकरावाचे तुम्ही चिरजीव, नाही का ? "

" हो. "

" तुम्ही अमेरिकेत जाऊन शेतकीचे शिक्षण सपादन करून आला, त्यापेक्षा विलायतेस जाऊन बॅरिस्टर होऊन का आला नाही ? तितके बुद्धिसामर्थ्य नसल्यामुळे ! नाही का ? "

" बुद्धिसामर्थ्याच्या दृष्टीने म्हणाल, तर त्या बाबतीत परमेश्वराने माझ्याशी मुळीच कृपणपणा केलेला नाही, असें मी आपणास नम्रतेने कळवितो बुद्धिसामर्थ्य होते म्हणूनच मीं अमेरिकेत शेतकीच्या शिक्षणासाठी गेलो आणि त्यात भगवताने यशहि दिले. आता बुद्धिसामर्थ्यच नसते, तर माझ्या वडिलानी मला बहुतकरून विलायतेस बॅरिस्टरीच्या परीक्षेसाठी पाठविलें असते. "

" आपणास जी गोष्ट माहीत नसेल, त्याबद्दल असा तर्कवितर्क करणे योग्य नव्हे बॅरिस्टरीची परीक्षा सोपी असते, हा केवळ तुमचा भ्रम आहे ! "

" भ्रमात बडबड करण्याचे माझ्या नशिबी ब्रह्मदेवाने लिहिलेलें नाही, हे मला पक्के माहीत आहे खालच्या कोर्टातल्या वकिलाना जितकें कायद्याचे ज्ञान असते, तितके देखील काही बॅरिस्टराना नसते, हे आता सगळ्यांना कळून चुकले आहे. केवळ ' विलायतचे वारकरी ' इतकेंच त्याना महत्व असते ! "

आपल्या उत्तरास चोख प्रत्युत्तर मिळालेलें पुष्कळांना खपत नाहीं. नानासाहेबाचा स्वभावहि असाच होता आणि त्याच्या जवळच्या मित्रवर्गांनीं 'वा! नानासाहेब!' असे म्हणून म्हणून हा त्याचा स्वभाव अधिकच दृढ केला होता. ते म्हणाले, 'तुमची ही अगदीं चुकीची समजूत झालेली आहे. बॅरिस्टरच्या परिक्षेला शेतकीच्या शिक्षणापेक्षा खचित अधिक बुद्धि लागते शिवाय आज समाजाचें व राष्ट्राचे हित कोण साधीत आहेत, याचाहि विचार केला पाहिजे. तुमच्या या शेतकीच्या शिक्षणानें राष्ट्राचा किंवा समाजाचा काय फायदा होणार आहे? तुम्ही आज कोणत्याहि सभेला जा अगर व्याख्यानाला जा, तेथें पुढारी म्हणून कोण दिसतात?"

जगन्नाथाला आता खरोखरच हसू आलें तरी ते तसेंच दाबून तो म्हणाला, "पण या तुमच्या फोनोग्राफी कर्तव्यानें जर आमच्या समाजाचें आणि राष्ट्राचे कल्याण होणार असले तर ते आम्हाला नको आहे, असें नाहीं पण तसें होईल कीं नाहीं, यासबधानें मात्र मी आणि माझ्या सारखे अर्धकच्चे लोक साशक आहेत, हे मी मोकळेपणानें कबूल करतों. कार्य कितीहि उत्तम असलें तरी ते करणाऱ्या व्यक्तीच्या दानतीचाहि विचार करावा लागतो. समाजाचें व राष्ट्राचें कल्याण साधण्यासाठीं केवळ वल्गना करणारे व्यक्तिदृष्ट्या किती चारित्र्यहीन असतात, याचा आपण केव्हा विचार केला आहे काय? अशा चारित्र्यहीन व्यक्तीच्या मागें यश धावत जाईल काय? आपण माझ्यापेक्षा वडील आहा, तेव्हा हे मीं आपणास सागावयाला पाहिजे असे नाही राष्ट्राची आधीं दानत जाते आणि मग वैभव जाते. हा त्रिकालाबाधित नियम आहे तेव्हा ज्या व्यक्तींना दानत नाहीं, त्या व्यक्ति राष्ट्राचें कल्याण साधू शकतील, हें केव्हातरी शक्य आहे काय? जो नियम राष्ट्राला तोच नियम समाजालाहि लागू आहे."

जगन्नाथाचे हे शब्द ऐकून तो आपणाशी सरळ बोलत नसून आपली निंदा करीत आहे, असे नानासाहेबाना वाटलें. ते त्रासून म्हणाले, "आणि अडाणी व अशिक्षित अशा शेतकऱ्यात मिसळण्याचा उद्योग तुम्हाला स्वदेशकल्याणाचा वाटतो?"

जगन्नाथ म्हणाला, "होय, अलबत! आपल्या दरिद्री बांधवाचा तिरस्कार करणें ज्याना भूषणास्पद वाटत असेल, त्यांना तसें खुशाल वाटो, पण मी तर त्यांना मस्तकावर धारण करीन. या आमच्या दरिद्री बांधवांचें सच्छील, निष्कपटवृत्ति, मनाचा थोरपणा, दुसऱ्याला सकटात पाहून तेथें धांवून जाण्याची तत्परता

वगैरे सद्गुणांपैकीं सुशिक्षितांच्या वांट्याला कोणता सद्गुण आला आहे? एकादा दरिद्री क्वचित् प्रसंगीं पोटासाठीं चोरीही करतांना आढळेल; पण पोटांत आग पेटल्यावर कोण काय करीत नाहीं? पण असें असलें तरी समाजांत दृष्टीस पडणारे विश्वासघात, दगलबाजपणाचीं कृत्यें, खोटे कागदपत्र, कायदेशीर फसवेगिरी आणि गळेकापूपणा असल्या सभ्य पापानीं हे अडाणी देशबधू केव्हांहि आपले हात विटाळून घेत नाहींत. ते दरिद्री आहेत, हा अपराध त्याचा नव्हे, तर देशांतल्या रक्तपिपासू श्रीमताचा आहे गरिबांचा निढळाचा घाम व त्याचे श्रमसहिष्णुत्व ज्याला लागलेलीं नाहीत, असा एक पैसाहि जगांत नाहीं. ज्याना आपल्या श्रीमतीबद्दल मोठा डौल वाटत असेल त्यानीं हें लक्षांत ठेवावे कीं, त्यानीं आपल्या घरात गरिबाच्या शरीरातलें रक्त आणून ठेविलेलें आहे! ओघानेंच या रक्ताचे विष होईल आणि ते विष श्रीमंताना मारक झाल्यावाचून केव्हाहि राहणार नाहीं. आमच्या देशाचा शेतकरी वर्ग हाच राष्ट्राचा पाया आहे. तो भक्कम न करतां केवळ राष्ट्रमदिराच्या कळसाला झिलई देण्यानें हें मदिर किती दिवस उभे राहील? ब्यारिस्टरीपेक्षा माझ्या शिक्षणाचा राष्ट्राला जास्त उपयोग आहे कीं नाही, हे आपण स्वत सुदरपूरला येऊन मी ज्या शेतकऱ्यांना हाताशीं धरलें आहे, त्याची स्थिति पहा, म्हणजे दिसून येईल!"

जगन्नाथाचें म्हणणें सयुक्तिक होते, तरी पण तें नानासाहेबाना पटलें नाहीं. जगन्नाथ हा नखशिखात अडाणी, अशिक्षित, असभ्य व आडदांड आहे, असें त्याच्या रोमरोमात शिरलेलें असल्यामुळें त्यांना तो कांहीं तरी बडबडत आहे, असे वाटत होते जावईबोवा जणू आपलें प्रशसापत्रकच आपणापुढें सादर करीत आहेत, असें मनात येऊन नानासाहेबाना हसू कोसळलें. ते म्हणाले, "तितकी तसदी घेण्याचें मला कांहीं कारण दिसत नाहीं. असला सदुद्योग सोडून, इकडे वेळ घालावयाला कशाला आला?"

"माझ्या उद्योगात खळ पडणार नाहीं, अशी व्यवस्था करूनच मी इकडे आलों आहें!"

"पण असला सदुद्योग सोडून येण्याचें कारण तरी कोणतें?"

"माझी पत्नी आपल्या घरी आहे, तिला नेण्यासाठीं!"

नानासाहेब एकदम खुर्चीवर ताठ बसून क्रोधकपित स्वरानें म्हणाले, "तुम्ही कोठें आहां आणि कोणाशीं बोलत आहां, हें लक्षांत आहे ना? येथें आपली पत्नी वगैरे कोणी नाहीं!"

जगन्नाथ मुद्दामच शांतपणें म्हणाला, "आपणास विस्मृति पडली असावी, असें दिसते. येथे माझी पत्नी आहे, अशी माझी खात्री झाल्यावाचून मी आलो नाहीं!"

नानासाहेबाचा राग वाढतच चालला. ते म्हणाले, "खात्री कसली? तुम्हाला भ्रम झाला आहे! कोणती तुमची पत्नी?"

जगन्नाथ अजूनहि शांतच होता तो म्हणाला, "आपली मुलगी लीला! तीच माझी पत्नी! तिला नेण्यासाठीं मी आलों आहें!"

एकदम गर्जना करून नानासाहेब म्हणाले, "माझी लीला, तुमची पत्नी! हें कोणी तुम्हाला सांगितलें? तुम्हाला भ्रम तर झाला नाहीं?"

"नाहीं. तसली सवय मला नाहीं आपली लीला हीच माझी पत्नी आणि तिलाच नेण्यासाठी मी आलो आहे!"

"माझ्या मुलीला आपली पत्नी म्हणण्यास तुम्हाला काहीच दिक्कत वाटत नाही?"

"आपल्या पत्नीला पत्नी म्हणण्याचा हक्क प्रत्येक पतीला आहे!"

"असेल, पण माझ्या लीलेवर तो हक्क सांगण्याचा तुला अधिकार नाही! लहान तोंडीं मोठा घास घेण्याची तुला ही बुद्धि तरी कोठून झाली? हे जर लीलेला समजले, तर लीला तुझा किती धिक्कार करील, हे तुला माहीत आहे? एका सुशिक्षित व सभ्य तरुणीस तुझ्यासारख्या गावढळाने पत्नी म्हणून म्हणावे, हा लीलेचा खचित अपमान होय! हा अपमान लीला सहन करणार नाहीं आणि मीहि पण करणार नाही!"

नानासाहेबाचा राग बराच वाढल्यामुळें त्याची मजल आता जगन्नाथाला 'अरे तुरे' म्हणण्यापर्यंत गेली होती त्याचा तो उद्धटपणा पाहून जगन्नाथालाहि फार राग आला, पण लीलेला वाईट वाटेल म्हणून तशा उद्धटपणाने उलट बोलणें त्याला बरें वाटलें नाही तरी पण त्याचा स्वर थोडा मोठा झाल्यावाचून राहिला नाही. तो म्हणाला, "तुम्हाला यात जर अपमान वाटत असेल, तर खुशाल वाटो, परंतु मी तिला नेण्यास आलो, याबद्दल तिला सन्मानच वाटेल. पत्नीचा सन्मान राखण्यासाठीच इतक्या लांब मी आलों आहें. माझें हे करणें जर लीलेला अपमानास्पद वाटण्यासारखें असतें, तर मी मुळींच आलों नसतों!"

टेबलावर जोरानें मुष्टिघात करून नानासाहेब त्वेषानें म्हणाले, " हा सन्मान नाहीं; हा अपमान आहे ! मी याबद्दल तुला एकवार क्षमा करतों ! जा, येथून चालता हो ! "

जगन्नाथाचाहि संताप चढत चालला त्याच्या स्वरांत फारसा बदल झाला नाही, हे खरे, पण त्याचा चेहरा लाल झाला होता. तो म्हणाला, " मजवर तुमच्या क्षमेची याचना करण्याचा प्रसंग केव्हांहि येणार नाहीं मी लीलेचा सन्मान ठेवीत आहे, पण तिचा अपमान करावा, अशी मात्र तुमची इच्छा दिसते. तिला आपण गुण्यागोविंदानें माझ्याबरोबर पाठवा, नाही तर तुम्हाला नाखुष करून मला तिला न्यावे लागेल ! "

आपल्या बुटाच्या लाथेनें सगळा दिवाणखाना हादरवून सोडून नानासाहेब दात चावून म्हणाले, " काय ? एवढा उन्मत्तपणा ! असभ्य, जंगली ! माझ्या परवानगीवाचून येथे आलास, म्हणून तुला पोलिसच्या स्वाधीन करीन ! "

" पण दुसऱ्याच्या स्त्रीला तिची इच्छा नसता घरात ठेवणे, हा गुन्हा त्याही-पेक्षा भयंकर आहे ! "

जगन्नाथाचे ते शब्द ऐकून नानासाहेबानी मोठ्याने ' लीला, लीला ' अशी गर्जना केली लीलेचे या सगळ्या प्रकाराकडे लक्ष होतेच ! घडलेल्या प्रकारानें ती खरोखरच घाबरून गेली होती आणि मोठ्या पेंचातहि पडली होती दोघाचाहि राग शांत करण्यासाठीं काय करावे, याचा विचार करीत करीत पण भीतभीतच ती बाहेर आली ती आली ती लुगडे नेसून व अंगात चोळी घालूनच बाहेर आली, परंतु ती विशेष पुढे आली नसल्यामुळे व नानासाहेब संतप्त झालेले असल्यामुळे लीलेच्या पोशाखाकडे त्याचे लक्षच गेले नाही. बाहेर आल्याबरोबर नानासाहेब तिला उद्देशून म्हणाले, " लीला, हा पहा ! असभ्य जंगली जगन्नाथ तुझ्यावर आपल्या नवरेपणाचा हक्क सांगण्यासाठी आला आहे ! असल्या गावढळाला 'पति' म्हणून म्हणण्यास तू कबूल आहेस ? "

भीत भीत, अडखळत अडखळत अस्पष्टपणे लीला म्हणाली, " होय, बाबा ! "

लीलेचे ते शब्द ऐकताच डवचलेल्या भुजंगाप्रमाणे खुर्चीवरून ताडकन् उठून उभे राहून नानासाहेब लीलेच्या अंगावर ओरडून म्हणाले, " काय म्हणतेस लीला ? 'होय बाबा' म्हणून म्हणावयाला तुला काहींच शरम वाटत नाही ? या असभ्य धनगराला पाहून तुझ्या मनात काहींच तिरस्कार उत्पन्न होत नाहीं ? "

नानासाहेबाची ही आरडाओरड ऐकून एकदोन नोकर हळूच बाहेरून दिवाण-खान्यांत डोकावून पहात होते हें खरें, पण यांत कांहीं विशेष आहे, असे त्यांना वाटलें नाहीं. हॉटेल वगैरे ठिकाणाहून नानासाहेब आले म्हणजे केव्हा केव्हां ते असे ओरडतात, हें त्यांना माहीत झालेलें होतें. आमच्या विमलाबाईसाहेबांना तर या ठिकाणीं हजर राहण्याचें धैर्यच झालें नाहीं. आपले पतिराज मोठ्यानें बोलत असलेले ऐकून विमला तेथे आली, पण आत न येता बाहेरूनच सगळें नाटक पाहू लागली हातात एक बोचकें घेऊन भागूहि आतल्या दारात उभी राहून हें सारें नाटक पहात होती. लीलेच्या अतःकरणात इतका वेळ धस् धस् होत होते, पण नानासाहेबाचा दुसरा प्रश्न ऐकून ओघानेंच तिला थोडें वाईट वाटले व बापाचा रागहि आला. यामुळे तिची भीति दूर होऊन ती म्हणाली, " नाहीं बाबा. तिरस्कार कसा उत्पन्न होईल ? उलट—"

" उलट काय ? "

खालीं मान घालून सलज्जपणें लीला म्हणाली, " उलट असले पति मला लाभले, म्हणून मी मोठी भाग्यवान् आहे असें मला वाटते ! "

दात ओठ चावून विद्रूपस्वराने नानासाहेब म्हणाले, " आणि म्हणूनच वाटते हा पोशाख करून तयार होऊन आली आहेस ! लीला, धिक्कार असो तुला ! जा, चालती हो येथून ! "

नानासाहेब आपल्या खुर्चीजवळ आले आणि एकदम अंग टाकून देऊन खुर्चीवर बसले. काहीं वेळ ते शून्य दृष्टीनें भूमीकडे पहात होते या वेळी काय करावें आणि काय नाहीं, हें त्याना सुचेनासें झालें होतें. इतके दिवस कमावलेल्या आपल्या कीर्तिमंदिराचा डोलारा ढांसळून पडत आहे, असे त्याना वाटलें आणि त्यास मुख्य कारण आपली आवडती लीलाच आहे, हें पाहून तर त्याच्या चित्तात अत्यंत उद्वेग उत्पन्न झाला ! लीला थोडा वेळ तशीच उभी होती, पण लगेच 'पडत्या फळाची आज्ञा' या न्यायानें तिनें दरवाजाकडे आपलें तोंड वळविलें आणि दोन पावले टाकलीं देखील ! इतक्यात वर मान करून नानासाहेब म्हणाले, " थांब लीला, मी काय म्हणतो तें ऐक, आणि मग काय करावयाचे तें कर ! लीला, तुझ्याशिवाय मला दुसरें कोणीही नाहीं ! या सगळ्या संपत्तीची खरी मालकीण तूच आहेस, पण या जगन्नाथाकडे केव्हां ढुंकूनहि पहावयाचें नाहीं, असा निश्चय करून तू येथें राहिलीस, तर मात्र ही संपत्ति तुझी आहे, नाहीं तर एक कपर्दिकहि तुला मिळावयाची नाहीं ! "

बापलेकीच्या वादांत न पडता जगन्नाथ स्तब्ध बसून इतका वेळ सर्व काहीं ऐकत होता, परंतु नानासाहेबाचें हें शेवटचें वाक्य त्याला सहन झालें नाहीं. तो म्हणाला, " लीलेला आपल्या संपत्तीची मुळींसुद्धां गरज नाहीं. तिचें प्रतिपालन करण्याचें सामर्थ्य माझ्या अगीं आहे आणि म्हणूनच तिला नेण्यासाठी मी आलों आहे. आपल्या सपत्तीची तिनें आशा बाळगावी अशी तिची स्थिति नाहीं व माझी इच्छाही नाहीं ! "

जगन्नाथाकडे तिरस्कारानें पाहून नानासाहेब म्हणाले, "लीलेचें सरक्षण म्हणजे धनगराच्या मुलीचें सरक्षण नव्हे ! तिचेंच काय, पण तिच्या दासीचेंहि प्रतिपालन करण्याचे सामर्थ्य तुझ्या अगीं नाही ! "

वीज कडाडावी तशा खणखणाटाने जगन्नाथ उसळून नानासाहेबाना म्हणाला, " काय म्हणता? आपल्या पत्नीचें कसें सरक्षण केले पाहिजे, हें सागण्याचा अधिकार इतराना नाहीं. मी धनगर असेन तर आपल्या मुलीनेंहि धनगरीण होऊन राहिलें पाहिजे ! नानासाहेबाची मुलगी म्हणून मी तिचें सरक्षण करणार नाहीं, तर जगन्नाथाची पत्नी म्हणून तिचें सरक्षण करीन. असल्या वैभवावर जगन्नाथ लाथ मारतो आणि त्याची पत्नीहि पण त्याकडे ढुकून पाहू इच्छीत नाहीं."

जगन्नाथाची ही तेजस्विता पाहून इतक्या सतप्त स्थितींतहि नानासाहेबाच्या अतःकरणात भय उत्पन्न झालें ! थोडा वेळ स्तब्ध राहून ते लीलेला म्हणाले, " लीला, काय तर जाणार त्याच्याबरोबर तू? "

लीला खाली पहात पहात व पायाच्या आगठ्यानें लुगड्याचा घोळ चुरगळीत म्हणाली, " होय बाबा ! ते नेण्यास आल्यावर त्याच्याबरोबर जाणें, हे माझें कर्तव्यच आहे ! "

नानासाहेब उद्विग्नपणें म्हणाले, " कर्तव्य ! कर्तव्य कसलें? हे केवळ आनुवंशिक रक्ताचे दोष ! पति म्हटला म्हणजे तो देव ! मग तो शेबडा असो, मूर्ख असो वा असभ्य असो ! लीला तुझ्या या कृतीनें समाजांत तोंड दाखविण्यासहि मला जागा उरणार नाहीं "

लीला म्हणाली, "छे बाबा ! असें तुम्ही मनातदेखील आणू नका. ते माझे पति, तेव्हां त्याच्याबरोबर गेल्यानें लोकांत तुमची मानमान्यता वाढेल; पण कमी होणार नाहीं ! "

" योग्य अशा पतीबरोबर तू गेली असतीस, तर वाढली असती ! "

सकरुण दृष्टीनें बापाकडे पाहून लीला म्हणाली, " बाबा, तुम्ही त्याना निष्कारण अयोग्य समजता ! त्याची योग्यता खरोखर फार मोठी आहे ! मला तर वाटते, माझ्याहूनही अधिक योग्यतेचे पति मला मिळाले आहेत "

नानासाहेब हताशतेनें म्हणाले, " मूर्ख, वेडी ! रत्नाची योग्यता स्वत. रत्नाला कळत नसते ! त्याला पैलू पाडणाऱ्या कारागिरालाच ती कळते सभ्यता आणि शिष्टाचार ही मी तुला शिकविली, उच्च शिक्षणहि तुला दिले, पण त्याचा उपयोग काय ? माझे सगळे श्रम फुकट गेले ! "

लीला विनम्रपणें म्हणाली, " नाहीं बाबा. तुम्हीं दिलेले शिक्षण मी सपादन केलें आणि त्याचा योग्य विचार करीत गेले म्हणूनच मला माझ्या कर्तव्याची ओळख झाली ! केवळ अध दृष्टीने हे शिक्षण मी मिळविले असते, तर इतर नखरेबाज मुलीप्रमाणें स्वेच्छाचाराच्या पातकानें मीहि माझा देह विटाळून घेतला असता शिक्षण दिल्याबद्दलचे तुमचे उपकार, बाबा, मी केव्हाहि विसरणार नाही पण असे असलें तरी एवढे मात्र खरें की आमच्या समाजात अजूनहि जे शातिसौख्य दृष्टीस पडत आहे, ते स्त्रीच्या ठिकाणी पतिविषयी जी पूज्य भावना असते, त्याचेच फळ होय, आणि आपणास सागण्यास मला खरोखरच आनद वाटतो की आपण दिलेल्या शिक्षणामुळेंच माझ्या अत करणांत ही भावना दृढ झाली—"

लीला पुढें काहीं बोलणार होती, पण मध्येंच नानासाहेब उसळून म्हणाले, "गप्प रहा लीला ! तुझें हे शहाणपण ऐकण्याची माझी इच्छा नाहीं ! तुला काय वाटेल ते कर, पण लक्षात ठेव कीं, माझ्या सपत्तीतली तुला एक पैहि मिळावयाची नाहीं आणि पुन्हा मी तुझें मुखावलोकनहि करणार नाही ! तुझा बाप मेला असें तूं समज आणि तूं मेलीस असें मीही समजतो ! "

बापाचे हे शब्द ऐकून लीलेचें हृदय कळवळून आलें ! बापाच्या पायाजवळ जाऊन एकदम तिनें आपले मस्तक गुडघ्यावर ठेवलें आणि ती स्फुदू लागली. ती म्हणाली, "बाबा, बाबा ! नका हो असें बोलू ! आपल्या आवडत्या लीलेवर एवढी आग पाखडू नका ! "

नानासाहेबांसहि आतां रहावेना. ते तिच्या पाठीवरून हात फिरवून म्हणाले, " नाहीं लीला, मी तुला असा दूर लोटणार नाहीं ! तू हें डोक्यांतलें वेड काढून टाक म्हणजे तू माझी पूर्वीचीच लीला आहेस प्राणापेक्षांहि मी तुजवर अधिक प्रेम करीत आलों आहें आणि पुढेंहि करीन." इतकें म्हणतां म्हणतांच नानासाहेबाच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या ! त्यांनीं लीलेला उचलून पोटाशीं धरलें.

थोडा वेळ तो सगळा दिवाणखाना अगदी स्तब्ध व शांत होता. लीलेच्या पाठीवरून हात फिरवीत नानासाहेब म्हणाले, " लीला, उगी, मनाला वाईट वाटू देऊ नकोस! मी संतापाच्या भरात तुला वेडेंवाकडें बोललो खरा, पण त्याला मी तरी काय करणार ! येथेंच सुखाने रहा ! असले चमत्कारिक विचार मनांतदेखील आणू नकोस, म्हणजे ही सगळी सपत्ति तुझीच आहे ! "

बापाचे हात बाजूला करून लीला हळूच दूर झाली. उठून उभी राहून ती डोळे पुसून म्हणाली, " बाबा, तुम्हीं हे काय सागता ? पतीला सोडून या तुमच्या सपत्तीसाठीं मी रडत्ये, असें का तुम्हाला वाटते ? "

नानासाहेब म्हणाले, " मग तुला काय पाहिजे ? "

लीला म्हणाली, " बाबा, ही एवढी सपत्तीच काय, पण त्रिभुवनाचे राज्य कोणी दिलें, तरी साध्वी स्त्रिया आपल्या पतीचा त्याग केव्हाहि करीत नाहीत ! त्याना 'पति' हेच आपले सर्वस्व वाटते ! दैवी सपत्ति मला माझ्या मनाप्रमाणें मिळाली असता, त्यात तुम्हाला वाईट वाटते, हेच मी माझें दुर्दैव समजतें ! मी रडते ती या सपत्तीसाठी नाही, तर तुमच्या वात्सल्यासाठी तुमचे माझ्यावरचें पितृप्रेम कमी करू नका, एवढे पुन्हा मी मागते ! "

नानासाहेबाच्या चेहऱ्यावर सतापाची चिन्हे दिसू लागली. ते रोषाने म्हणाले, " लीला, तर मग तू त्या पितृप्रेमालाहि मुकलीस, असे समज ! तुझ्याविषयी मला आता यत्किंचित्देखील सहानुभूति वाटण्याचे कारण उरले नाही ! रस्त्यावरच्या एकाद्या भिकाऱ्याला पाहून मला जितकी दया उत्पन्न होईल, तितकीदेखील तुझ्याविषयीं माझ्या मनात उत्पन्न होणार नाहीं ! तुझी अन्नान्न दशा होऊन जर तू माझ्या दाराशीं आलीस, तर मूठभर अन्नहि मजकडून मिळणार नाही ! कुत्र्या-प्रमाणे तुला दूर घालवून—"

नानासाहेबांचे शब्द तितकेच राहिले ते शब्द ऐकून जगन्नाथाचा निद्रिस्थ संताप पुन्हां जागृत झाला. उठून उभा राहून वज्रगभीर स्वराने तो म्हणाला, " हां, खबरदार ! लीलेचा अपमान म्हणजे तो जगन्नाथाच्या पत्नीचा अपमान आहे हें आपण लक्षात ठेवा ! लीलेची अन्नान्नदशा होऊन ती आपल्या दाराशीं आल्यावर तिला कुत्र्याप्रमाणें घालवून देण्याच्या स्वप्नसृष्टीची उभारणी करण्याचें आपणास कांहीं कारण नाहीं ! माहीत आहे लीला कोणाची स्त्री आहे ? लीलेच्या पतीच्या अगांत केवढें सामर्थ्य आहे, हें माहीत आहे ? जगन्नाथ सुशिक्षित नसला, तरी तो मेषपात्र नाहीं ! आपल्या स्त्रीचें संरक्षण करण्याचें त्याच्या अगीं भरपूर

सामर्थ्य आहे! आपल्या स्त्रियांना लोकांच्या दारोदार हिंडविण्याचें सुशिक्षितपण जगन्नाथाला लाभलेलें नाहीं! त्याच्या शरिरांत रक्ताचा एक बिंदु उरेपर्यंत तो आपल्या स्त्रीला कोणत्याहि गोष्टीचें उणें पडू देणार नाहीं आणि मी मेल्यावरहि तिच्या अन्नवस्त्राच्या बाबतींत परमेश्वराच्या कृपेनें तिला कमतरता राहणार नाहीं!"

जगन्नाथाच्या चेहऱ्यावरचें त्या वेळचें ते तेज पाहून नानासाहेब भयचकित झाले पुढें काय करावें याचा ते जों विचार करतात, तोंच रुक्मिणीचा हात धरून जगन्नाथ म्हणाला, "चल रुक्मिणी! असल्या पित्याजवळ वात्सल्याची भिक्षा मागण्यांतहि पाप आहे!" असे म्हणून त्यानें नानासाहेबाकडे दृष्टि वळविली. त्यांना तो म्हणाला, "येतों नानासाहेब! आम्हा उभयताविषयीं जर केव्हा तुमच्या मनांत आदर उत्पन्न झाला, तर आम्हीं आपले दासानुदास आहों, पण जोपर्यंत आमच्याविषयीं तुमच्या अत करणात तिरस्कार आहे, तोंपर्यंत तुमचे मुखावलोकन आम्हींहि ~रू इच्छित नाहीं."

जगन्नाथ झटकन् लीलेसह तेथून निघून गेला! मागोमाग भागूहि गेली! डॉ. चिंतामणराव यानी पाठविलेली गाडी बगल्याबाहेर उभीच होती. त्यात तिघेंहि बसलीं आणि बिऱ्हाडीं निघून गेलीं. हा सगळा प्रकार नानासाहेब मुकाट्यानें पहात होते. गाडी गेल्यावर त्यानीं दु खाचा एक लाब सुस्कारा सोडला आणि शयनगृहात जाऊन ते स्वस्थ पडून राहिले!

---

## प्रकरण सतरावे.



डोक्यांत शिरलेला वात एकाद्या जालीम मात्रेनें निघून बडबडणारा मनुष्य जसा शुद्धीवर येतो, तसाच काहींसा प्रकार नानासाहेबासबधानें झाला होता. ज्या मतांचा त्यांनीं स्वीकार केला होता आणि ज्या धोरणानें ते इतके दिवस वागत होते, त्यांबद्दल त्यांनीं विचार असा केव्हाच केलेला नव्हता. त्यांच्या मित्रमंडळींनीं त्यांच्या भोंवतीं जें एक वातावरण तयार केलें होतें, त्यामुळें त्यांना विचार करण्यास अवसर मिळाला नाहीं, असें म्हटले तरीही हरकत नाहीं. त्यांची गाडी एकसारखी पुढें पुढेंच चालली होती आणि त्याबद्दल प्रशसेशिवाय दुसरे कोणतेहि उद्गार त्यांच्या कानांवर न पडल्यामुळें चालू असलेला मार्गच त्यांना योग्य वाटत होता; परंतु लीलेला जगन्नाथ घेऊन गेल्यामुळें त्यांच्या सुधारणेच्या

रथाला मोठा धक्का बसला आणि त्याबरोबर या रस्त्यानें धोका आहे कीं काय, म्हणून ते पाहूं लागले. रात्रीं ते अथरुणावर पडून राहिले होते हें खरें, पण त्यांना झोंप म्हणून आली नाहीं रात्रभर त्यांचा जीव सारखा तळमळ करीत होता. उजाडल्यावर रोजच्या प्रमाणें ते दिवाणखान्यांत येऊन बसले, पण त्यांच्या हृदयातली तळमळ नाहींशी झाली नाहीं लीलेनें अनुचित वर्तन केलें असें प्रथम त्याना वाटत होतें, परंतु ती गेल्यावर तिनें अनुचितपणा तो कोणता केला, हें काहीं त्याना शोधून पाहताही मिळेना. जगन्नाथाविषयीं त्याच्या मनात पूर्ण तिरस्कार होता व त्याला ते त्याच्या तोडावर किती वेळां तरी धनगर, अशिक्षित, असभ्य वगैरे म्हणाले होते, परंतु जगन्नाथांत हे दोष खरोखरच आहेत की काय म्हणून जेव्हा आता त्याचें मन शोधू लागलें, तेव्हा त्याचा मोठा घोटाळा होऊ लागला. जगन्नाथाच्या अगीं दोष कोणते आहेत, हें आता त्याच्या खरोखरच लक्षांत येईना. इतकेंच नव्हे, तर त्यानीं जेव्हा या गोष्टीचा विचार करण्यास आरंभ केला आणि ते जसजसे खोल जाऊ लागले, तसतसा त्याना निराळाच देखावा दिसू लागला. जगन्नाथाच्या आडदाडपणात आता त्याना पुरुषोचित गुण दिसू लागले; त्याच्या व्यवहारातच राष्ट्राचे खरें कल्याण त्याना दिसू लागलें आणि त्याच्या बाणेदार वृत्तींतच त्याना खरें मनुष्यत्व दिसू लागलें जगन्नाथाची आणि लीलेची निर्भत्सना न करता त्यांना जर आपण सुखानें निरोप दिला असता, तर तें आपल्या समाधानाला मोठे कारण झालें असते, असेहि विचार आता त्याच्या चित्तात पुढें येऊ लागले. फेंकलेला चेंडू नीट वेगानें जात असतो पण त्याला त्या बाजूनें थप्पड मिळताच तो जसा पहिल्याहून अधिक वेगाने परततो, तीच अवस्था या वेळीं नानासाहेबांची झाली. सुधारणेच्या वातावरणात ते जितक्या वेगानें उडाले होते, त्यापेक्षाहि अधिक वेगानें ते खालीं उतरत होते भूमीवर पाय पक्के न रोंवतां सुधारणेच्या कल्पनासृष्टीत डोक्याला मोकळें सोडणें खचित अपायकारक आहे, अशी आता त्यांची पक्की भावना होऊ लागली. एकदरींत जगन्नाथाच्या आणि लीलेच्या वरील कृतीनें अगदीं योग्या वेळांत नानासाहेब शुद्धीवर आले म्हणावयाचे !

नानासाहेबांचे आणखी एक दोन दिवस असेच विचारांत गेले. एके दिवशीं रोजच्याप्रमाणें ते आपल्या दिवाणखान्यात बसलेले असता एक पोलिस इन्स्पेक्टर त्यांच्याकडे येऊन दाखल झाले. 'आपण वसतरावाचा शोध करण्यासाठीं आलों आहों,' असें या इन्स्पेक्टरकडून अगोदरच कळल्यामुळें नानासाहेबांनीं त्याला वसंताच्या शोधाचें कारण विचारलें. इन्स्पेक्टरला जेवढी माहिती होती, तेवढी त्यानें सांगि-

तली. तो म्हणाला, " इग्लंडात शिकण्यासाठी असता एका साहेबाने कामकाजासाठीं बरोबर नेलेल्या गोवानीज ख्रिश्चन मुलीबरोबर ख्रिस्तीधर्माचा स्वीकार करून वसतानें विवाह केला. पुढे त्या बाईला दोन मुलेहि झालीं. पैशाच्या अडचणीमुळें आपण एकटेच पुढे जातो आणि हिदुस्थानांत गेल्यावर तुला तिकडे येण्यासाठी वगैरे पैसे पाठवून देतो, असे तिला सागून तो हिदुस्थानात परत आला त्या बाईनें इतके दिवस वाट पाहिल्यावर शेवटी येथल्या पोलिसकडे दाद मागितली. तिने आपल्या लग्नाचें व मुलाच्या जन्माचीं सर्टिफिकिटे पाठविल्यामुळें तिच्या भाडेखर्चासाठी व तेथल्या आजवर झालेल्या खर्चासाठी साडेसात हजार रुपये वसतकडून वसूल करण्याचे वारट प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटनी दिले आहे. वसताचा आम्ही सारखा शोध करीत आहो, पण कोठे पत्ता म्हणून लागत नाही ! "

वसताचा शोध नानासाहेबानाहि नसल्यामुळें इन्स्पेक्टरसाहेबाना अर्थातच तेथून परत जावे लागले, परतु या नव्या हकीकतीने नानासाहेबाच्या हृदयात लख्ख प्रकाश पडला ! ज्या वसताच्या स्वाधीन आपण लीलेला करणार होतो, त्या वसताचे हे भयकर स्वरूप दृष्टीस पडताच नानासाहेबाच्या अगावर शहारे आले. स्वत.चा मूर्खपणा जेव्हा अशा रीतीने त्याच्या दृष्टोत्पत्तीस आला, तेव्हा त्याची त्यानाच लाज वाटू लागली स्वत चाच ते धि कार करू लागले आणि जगन्नाथाची क्षमा मागण्यापर्यंत त्याच्या मनाची मजल गेली ! आपण केवळ हट्टानें जर वसताशी लीलेचा विवाह केला असता, तर आज तिचे किती नुकसान झालें असतें, हें जेव्हा नानासाहेबाच्या लक्षात आले, तेव्हा त्याचे मन थरारल्यावाचून राहिलें नाहीं ! तसें झाले असते, तर लीलेला जगन्नाथाचे घर अतरले असतें. अरेरे ! देवानेंच ही आपत्ति टाळली म्हणावयाची ! नानासाहेबानी या वेळीं मनातल्या मनात जगन्नाथाचे कितीतरी उपकार मानले ! !

आणखी दोन दिवस गेले. साहजिक नानासाहेबाच्या वृत्तीतहि आणखी फरक झाला. क्षणोक्षणीं गाडी जोडावयाला सागून बाहेर भटकणारे नानासाहेब गेल्या चारपांच दिवसात घराच्या बाहेर असे पडले नाहींत ! बागेंत किंवा बगल्यात हिंडण्यात आणि वर्तमानपत्रें वगैरे वाचण्यात त्यांनीं ते दिवस घालविले ! त्या दिवशीं दुपारीं चारसाडेचार वाजण्याच्या सुमारास ते बगल्याच्या पुढील सज्जात इकडून तिकडे उगीच हिंडत असतां एक गाडी त्यांच्या दारापुढे येऊन उभी राहिली आणि तींतून एक वयोवृद्ध गृहस्थ खालीं उतरून त्यांनीं दिवाणखान्यांत प्रवेश केला. या गृहस्थाचें शरीर भव्य असून चेहेरा सतेज व गंभीर होता. हा गृहस्थ

तत्त्वदर्शी व विद्वान् असावा असे त्याच्या चेहऱ्यावरून सहज ओळखता येण्यासारखें होते. त्याच्या डोक्याला पाढरें शुभ्र पागोटे असून अगात बंदाचा लाब स्वच्छ अगरखा होता. शुभ्र रेशीमकाठी उपरणे खाद्यावरून घेतलेलें असून हातातल्या काठीवर शरिराचा थोडासा भार टाकीत टाकीत वृद्धाची शात मूर्ति दिवाणखान्यात येऊन दाखल झाली! हे गृहस्थ जर आठदहा दिवसापूर्वी नानासाहेबाकडे आले असते, तर नानासाहेबानी त्याच्याकडे तिरस्काराने पाहिले असतें कारण असल्या जुन्या पोषाखाचे प्रदर्शन त्याना आपल्या दिवाणखान्यात खपले नसते, परतु आज त्याच्या वृत्तींत विलक्षण फरक झालेला असल्यामुळें वृद्ध गृहस्थाला पाहताच त्यानी अभिवादन करून मोठ्या सन्मानानें त्याला खुर्चीवर आणून बसविले नतर आपणहि नम्रपणें जवळ बसून ते म्हणाले, " आपले नाव काय ? कशासाठी आला ? "

ते गृहस्थ म्हणाले, " माझें नाव नारायणशास्त्री मी सुदरपूरला असतो आपणाकडे काहीं कारणासाठी आलो आहे आपणास गोविंदराव म्हणून एक वडील बधू होते, नाहीं ? "

भावाच्या स्मृतीनें नानासाहेबाचे हृदय दु खाने दाटून आलें! ते खिन्न स्वरानें म्हणाले, " होय होते, पण आता काय त्याचे! आज निदान त्याच्या दोन मुलाचा शोध लागेल, तर मी आपणास मोठा भाग्यवान् समजेन! सासारिक सुखासबधाने माझ्यावर परमेश्वराची पूर्ण अवकृपा आहे, पण जर माझ्या बधूचा आणि त्याच्या स्त्रीपुत्राचा शोध लागला, तर परमेश्वराला माझी दया आली असेंच मी समजेन! "

" परमेश्वर नेहमींच सदय आहे. तो न्यायनिष्ठुर असल्यामुळे त्याची अवकृपा झाल्यासारखें केव्हा केव्हा वाटतें, पण तो आमचा भ्रम होय. आपल्या आतांच्या बोलण्यावरून गोविंदरावावर तुमचें बरेंच प्रेम होते असें दिसते. सागावयाला फार वाईट वाटते कीं, ते थोड्या वर्षापूर्वी वारले! "

" आपणास कसें समजलें ? बरे त्याच्या स्त्रीची व मुलाचीहि माहिती आपणास आहे काय ? "

" ते काशीला वारले. मी त्या वेळीं तेथेच होतो. तेथे होतों म्हणण्यापेक्षां त्यांनींच मला बोलाविलें होते त्यांचा माझ्यावर अत्यत विश्वास होता, तेथे ते बरेच आजारी पडल्यावर त्यानीं मला बोलावलें. मुलें व स्त्री माझ्या स्वाधीन करून त्यानीं प्राण सोडला! "

" हें मग तुम्ही यापूर्वीच कां नाहीं कळविलें ? "

" गोविंदरावांस वचनबद्ध झाल्यामुळें ! आपल्या मुलांनीं व स्त्रीनें वडिलार्जित सपत्तीनें आपले हात विटाळू नयेत म्हणून त्यांनीं मला सांगितलें होतें आणि परमेश्वरकृपेनें त्यांनीं आपल्या मुलाना भाजीभाकर ठेवलीहि आहे. आजहि आपणांस सागण्याचें कारण नव्हते, परंतु त्यांची मुलगी कृष्णी बरीच मोठी झाली आहे, तिचें तिच्या आईने लग्न ठरविलें आहे तें आपल्या हातानें व्हावे, एवढीच तिची इच्छा आहे."

गहिंवरून येऊन नानासाहेब म्हणाले, " मोठ्या आनदाची गोष्ट आहे, पण या लग्नाचा खर्च मात्र मी करीन विवाह कोणाबरोबर करण्याचें ठरविलें आहे ? "

" विठ्ठलरावाचा पुतण्या पुंडलीक, याच्याबरोबर ! "

नानासाहेब मोठ्यानें दचकून म्हणाले, " हा सबध जर विठ्ठलरावांनीं ठरविला असेल, तर लक्षात ठेवा, तो सर्पाच्या जातीचा मनुष्य आहे ! माझ्या अब्रूची त्यानें राखरागोळी करण्याचें योजिलें होतें, पण परमेश्वरानें मोठी खैर केली ! "

" तशी काहीं भीति नाही जगन्नाथ आणि पुडलीक हे दोघेहि माझे शिष्य आहेत जगन्नाथ माझ्या मुलीचाच मुलगा आहे आणि पुडलीकालाहि मी तितक्याच प्रेमानें वागविलें आहे पुडलीकाचा व विठ्ठलरावाचा कांही संबध नाहीं पुडलीक पांचसहा वर्षाचा असतानाच त्याला त्यानीं आपल्यापासून निराळा केला ! विवाह येथेच व्हावयाचा आहे. मी सर्व मंडळीसह आलों असून आम्ही डॉ. चिंतामणरावाकडे उतरलो आहों. आपण माझ्याबरोबर आल्यास सगळयाच गोष्टींचा खुलासा होईल व मडळीच्याहि भेटी होतील, "

नानासाहेबानीं ताबडतोब जाण्याची तयारी केली ज्याना ते सुधारणा म्हणून म्हणत होते, ती त्यांना आता नष्टचर्याप्रमाणें वाटली व हे नष्टचर्य एकदांचें संपलें असें वाटून त्याना फार आनदहि झाला. ते नारायणकाकांबरोबर जुन्या सरदारी थाटानें गेले त्याना पाहतांच जगन्नाथ व रुक्मिणी ( लीला ) यांनीं त्याच्या चरणावर मस्तकें ठेवून नमस्कार केले. नानासाहेबानीं त्या दोघांनाहि उचलून हृदयाशी धरलें आणि त्यांच्यावर अश्रूंचा अभिषेक केला ! कुलवधूच्या पोशाकात रुक्मिणीला पाहून आज नानासाहेबाना कल्पनातीत समाधान झालें ! रंगनाथ व कृष्णी या दोघांच्या दर्शनानें त्यांना अत्यत आनद झाला व त्यांच्याविषयीं लीलेइतकेंच वात्सल्य नानासाहेबांच्या अतःकरणांत उत्पन्न झालें ! पुडलिकाची ती सतेज व रुबाबदार मदनमोहन मूर्ति पाहून त्यांना जांवई पसंत पडला ! लवकरच पुंडलिकाबरोबर कृष्णीचा मोठ्या थाटानें विवाह झाला ; पण तो मुब-

ईस न होतां, नानासाहेबांनीं आपल्या घरीं म्हणजे चदनवाडीस केला. त्या वेळीं त्यानीं गांवातल्या आपल्या शेतकरी वगैरे बांधवांना बोलावून त्यांची ओळख करून घेतली आणि लग्नांत सगळ्यांचा यथोचित परामर्ष घेऊन दरिद्री बाधवा-च्यासंबधानें इतके दिवस केलेल्या चुकीचें जणू प्रायश्चित्तच घेतले ! मुबईचा बगला विकून टाकून ती सगळी संपत्ति त्यांनीं चदनवाडीला आणली आणि जग-न्नाथाच्या सल्ल्यानें त्या सगळ्या सपत्तीचा उपयोग त्यानीं आपल्या दरिद्री बाध-वासाठीं केला !

वाचकहो, अनेक दरिद्री शेतकऱ्याचीं कुटुबें नानासाहेबाच्या कृपेने आज सुखी व समृद्ध झालेली दृष्टीस पडतात. स्वत तेहि रगनाथ व सरस्वती यासह त्या खेड्यात मोठ्या आनदानें रहात आहेत.

विमलाबाई पतीबरोबर चदनवाडीला गेल्या नाहीत. खेड्यात रहाणें त्याना पसत नसल्यामुळे त्यांनीं आपला मुक्काम पुण्यास ठेवला. नानासाहेबाकडून त्याना दरमहा पन्नास रुपये मिळत असतात

विठ्ठलरावाना हा आघात सहन झाला नाही या निराशेच्या तडाक्याने व लौकिकास सर्वस्वीं मुकल्यामुळे त्याची मति भ्रष्ट झाली व त्या वेडाच्या लहरीत त्यानीं आत्महत्या केली !

खिस्ती धर्माचा स्वीकार केलेले बॅरिस्टर वसतराव आपल्या खिस्ती स्त्रीसह काही दिवस ससार करीत होते, परंतु या ससाराला कटाळून ते कोठे नाहींसे झाले व पुन्हा त्याचा शोध लागला नाहीं !

नानासाहेबांची समाधानवृत्ति एकसारखी वाढतच चालली आहे ! नारायण-काकासारखे निस्पृह, चोख दानतीचे व थोर अत करणाचे मार्गदर्शक, जगन्नाथ आणि पुडलीक यासारखे गरिबाचे कनवाळू, आणि रुक्मिणी व कृष्णी यासारख्या दीन दु खिताचा समाचार घेणाऱ्या अन्नपूर्णास्वरूपी कुलवधू, हा त्रिवेणी सगम भरतखडांतल्या प्रत्येक घरीं होवो हें एकच मागणे नानासाहेब आतां परमेश्वरा-जवळ मागत असतात !

